..ा पुष्प-२१

# चरित्रहीन

## ( उत्तरार्ध )

[ डॉ० शरचन्द्र चतर्जी यांच्या मूळ बंगाली वरून ]

: अनुवादक :

वि. सी. गुर्जर

किंमत ४ रुपये

: प्रकाशक :

नवभारत प्रकाशन-संस्था, मुंबई ४

# ओळख

शरद्‌बाबूंनीं आपला हा ‘ चरित्रहीन ’ उपन्यास लिहावयाला अल्पवयांतच सुरुवात केली होती, आणि प्रारंभींचा अर्धाअधिक भाग लिहिल्यावर कादंबरी तशीच पडून राहिली होती. पुढें, पुष्कळ वर्षांनीं, कादंबरी हातावेगळी करावी, असें जेव्हां शरच्चन्द्रांच्या मनांत आलें, तेव्हां लिहिलेल्या भागांत बाल्यरचनेंतील अतिरेकाचा दोष निरनिराळ्या प्रकारांनीं ठिकठिकाणीं प्रकट झाला आहे, असें त्यांना आढळून आलें. परंतु पुस्तकप्रकाशनाच्या घाईत तो दोष न सुधारतां बहुतेक तसाच राहून गेल्याचें त्यांनीं नमूद करून ठेवलें आहे. तरीही शरच्चन्द्रांसारख्या प्रथम श्रेणीच्या कलावन्त लेखकाच्या लेखनाचा तो ‘ दोष ’ आहे, एवढेंच वाचकांनीं ध्यानांत घेणें अवश्य आहे.

प्रस्तुत अनुवाद मूळ कादंबरीच्या नवव्या आवृत्तीवरून केला आहे.

पुस्तकाचीं मुद्रितं माझ्या नजरेखालून जाण्याचा योग न आल्यामुळें, पुस्तकांत अनेक प्रमाद तसेच राहून गेले आहेत; त्यांकडे वाचकांनीं कृपादृष्टीनें पहावें, अशी विनंति करण्याशिवाय मला गत्यंतरच नाहीं !

मु० पुणें;
ता. १५ मार्च १९४९ } वि. सी. गुर्जर

# तें असें झालें

'नवभारत प्रकाशन संस्थे'च्या 'शरत्साहित्य-माले'च्या विसाव्या पुस्तकाचा–'चरित्रहीन'चा–पूर्वार्ध गेल्या दिवाळीच्या सुमुहूर्तावर जरा घाईनेंच प्रसिद्ध झाल्यामुळें, प्रिय वाचकांना त्या उपन्याससंबंधानें मला जें थोडेंसें सांगावयाचें होतें, तें आतां, या उत्तरार्धाच्या प्रकाशनाच्या वेळीं सांगावें लागत आहे.

'चरित्रहीन'चा अनुवादक म्हणून माझें नांव प्रसिद्ध झालेलें पाहून वाचक कांहींसे विस्मयांत पडतील. त्यांच्या समाधानासाठीं थोडेंसें निवेदन करणें इष्ट वाटतें. प्रस्तुत 'शरत्-साहित्य-माले'ची योजना जेव्हां प्रकाशकांनीं निश्चित केली, त्या वेळीं डॉ० शरच्चन्द्र चतर्जींच्या मूळ पुस्तकांच्या अनुवादाचें काम स्वीकारण्यास त्यांनीं प्रथम मलाच विनंति केली होती; परंतु कांहीं अडचणीमुळें मला तें काम त्या वेळीं पत्करतां आलें नाहीं; आणि माझे मित्र श्री. मामा वरेरकर यांनीं आपण होऊन तें स्वीकारलें. पुढें, कांहीं ग्रंथांचा त्यांनीं केलेला अनुवाद 'माले'-मार्फत प्रसिद्ध झाल्यानंतर, कांहीं अडचणीमुळें त्यांचा 'माले'शीं संबंध दुरावला. त्यामुळें चालकांनीं राहिलेलें काम पुनः मजवर संपविलें आणि तें मीं आनंदानें स्वीकारून लवकरच पुरेंही केलें. त्याप्रमाणें शरच्चन्द्राच्या 'चरित्रहीन'चा हा माझा अनुवाद 'माले'तर्फे आज प्रसिद्ध होत असून, लवकरच त्यांच्या शेवटच्या 'अखेरचा परिचय' या कादंबरीचा अनुवादही प्रसिद्ध होईल.

**वि. सी. गुर्जर**

# चरित्रहीन

## १

किरणमयी ज्योतिषबाबूंच्या बंगल्यावर येऊन पोंचली, तेव्हां संध्याकाळला थोडाच अवकाश होता.

तिनें एक जाड शुभ्र वस्त्र परिधान केलें असून अंगावर दागिन्यांचें चिन्हसुद्धां नव्हतें. तिच्या लांब-लचक सडक केंसांचा कसा तरी अव्यवस्थितपणें माथ्यावर अंबाडा बांधला असून एकाद दुसरी केंसांची मोकळी बट कपाळावर झुलून पडली होती. तिच्या डोळ्यांची नजर अगदीं उदास आणि श्रान्त दिसत होती, जणूं काय वैधव्याच्या अलौकिक ऐश्वर्यानें तिच्या सर्व देहाला व्यापून टाकून तें तेथें मूर्तिमान् झालें होतें ! तिच्या मुखाकडे पहाणारांचे डोळे आपोआप तिच्या पायाशीं येऊन तेथें तिला प्रणिपात करीत !

सरोजिनी बाहेरच्या व्हरांड्यांत खुर्चीवर बसून पुस्तक वाचीत होती. डोळे वर करतांच, तें विलक्षण विस्मयजनक रूप तिच्या दृष्टीला पडून ती अगदीं कळवळून गेली. किरणमयीला तिनें आजवर कधीं प्रत्यक्ष पाहिलें नव्हतें. तिचें नांव आणि सौंदर्य यांची ख्याति सुरबालेच्या मुखानें तिनें ऐकली होती इतकेंच ! परंतु तें सौंदर्य अशा प्रकारचें आहे, याची तिला कल्पनाही नव्हती !

उपेन्द्रानें त्यांचा परिचय करून दिला.

" वहिनी—सरोजिनी. "

सरोजिनीनें उठून जवळ येऊन नमस्कार केला.

किरणमयी तिचा हात धरून हंसत हंसत म्हणाली. " तुमचं नांव मीं सगळ्यांच्या तोंडून ऐकत आलें आहें; तेव्हां म्हटलं, एकदां तुम्हाला प्रत्यक्ष पहावं तरी—म्हणून आलें. "

प्रत्युत्तरादाखल काय बोलावें, हें सरोजिनीच्या ताबडतोब लक्षांत आलें नाहीं. अपरिचित स्त्री-पुरुषाशीं मिळण्यामिसळण्याचें, त्यांच्याशीं बोलण्याचालण्याचें

शिक्षण आणि संवय तिला लहानपणापासूनच होती. परंतु या आश्चर्यमय विधवा तरुणीसमोर ती अगदीं स्तंभित होऊन गेली ! तिच्या तोंडून शब्द फुटेना !

उपेन्द्राकडे वळून त्याच्याकडे पहात किरणमयी म्हणाली, "परंतु आज आतां तसा अवकाश नाहीं. फार वेळ इथं रहायला वेळही मिळणार नाहीं. चला, भाऊजी, आतां एकदम वहिनीच्याच खोलींत जाऊन बसूं या."

असें म्हणून तिनें सरोजिनीच्या हाताचा तळवा दाबून खूण केली.

परंतु जी लहर माथ्यांत घेऊन किरणमयी आज अशा भलत्याच वेळीं सुरबालेची भेट घेण्याकरतां इकडे आली होती, त्या लहरीच्या मुळाशीं असलेला हेतु आतां तिच्या पूर्णपणें ध्यानांत आला होता. रस्त्यानें येतां येतां पुनः पुनः तिच्या मनांत येत होतें, जिच्याशीं आपला परिचय दोन दिवसांपेक्षां अधिक नाहीं, त्या सुरबालेची विद्या, बुद्धि आणि मतांमतांवरील विश्वास कांहींही असो, परंतु कांहीं कारणं नसतां, आपण होऊन तिच्या वास्तव्यस्थानावर चढाई करून हल्ला करावयाला जाण्यासारखी अद्भुत हास्यकारक गोष्ट एकही नाहीं !

अर्थात् असेंच्या असेंच येथूनच परत जाणें हें आपलें प्राप्त कर्तव्य आहे, याविषयीं तिला कोणत्याही प्रकारची शंका नव्हती. परंतु कांहीं केल्या तिचें मन मागें परतावयाला तयार होईना. कोणी तरी तिला ओढीत आणून तेथं हजर केलें !

" अन्याय ! अगदीं विसंगत् ! " हे शब्दही मनांतल्या मनांत तिनें वारंवार उच्चारले. परंतु प्रिय पत्नीच्या ज्या अमूल्य ऐश्वर्याला ईश्वराचें सर्व श्रेष्ठ दान म्हणून उघडपणें प्रतिपादन करावयाला उपेन्द्राला कसली भीड लज्जा वाटली नाहीं, त्याला डोळ्याचें पातें लवतें न लवतें एवढ्या अवकाशांत पराभूत करून, त्याचें चूर्णविचूर्ण करून त्याच्या डोळ्यांसमोर धुळीप्रमाणें तें दशदिशांना आपण उधळून लावूं, हें सिद्ध करण्याची दुर्दमनीय आकांक्षा तिच्या मनाच्या अन्तर्भागीं जळजळीत द्वेष बुद्धीनें धगधगत होती. कांहीं केल्या त्या आकांक्षेला तेथून हुसकावून लावणें तिला शक्य होत नव्हतें.

परंतु सतीशाकडून तिला जी उपेन्द्राबद्दलची माहिती मिळाली होती, तीवरून तिचें मन तिला वारंवार सांगत होतें, कीं मनांत असतें, तर उपेन्द्रही जबाब देऊं शकला असता ! आणि पहिल्यापासून तिच्या मनांत हाच खटका वाजत

होता ! परंतु उपेन्द्र एक शब्दही बोलला नाहीं मृदु-मृदु हंसत मात्र होता ! कां ? कशासाठीं ? केवळ आपणाला सुरबालेकडे नेऊन तिच्यासमोर आपण किती तुच्छ, पराक्रमशून्य आहोंत, हें प्रत्यक्ष सिद्ध करून दाखविण्याकरतां ?

परंतु सुरबालेनेंही जर कांहींच उत्तर दिलें नाहीं तर? पतीप्रमाणेंच तीही तोंड दाबून हंसून अशीच चुप बसून राहिली तर ? आपली विजय-पताका तेथें कशी फडकत ठेवावी, हें किरणमयीला कळेनासें होऊन ती गोंधळांत पडली !

अशा तऱ्हेचा विचार करतां करतां, सरोजिनीच्या मागून मागून ती जेव्हां सुरबालेच्या खोलींत आली, त्यावेळीं सुरबाला खालीं जमिनीवरच बसून काशीदासी महाभारतांतील भीष्माच्या शरशय्येचा भाग वाचीत होती. तिच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह सुरू झाला असून ती अगदीं व्याकुल झाल्यासारखी दिसत होती.

अकस्मात् किरणमयीला पाहून सुरबालेची अगदीं धांदल उडाली. मांडीवरचें पुस्तक बाजूला ठेवून पटकन् तिनें अगोदर डोळे पुसले आणि उठून तिच्याजवळ जाऊन, तिचे दोन्ही हात धरून तिचें आदरपूर्वक स्वागत करीत ती मृदु वाणीनें म्हणाली, " या-या, ताई ! "

जवळच गालिचावर किरणमयीला बसवून ती किंचित् हंसून म्हणाली, " उद्यां तुमच्याकडे जाऊन तुम्हांला भेटून यावं असा मी विचार करीत होतें, ताई ! "

किरणमयी म्हणाली, " म्हणून तर आज मी आलें—"

जवळच एक खुर्ची ओढून घेऊन तिच्यावर बसून उपेन्द्र म्हणाला, " रडणं चाललं होतं ! हें महाभारत असेल. होय ना ? "

अतिशय लाज वाटून खालीं मान घालून सुरबालेनें पदरानें सारखा डोळे पुसण्याचा उद्योग सुरू केला.

उपेन्द्र म्हणाला, " असलीं खोट्यानं भरलेलीं रबिश पुस्तकं वाचण्यांत तूं वेळेचा अपव्यय कां करतेस, हें माझ्या कांहीं ध्यानांत येत नाहीं बुवा ! अन् शिवाय, रडणं स्फुंदणं—डोळ्यांतल्या गंगायमुनाच—"

परंतु त्याचें वाक्य कांहीं पुरें झालें नाहीं.

डोळे पुसण्याचा विसर पडून सुरबाला खूब रागावून पतीकडे तीव्र कटाक्षपात करून म्हणाली, " तुम्ही शंभर वेळां हेंच हेंच म्हणतां कीं—"

उपेन्द्र म्हणाला, " हेंच म्हणतों, कीं अथपासून इतीपर्यंत यांतली प्रत्येक गोष्ट खोटी आहे–दुसरं कांहीं नाहीं ! "

असल्या गोष्टींत सुरबालेला चिडवून खूब राग आणावयाला मुळींसुद्धां वेळ लागत नसे !

क्रोधानें लालसर झालेल्या डोळ्यांनीं पतीच्या चेहऱ्याकडे स्थिरपणें पहात ती चिरडीच्या तीव्र स्वरानें म्हणाली, " महाभारत खोटं ? असे शब्द तुम्हीं तोंडानें कधीं उच्चारूं दिखील नका. ही कांहीं थट्टा विनोदाची गोष्ट नाहीं. हा अपराध होतो, पाप लागतं, हें माहीत आहे तुम्हाला ? "

उपेन्द्र म्हणाला, " आहे माहीत–कीं कांहींसुद्धां होत नाहीं. बरं, माझं म्हणणं राहिलं–यांना विचार हवं तर. यांचा दिखील त्यावर विश्वास नाहीं. "

हें ऐकतांच किरणमयीकडे पाहून सुरबाला खुदकन् हंसली. ती म्हणाली, " ऐका, ऐका, ताई ! तुमचा म्हणे महाभारतावर विश्वास नाहीं ! यांचं नेहमीं हें अस्सं बोलणं ! कांहीं विचार बिचार करायचा नाहीं ! एकदम आपलं फसकन् बोलून टाकलं कीं झालं ! "

किरणमयी गप्प बसून राहिली. त्या पति–पत्नीमधील या वितंडवादाचा अर्थ तिच्या लक्षांत येईना ! तिला वाटूं लागलें, हें केवळ एक नाटक असून आपल्या संबंधाचे यांच्या मागें कांहीं तरी एकादें गुप्त रहस्य लपून राहिलेलें असावें !

सरोजिनीला उद्देशून उपेन्द्रानें प्रश्न केला, " बरं, महाभारतांतल्या गोष्टी खऱ्या आहेत, असं तुम्हाला वाटतं ? "

सरोजिनी सरळपणें उत्तरली, " कांहीं सत्य त्यांत आहे, हें खास ! परंतु आरंभापासून अंतापर्यंत सगळं कांहीं खरं आहे, असं कुणालाही वाटणं शक्य नाहीं—मलाही नाहीं. "

तिच्या या उत्तरानें सुरबाला स्तंभितच झाली. नंतर हा विनोद–परिहास समजून तो तुच्छतेनें उडवून द्यावा, असेंही तिला वाटलें. परंतु सरोजिनीच्या पुढल्याही क़ांहीं बोलण्यावरून आणि उपेन्द्राच्या उपहासाच्या आणि व्यंग्योक्तींच्या बोंचक टोमण्यांनीं तर तिचा तो समज पालटून तिला अधिकच विस्मय वाटूं लागला, आणि खूब रागही आला.

पहातां पहातां त्या तिघांमध्यें प्रचंड वादविवाद सुरू झाला !

परंतु तोंपर्यंत किरणमयी एक शब्दही बोलली नव्हती. कारण, हा वादानुवाद

म्हणजे शुद्ध परिहास आहे, याशिवाय त्याचें दुसरें कांहीं स्वरूप असूंच शकणार नाहीं, अशीच तिची कल्पना होती. जिची भेट घेऊन तात्त्विक चर्चा करण्याच्या उद्देशानें ती आली होती, ती तर सर्व महाभारतच अखंड सत्यरूप आहे, असें सिद्ध करावयाला कंबर कसून राहिली होती–पण अशी स्वप्नांतही न येणारी गोष्ट सत्य म्हणून मनांत तरी कशी कबूल करावयाची ?

इकडे तर वाद आणि शब्दांची मारामारी, काटाकाटी अविश्रान्तपणें जोमानें सुरू होती !

परंतु किरणमयी केवळ सुरबालेकडे तीक्ष्ण दृष्टीनें पहात गप्प बसून राहिली होती.

पहातां पहातां तिच्या संशयाचा घोर वाफेप्रमाणें विरून गेला ! सुरबालेचा कंठस्वर, डोळयांची नजर, सर्व चेहरा, फार काय, तिचा सर्व देह—यांतून संशयाचा लेशही नसलेला सुदृढ विश्वास जणूं उसळून बाहेर पडत होता ! हा प्रचंड, विराट् ग्रंथ म्हणजे सुरबालेच्या दृष्टीनें प्रत्यक्ष सत्याचा मूर्तिमान् अवतार होता ! हें नुसतें कौतुक नव्हतें, धडधडीत जिवंत विश्वास होता तो !

यानंतर कांहीं वेळपर्यंत कोण काय बोलत आहे, त्याकडे किरणमयीचें लक्ष बिलकुल नव्हतें. त्याबद्दल तिला जणूं शुद्धीच नव्हती ! एकाद्या झपाटलेल्या माणसाप्रमाणें, सुरबालेकडे ती पहात असतां, तिच्या ठिकाणीं कसल्या तरी अपरिचित प्रकारची आकृति दिसूं लागली ! ती अगदीं अपूर्व, अननुभूत होती !

ती अशा भावमग्न स्थितींत किती वेळ राहिली असती कोण जाणे ! परंतु एक वेळ सरोजिनी आणि उपेन्द्र एकदम 'होः होः' करून अशीं मोठ्यानें हंसलीं, कीं त्या आवाजानें ती आपोआप चटकन् भानावर आली.

किरणमयीनें इकडे तिकडे पाहिलें. त्या उभयतांच्या हंशाच्या घोषानें सुरबाला अगदीं बावरून गेलेली तिला दिसली. बोलूनचालून ती बिचारी आतां एकटी पडली होती.

तेव्हां किरणमयीला मध्यस्थ पंच निश्चित करून तिच्याकडे तक्रार करण्याची कल्पना अकस्मात् तिच्या डोक्यांत येऊन, तिच्याकडे पाहून ती म्हणाली, "बरं, ताई, मला तुम्ही सांगा, हें कधीं असत्य, खोटं होऊं शकेल काय ?"

किरणमयीकडे पाहून हंसूं आंवरून घेऊन उपेन्द्र म्हणाला, "वहिनी, वाद एकंदर असा आहे–सरोजिनीताईचं म्हणणं असं, कीं भीष्माच्या शरशय्येच्या

प्रसंगीं अर्जुनानं बाण मारून पृथ्वीचं वक्षःस्थल फोडून गंगा वर आणली, ही गोष्ट अजिबात खोटी ! त्यानं गंगा कधींही आणली नाहीं. ”

पतीच्या चेहऱ्याकडे तीव्र दृष्टिपात करून सुरबाला म्हणाली, “ आणली नाहीं ना ? तर मग माझ्या प्रश्नाला जबाब द्या. भीष्मदेव शरशय्येवर पडले असतां अतिशय तहान लागली, अन् त्यांना पाणी प्यायची भयंकर इच्छा झाली. दुर्योधनानं सोन्याच्या झारींतून ताबोडतोब पाणी आणलं, पण भीष्मदेव तें प्याले नाहींत. हें तर कांहीं खोटं नाहीं ना ? मग प्रश्न असा, कीं गंगा जर आली नाहीं तर त्यांची तहान शांत कशी झाली ? ”

सरोजिनी असहिष्णुतेनें म्हणाली, “ कशी झाली ? हूंः ! सांगतें मी. त्या झारींतल्या पाण्यानंच भीष्माची तहान भागली, असं माझं म्हणणं आहे. दुर्योधनाच्या झारींतलं पाणीच ते मुळीं प्याले ! बोला पुढं ! ”

या वेळीं सुरबाला क्षोभानें भयंकर उत्तेजित झाली आणि तिला अतिशय रागही आला. चिडीच्या स्वरानें ती म्हणाली, “ पण प्याले नाहींत, असं इथं स्पष्ट लिहिल आहे, तें कां ? अन् दुसरं असं कीं भीष्मदेवांना जर दुर्योधनाच्या झारींतलंच पाणी प्यायचं होतं, तर मग अर्जुनाला तरी इतके कष्ट करून बाणानं पृथ्वी फोडून गंगा वर आणायची काय जरूरी होती ? सांगायचं कारण. ताई, तुम्ही तरी सांगा हो, कांहीं झालं तरी हें कांहीं खोटं असूं शकणार नाहीं ना ? ”

असें म्हणून करुण आणि क्रुद्ध अशा दोन्ही तऱ्हेच्या नजरेनें किरणमयीकडे पाहून तिनें आपली कैफियत तिला दाखल केली.

क्षणार्धांत उपेन्द्राच्या प्रचंड हास्यानें तें सर्व दालन भरून गेलें ! सरोजिनीही फिदी फिदी हंसूं लागली.

उपेन्द्र म्हणाला, “ घ्या, वहिनी ! काय तुमचं म्हणणं आहे ? द्या जबाब. गंगा जर आली नाहीं, तर तहान भागली कशी ? अन् ज्या अर्थी तहान भागली, त्या अर्थी गंगा कशी येणार नाहीं ?”

असें म्हणून त्यानें पुनः एकवार उच्च हास्य केलें.

परंतु मोठ्या आश्चर्याची गोष्ट अशी, कीं किरणमयी या हंशाला साथ देऊं शकली नाहीं. विस्मयानें स्थिर झालेल्या दृष्टीनें तिनें चार दोन क्षण सुरबालेच्या मुखमंडलाकडे पाहिलें आणि ती स्तब्ध बसली.

नंतर एकाएकीं भावनेच्या प्रचंड आवेगानें तिनें सुरबालेला ओढून आपल्या हृदयाशीं घट्ट आलिंगन दिलें आणि तिला ती मृदु स्वरानें हळूच म्हणाली. " खोटं नाहीं ताई, याच्यामध्यें कुठं कुठंही तिळभरदेखील कांहीं खोटं नाहीं, गंगा आली होती तर काय झालं ? अगदीं नक्की आली होती. तुम्हीं जें वाचलं आहे, जी तुमची धारणा झाली आहे, तें सर्व अगदी खरं खरं आहे. सत्याची ओळख सर्वांनाच पटते असं नाहीं, ताई ! म्हणून ज्यांना पटत नाहीं, ते त्याची थट्टा उपहास करतात ! "

पहातां पहातां तिच्या डोळ्यांतून दरदरां अश्रुप्रवाह सुरू झाला.

हा प्रकार पाहून सरोजिनी आणि उपेन्द्र हीं उभयतां विस्मयानें हतबुद्ध होऊन तिच्या चेहऱ्याकडे टकमकां पहातच राहिलीं.

परंतु किरणमयीनें तिकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं. सुरबालेला तशीच हृदयाशीं घट्ट धरून डोळे पुसून ती आस्ते आस्ते म्हणाली, " ताई, ज्यांनीं अनेक धर्म-ग्रंथाचं पठन केलं आहे, त्यांना पक्कं माहीत आहे, कीं तुम्ही आज ज्या प्रकारानं न्याय करून निकाल दिलात, त्यापेक्षां अधिक योग्य न्याय कोणत्याही धर्म-ग्रंथांत नाहीं अथवा कुणी विद्वान् पंडीत पुढं कधींही देऊं शकणार नाहीं. त्या सर्वांना अशाच रीतीनं आपल्या मनची गोष्ट सांगावी लागली आहे. ही गोष्ट ज्याला माहीत आहे, तो, तुमच्या तोंडच्या या कित्येक गोष्टी ऐकून हंसेल, हें कधींही शक्य नाहीं. "

असें म्हणून आपलें बाहुबंधन सैल करून तिनें सुरबालेला मोकळें केलें आणि सरोजिनीकडे पाहून ती म्हणाली, " मला वाटतं, माझं एकंदर आचरण पाहून तुम्ही एकदम चकित झालां असाल, ताई ! होय, चकित होण्यासारखंच झालं सारं ! "

असें म्हणून किरणमयी किंचित् हंसली.

परंतु सर्वांत अधिक हतबुद्ध कोण झाला असेल, तर तो उपेन्द्र स्वतः ! खरोखरच किरणमयीच्या विचारांच्या या अद्भुत कोलांट-उडीचें कारण त्याच्या बिलकुल ध्यानांत येईना ! अगदीं थोड्या वेळापूर्वी ती अतिशय स्पष्ट आणि स्वच्छ रीतीनें म्हणाली होती कीं, बुद्धि आणि अनुभव यां व्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही तऱ्हेचा मानदंड कबूल करायला आपण बिलकुल तयार नाहीं ! आणि जी वस्तु यांच्या बाहेर असेल, त्यांना आंत आणावयाची आवश्यकताही

आपणाला वाटत नाहीं ! तीच सुदृढ मनाची बायको, सुरबालेच्या या सरळ पोरकटपणामुळें इतकी अगदीं गळून कशी गेली ? तिचें मन इतकें विचलित झालें याचें कारण काय ? सुरबालेला ओढून हृदयाशीं धरून ती जें तिच्याशीं कांहीं बोलली, तें कांहीं तिच्या मनांतल्या ठेवणींतलें खास नव्हतें. आणि दुसरेंही एक असें, कीं आपण जें बोलतों आहों, त्याचें मर्म आकलन करणें सुरबालेला शक्य नाहीं, हेंही तिला खास माहीत होतें.

सर्वांत आश्चर्यकारक कोणती गोष्ट असेल तर ती म्हणजे तिच्या डोळ्यांतून अकस्मात् सुरू झालेला अश्रुप्रवाह ! ते अश्रु आले कसे आणि कुठून ?

याशिवाय आणखींही एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट. अशा प्रकारची ज्यांची बुद्धिमत्ता प्रखर आहे, असे स्त्री-पुरुष भावनांचा आवेग प्रगट करावयाला कधींही तयार नसतात. कोणत्याही कारणानें तो प्रगट झाला, तर त्यांना पराकाष्ठेची शरम वाटते हें उपेन्द्राला चांगलें माहीत होतें. परंतु तशा रीतीनें वागल्यावर, आपल्या कृतीबद्दल तिला लवमात्र लज्जा वाटली असावी असें लक्षण तिच्याशीं संपूर्णपणें अपरिचित असलेल्या सरोजिनीच्याही नजरेला बिलकुल आलें नाहीं !

संध्याकाळ उलटून गेला. सर्वांचा निरोप घेऊन किरणमयी हळुहळू बाहेर येऊन गाडींत बसली.

दिवाकर त्या वेळीं घरीं नव्हता. संध्याकाळच्या सहलीला तो बाहेर गेला होता. यामुळें घोटाळून शेवटीं उपेन्द्राला एकट्यालाच किरणमयीच्या जवळ गाडींत बसावें लागलें.

परंतु किरणमयीचें त्याच्याकडे जणूं लक्ष्यच नव्हतें. गाडीच्या एका कोपऱ्यांत माथें टेंकून ती स्तब्ध बसून राहिली.

कांहीं मिनिटें निघून गेलीं.

अशा प्रकारें चूपचाप बसून रहाणेंही मनाला बरें वाटत नव्हतें. शिवाय, किरणमयीच्या मनांत कसला तरी महत्त्वाचा विचार चालला आहे, असा उपेन्द्राचा पक्का कयास होता. परंतु तो काय असावा, हे समजून घेण्याकरतां, तो तिला म्हणाला, "आलांत ना पाहून सारं, वहिनी ? या बुद्धिमतीसहवर्तमान मला संसार करावा लागतो आहे—"

किरणमयी कांहीं बोलली नाहीं.

"आधींच स्वारीला जखडून धरणं कठीण जात होतं मला, त्यांत आज

तुम्हीं विनोदानं जें सर्टिफिकेट तिला देऊन भर घातलीत, त्यामुळं काम आतां अधिकच कठीण होणार आहे, वहिनी ! ”

तरीही किरणमयीनें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

ती कांहीं तरी बोलेल या अपेक्षेनें कांहीं क्षण गप्प राहून उपेन्द्र हंसून म्हणाला, “ परंतु इथंच कांहीं या प्रकरणाचा अंत नाहीं, वहिनी ! ती इतकी साधी, सरळ किंवा बावळट आहे, कीं साऱ्या जन्मांत ती कधीं खोटं बोलूं शकली नाहीं ! ”

किरणमयी अबोलच राहिली.

उपेन्द्र म्हणाला, “ कां असं, माहीत आहे ? एक तर, तेहतीस कोटी देव-देवता तिला चहूबाजूंनीं वेढून रात्रंदिवस तिच्यावर खडा पहारा करीत आहेत. शिवाय जें घडलंच नाहीं, तें स्वतःची बुद्धि चालवून ती बनवून सांगेल, असं सामर्थ्य तिच्या ठिकाणीं नाहीं. ”

किरणमयी रुद्ध कंठानें संक्षेपानें म्हणाली, “ चांगलंच आहे तर मग ! ”

उपेन्द्र म्हणाला, “ हें सारं बरं, असं मला बिलकुल वाटत नाहीं, वहिनी ! संसार करायचा म्हटलं तर, लहान सहान खोट्या गोष्टींचा आसरा घ्यावाच लागतो. ज्यापासून कुणाचं कांहीं नुकसान नाहीं, अन् थोडाफार उपद्रव किंवा अशांतता यापासून बचावही होईल, अशा असत्यांत काय दोष आहे ? मी तर म्हणतों, कीं तो गुणच आहे ! ”

“ ठीक आहे. मग शिकवीत कां नाहीं तुम्ही हें त्यांना ? ”

“ पण ती शिकणार कशी, वहिनी ? एका अतिशय छोट्या असत्यानिमित्त युधिष्ठिराला दारुण दुर्गति भोगावी लागली, असं महाभारतांत स्वच्छ लिहिलं आहे ना ? देव–देवता ज्या प्रकारें आ करून तिच्याकडे पहात बसल्या आहेत, त्यामुळं, जाणून बुजून जर ती थोडं तरी खोटं बोलली, तर कांहीं निभाव आहे का मग ? हुड् हुड् करीत ओढीत नेऊन ती मंडळी तिला नरकांत बुडवतील ना ! ”

किरणमयी गप्प होती.

क्षणभरानें उपेन्द्र म्हणाला, “ वहिनी, डोळे मिटून ती देव-देवतांचे चेहरे असे स्पष्ट पाहूं शकते, कीं ती एक अतिशय आश्चर्याची गोष्ट आहे ! कुणी ढाल–तरवार घेऊन, तर कुणी शंख-चक्र-गदा-पद्म घेऊन, कुणी नुसती बांसरी घेऊन अशा अगदीं प्रत्यक्ष रूपानं तिच्या समोर येऊन उभे रहातात, कीं तें

नुसतं ऐकून माझं सर्वांग अगदीं शहारून निघतं! दुसऱ्या कुणाच्या तोंडून जर या गोष्टी मी ऐकल्या असत्या, तर खोट्या बनावट बाता, म्हणून नुसत्या हंसण्यावारी त्या उडवून दिल्या असत्या. परंतु तिच्या संबंधानं तर या निंदेचं एक अक्षरसुद्धां तोंडांतून काढण्याची कांहीं सोय नाहीं ! ”

असें म्हणून तो किंचित् थांबला.

नंतर भक्ति, प्रेम, श्रद्धा, गर्व इत्यादि भावनांनीं काहूर केलेल्या मनानें, कौतुकाच्या स्नेहार्द्र स्वरानें उपेन्द्र बोलूं लागला, “ म्हणून, पाहून सवरून अशा व्यक्तीला ‘ माणुस ’ अशी संज्ञा न देतां ‘ जनावर ’ म्हटलं तरी चालण्यासारखं आहे. ती लहान असतां ज्या व्यक्तीनं तिला ‘ पशुराज ’ असं नांव दिलं, त्या व्यक्तीच्या बुद्धिमत्तेची कसली तारीफ आहे ! ”—पण हें काय हो, वहिनी ? ”

गाडीनें वळण घेतांना रस्त्याच्या दिव्याचा झगझगीत गॅसचा प्रकाश एकदम केरणमयीच्या चेहऱ्यावर येऊन पडला, त्याबरोबर, तिच्या डोळ्यांतील आंसवांनीं तिचा चेहरा ओला चिंब झाला आहे, असें दृष्टीला पडतांच उपेन्द्र एकदम चमकला.

लज्जेनें खालीं मान घालून उपेन्द्र स्तब्ध बसून राहिला. आनंदाच्या मधुरतेंत मग्न होऊन, अजाणतां, स्नेह संभ्रमानें जेथें आपण परिहासावर परिहास करीत सुटलों होतों, तेथेंच, आपल्या बरोबर डोळ्यांसमोर दुसरी एक व्यक्ति, कोण जाणे कोणत्या दुःखामुळें निस्तब्धपणें रडत आहे, हें पाहून त्याचें हृदय वेदीर्ण झालें !

पाथुरे घाटावरच्या घरीं जेव्हां दोघें येऊन ठेपलीं, तेव्हां प्रहर रात्र होऊन गेली होती. जवळ जवळ सर्व रस्ताभरच किरणमयी मुकाट्यानें बसून राहिली होती. परंतु घरांत पाऊल टाकतांच अत्यंत पश्चात्तापाच्या स्वरानें ती म्हणाली, ‘ हाय ! जळली मेली माझी आठवण ती! दिवसभर बरोबर घेऊन मी तुम्हाला हेंडवलें आहें. पण इतका वेळपर्यंत पाण्याचा एक थेंब दिखील तुमच्या तोंडांत पडला नाहीं, तें मात्र माझ्या मेलीच्या ध्यानांत दिखील आलं नाहीं, भाऊजी ! चला, हातपाय धुऊन येतां चटकन्? पण असूं दे तूर्त ! माझ्या बरोबर असेंच चला सैंपाकघरांत—दोन पुऱ्या लाटून द्यायला कांहीं मला दहा मिनिटांपेक्षां अधिक वेळ लागणार नाहीं पहा. बरं का ग मुक्ता ! चुलींतला विस्तव एकदां

नीट पेटता करून मगच आतां घरीं जा तूं बाई! जा, बाई, चटकन् एवढं काम कर माझं—माझी गुणांची बाई ती!"

मोलकरीण दार उघडावयाला आली होती आणि तसेंच पुढें घरीं जावें, असा तिचा बेतही होता. परंतु धनिणीनें केलेल्या हुकूमाची तामिली करायला पुनः तिला वर जाणें भाग होतें, दरवाजा बंद करून ती घाईघाईनें निघून गेली.

परंतु या पुऱ्यांच्या भानगडीचा प्रस्ताव ऐकून उपेन्द्राची खूब धांदल उडाली. जोराचा विरोध करून तो म्हणाला, "छे छे, वहिनी! त्या भानगडींत तुम्ही आतां मुळींच पडूं नका. आज तुम्ही अतिशय दमून गेलां आहां. मी इथून घरीं जाऊनच जेवीन. माझ्यासाठीं तुम्ही आतां मुळींच कसले कष्ट घेतां कामा नयेत, वहिनी!"

"कां घेतां कामा नयेत?"

उपेन्द्र म्हणाला, "छे छे–कांहीं झालं तरी तसं कांहीं होतां कामा नये. अगदीं बिलकुल नको कांहीं मला."

किरणमयी खुदकन् हंसली. नंतर हंसतमुखानें ती म्हणाली, "तुम्ही, भाऊजी, चांगुलपणाचे नी यशाचे भारी लोभी! इतकं यश मिळून तुम्ही तें ठेवणार तरी कुठं?"

ती एकदम असें बोललेली ऐकून उपेन्द्र थोडा विस्मयचकित झाल्यावांचून राहिला नाहीं. हा 'शेरा' मारण्याचा तिचा हेतु काय असावा, याची त्याला कल्पना होईना!

किरणमयी म्हणाली, "नाहीं तर काय, भाऊजी? तुमच्या परोपकाराचं यश इतकं निःस्वार्थ, इतकं निर्लिप्त असावसं वाटतं तुम्हाला, कीं पृथ्वीवर अन् स्वर्गात त्याला बिलकुल जोडच असूं नये! आमच्यासाठीं तुम्हीं जें कांहीं करतां आहां भाऊजी, कीं त्यासाठीं माझं काळीज चिरून तुमचे पाय धुवायला मी आलें, तरी तुम्ही त्याला विरोध करणं शोभायचं नाहीं. अन् दोन घांस खायला द्यायची मी तयारी करणार, तर त्याला तुम्ही मोडता घालतां? छी छी! आम्हाला तुम्ही समजतां तरी काय, तें मला सांगा बरं! आमची काय माणसांत दिखील जमा नाहीं? कीं माणसाचं रक्त दिखील आमच्या शरीरांत खेळत नाहीं?"

उपेन्द्र अतिशय शरमिंदा झाला. कुंठित वाणीनें तो म्हणाला, "या असल्या कल्पनांमुळें कांहीं मी तुम्हाला हरकत केली असं नाहीं, वहिनी! मी केवळ—"

" केवळ काय, भाऊजी ? तर मग, घरीं परत जायच्या गडबडींत काय बोलल्लों न बोलल्लों, याचं तुम्हालां भानच राहिलं नाहीं ? "

अनपेक्षितपणें आपली छान सुटका झाली, असें उपेन्द्राला वाटलें. लुप्त होत चाललेला परिहास पुनः साहजिक रीतीनें परत आलेला पाहून त्याला अतिशय आनंद वाटूं लागला.

तो म्हणाला, " तशी माझी अपकीर्ति आहे, वहिनी ! हें मी नाकबूल करीत नाहीं. परंतु आज कांहीं त्या कारणासाठीं माझ्याकडून हा अपराध घडलेला नाहीं. खरोखरच मला वाटलं होतं, कीं तुम्ही आज अगदीं विलक्षण दमून गेलां आहां. "

" दमून गेलें मी ? असेन कदाचित् ! " असें म्हणून किरणमयी पुनः किंचित् हंसली.

नंतर क्षणभरानें अकस्मात् गंभीर होऊन ती म्हणाली, " छीः ! अगदीं खराब ! आज जर माझे सतीश भाऊजी इथं असते, तर स्वतःची स्तुति स्वतःच्या तोंडानं मला करावी लागली नसती ! त्यांनीं सहस्र मुखांनीं एकदम व्याख्यान सुरू केलं असतं. नाहीं, भाऊजी, ही सारी दमणूक बिमणुकीची चैन मिरविण्यासारखी माझी स्वतःची तर स्थिति नाहींच; पण बंगाली गृहस्थ-घरच्या कुणाही स्त्रीसंबंधानं हें दुष्ट वर्णन योग्य आहे, असं मला वाटत नाहीं. जवळचा आप्त असो अथवा दूरचा कुणी असो, पुरुषमाणसाच्या तोंडीं कांहीं पडलेलं नाहीं असं कळतांच, बंगाली स्त्रिया अगदीं मरत पडल्या असल्या, तरी एकदम उठून उभ्या राहतील ! ठाऊक नाहीं वाटतं तुम्हाला ? "

उपेन्द्रही आतां हंसला आणि म्हणाला, " माहीत आहे तर काय झालं, वहिनी ! उत्तम रीतीनं माहीत आहे. मी अगदीं स्वच्छ कबुली देतों तुमच्या पुढं, कीं माझा अपराध झाला. आतां पुरे ! अन् भूकही लागली आहे मला. चला, काय देतां खायला तें द्या—"

" या—"

असें म्हणून जणूं उपेन्द्राला रस्ता दाखवीत किरणमयी स्वयंपाकघराकडे निघाली.

सासूबाईच्या खोलीशीं येतांच, दरवाजा ढकलून तिनें आंत जरा डोकावून पाहिलें. त्या चांगल्या निर्घोरपणें घोरत आहेत असें तिच्या दृष्टीला पडलें.

स्वयंपाकघरांत आल्यावर, ज्याप्रमाणें सतीशला बसावयाला ती पाट मांडी, त्याप्रमाणें उपेन्द्रासाठींही तिनें पाट मांडला. तोही पाटावर बसला.

चुलींत विस्तव घालून, पेटता करून मोलकरीण इतर कामाकरतां बाहेर गेली.

आपल्या नव्या अतिथीकडे पाहून किरणमयी म्हणाली, " भाऊजी, मला त्रास होईल म्हणून कांहीं न खातां जायची जी प्रस्तावना तुम्ही केली होती, तशीच जर दुसऱ्या कुठं अन् इतर कुणाजवळ तुम्ही करून बसलां असतां, तर आज तुम्हांला केवढी शिक्षा भोगावी लागली असती, याची कल्पना आहे तुम्हाला ? "

उपेन्द्र म्हणाला, " आहे चांगली आहे. परंतु इथं कांहीं त्या शिक्षेची भीति मला नव्हती, वहिनी ! "

मोलकरणीनें मैद्याचा थाळा तिच्या समोर आणून ठेवला आणि ती निघून गेली.

किरणमयीनें तो ओढून जवळ घेतला आणि ती खालीं मान घालून मृदु स्वरानें म्हणाली, " तें कांहीं सांगता येण्यासारखं नाहीं, भाऊजी! कपाळीं शिक्षा लिहिलेली असली, म्हणजे कशामुळं काय होईल, कुठं येऊन कोणता भोग भोगावा लागेल, त्याचा हिशेब अगोदरपासून कुणालाहि लागायचा नाहीं. अदृष्टांत लिहिलं असेल तें कधीं कुणाला टाळतां येईल कां ? येत तर नाहींच, भाऊजी ! पण तें आपण होऊन धावत येऊन आपल्या मानेवर बसतं ! "

तें गूढ रहस्य उपेन्द्राच्या कांहीं नीटसें ध्यानांत आलें नाहीं. तो नुसता म्हणाला, " खरं तें--"

किरणमयीही त्यावर कांहीं बोलली नाहीं. एकदां तिनें उपेन्द्राकडे पाहिलें आणि नंतर खालीं मान घालून ती जोरजोरानें पीठ मळूं लागली. ती गालांतल्या गालांत हळूच हंसत असावी, असा उपेन्द्राला भास झाला.

कांहीं वेळ याप्रमाणें मुकाट्यानें पीठ मळतां मळतां मध्येंच डोळे वर न करतां ती म्हणाली, " बरं, काय हो भाऊजी, आज इतका थाटमाट, अवडंबर करून बायको दाखवायला मला तुम्हीं नेलंत, यांत तुमचा हेतू काय होता तें मला सांगा बरं—"

उपेन्द्र आश्चर्यानें उद्गारला, " अवडंबर बिवडंबर तर मी कांहीं केलं नव्हतं, वहिनी ! "

किरणमयी म्हणाली, " तर मग मला वाटतं, माझ्या तोंडून चुकीचा शब्द गेला. बरं, मी विचारतें इतकी चतुराई करून तरी कशाला नेलंत मला ? "

उपेन्द्रानें विचारलं, " चतुराई तरी मी काय केली हो ? "

किरणमयी म्हणाली, " माझी बायको साधी आहे, बावळट आहे, असं निरनिराळ्या तऱ्हेची युक्तिबाज शब्दयोजना करून तुम्हीं माझी भुलावणी केलीत कीं ! पण उगीचच शब्दांशीं मारामारी, ठोकाठोकी करून काय व्हायचं आहे, भाऊजी ? अशा बायकोला ' साधीभोळी, ' ' बावळट ' असंच तुम्ही समजत असलां, तर तुमच्या या वहिनीला तरी तुम्ही काय समजतां, मला कळत नाहीं. इतक्या सहजासहजीं तिला फसवतां येईल, अशी तुमची कल्पना आहे काय, भाऊजी ? "

" नाहीं—मुळींच नाहीं. "

किरणमयीनें चेहरा वर करून त्याच्याकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें. कारण, जितक्या लघु भावानें, परिहासरूपानें उपेन्द्र जबाब देऊं पहात होता, तितकें प्रत्यक्षांत त्याला साधलें नाहीं. मनांतून तशी इच्छा नसतांही, त्याचा कंठस्वर विशेष गंभीर झालेलाच तिच्या कानांवर आला. परंतु आपल्या तें लक्षांत आलें आहे कीं नाहीं, याची तिनें त्याला दाद दिली नाहीं.

सहज परिहासाच्या स्वरानें ती म्हणाली, " तर मग ? "

आपल्या कंठस्वरांत गांभीर्य उत्पन्न झालें आहे, हें उपेन्द्राच्याही लक्षांत येऊन मनांतल्या मनांत तोही कांहींसा शरमिंदा झाला. परंतु तितक्यांतल्या तितक्यांत त्यानें आपणाला सांवरून घेतलें.

किंचित् हंसून तो म्हणाला, " वहिनी, तुम्हाला फसवणं ही काय सोपी गोष्ट आहे ? पण जर थोडी फार चातुरी मीं लढविली नसती, तर तुम्ही दिखील तिकडे खात्रीनं गेलां नसतां ! अन् केवढ्या मोठ्या मूर्ख माणसाच्या संगतींत मला संसार करावा लागतो आहे, याची तुम्हाला खरी कल्पना कधींही आली नसती ! "

किरणमयीनें त्याच्याकडे तीक्ष्ण दृष्टीनें पाहून विचारलें, " पण तें पाहून मला काय फायदा होता ? "

उपेन्द्र म्हणाला, " फायदा तुमचा नव्हता–फायदा होता माझा. प्रत्येकजण आपलं दुःख दुसऱ्याला सांगून तें कमी करून घ्यायचा प्रयत्न करीत असतो. हा मनुष्यस्वभावच आहे. थोडीबहुत छल-चातुरी करून तुम्हाला जर मीं क्लेश

दिले असले, तर तुम्हीं मजवर दया करावी, एवढ्याच हेतूनं ! दुसरा तिसरा कोणताही माझा हेतु त्यांत नव्हता ! ”

किरणमयी कांहीं वेळ गप्प होती, नंतर ती बोलूं लागली. परंतु त्याच्याकडे डोळे वर करून पहावयाचेंही साहस तिला झालें नाहीं.

ती म्हणाली, “ आतां नाहीं बाई माझ्यानें हें सारं ऐकवत, भाऊजी ! हें व्याजस्तुतीचं नाटक आतां पुरे करा ना कृपा करून. तुमच्या त्या मूर्ख माणसावर, तें मूर्ख म्हणून, तुम्ही कमी प्रीति केली असती, तर कदाचित् आणखीही तुमचं बोलणं ऐकतां आलं असतं, अन् थोडीशी दया, सहानुभूतीही तुम्हाला मिळाली असती. परंतु सतीश भाऊजींकडून मी हें सारं ऐकलं आहे. बरं— वाटेल तितकं आपल्या बायकोवर प्रेम करा तुम्ही. पण प्रेम केलं, म्हणजे काय अशा रीतीनें त्याबद्दल जगांत ढोल पिटीत फिरावं लागतं ? स्वतःचं मन दिखील का तुमची थोडीफार अडवणूक करीत नाहीं त्यांत ? ”

किरणमयीचें हें विलक्षण भाषण ऐकून, त्यावर काय बोलावें हे न सुचल्यामुळें उपेन्द्र अगदीं गोंधळांत पडला. बोलण्याची काय ही पद्धति ? काय हा कंठस्वर ! परिहास तर यांत तिळमात्र भासत नाहीं, मग काय हें ? उपहास ? मत्सर ? ईर्षा ? विद्वेष ? आज एवढ्या रात्रीं, या निर्जन दालनांत बसून, आपल्या अगदीं तोंडावर ही विधवा तरूणी कसला आभास व्यक्त करण्याचा कसून प्रयत्न करीत आहे ?

आतां दोघांपैकीं कोणाच्याही तोंडून शब्द येत नव्हता. बराच वेळपर्यंत दोघेंही खालीं मान घालून मुकाट्यानें बसून राहिलीं होतीं.

इतक्यांत बाहेर दरवाज्या आडून मोलकरीण एकवार खांकरली. नंतर थोडेंसें आंत डोकावून ती म्हणाली, “ आतां तर मला रहातां येत नाहीं, वहिनी ! बाहेरचा दरवाजा मी गेल्यावर बंद करायला हवा—”

किरणमयी वर तोंड करून तिच्याकडे पाहून म्हणाली, “ जातेस ? बरं. तर मग थोडे तुम्ही बसा हं, भाऊजी ! मी दरवाजा बंद करून येतें तेवढा.”

असें म्हणून ती उठून बाहेर गेली.

त्या एकान्तांत, एकटेंच बसून उपेन्द्राचें अन्तःकरण अशा कांहीं विलक्षण, अवर्णनीय वैराग्यानें परिपूर्ण होऊन गेलें, कीं साऱ्या जन्मांत तसा अनुभव त्याला पूर्वी कधींही आला नव्हता ! त्याचें उदार, मोकळें,

कलंकहीन चरित्र, स्फटिक-स्वच्छ शुभ्र प्रवाहाप्रमाणें चिरकाल वहात आलें होतें. कुठेंही तिळमात्र बाधा त्याला आली नाहीं ! कधीं, एक दिवसही बिंदुमात्र कलंकाच्या बाष्पाची छाया त्याच्या चरित्रावर पडली नव्हती !

परंतु आज या जनशून्य दालनांत, उपेन्द्राची ती निष्कलंक निर्मलता जणुं काय मलिन होऊन गेली !

## २

मोलकरीण गेल्यानंतर, दरवाजा बंद करून किरणमयी परत येऊन आपल्या जागीं बसली. परंतु वर मान करून तिच्याकडे एकवार पहाण्याचेंही साहस उपेन्द्राला झालें नाहीं.

किरणमयीच्याही हें लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं; परंतु तीही कांहीं न बोलतां, मुकाट्यानें आपलें काम करूं लागली.

याप्रमाणें दहाएक मिनिटें गेलीं.

नंतर किरणमयी हलके हलके बोलूं लागली, " बरं, काय हो भाऊजी, आपणा दोघांना अशा रीतीनं इथं चूपचाप बसलेलीं जर कुणीं आढून पाहिलं, तर त्याला काय वाटेल, सांगा बरं ? "

असें म्हणून ती गालांतल्या गालांत हंसली.

खालीं पहात असल्यामुळें किरणमयीचें तें हास्य उपेन्द्रानें जरी प्रत्यक्ष पाहिलें नाहीं, तरी मनाच्या अन्तर्भागीं त्याचा भास त्याला अगदीं स्पष्ट झाला.

वर मान न करतां तो म्हणाला, " कदाचित् बरं नाहीं वाटणार तें त्याला. "

" तर मग ? "

तिच्याकडे एकवार पाहून उपेन्द्र खिन्न स्वरानें म्हणाला, " काय करूं मी तरी, वहिनी ? कांहींसुद्धां उत्तर मला शोधूनही सांपडत नाहीं ! "

किरणमयी किंचित् मोठ्यानें हंसली आणि म्हणाली, " सांपडत नाहीं ? ठीक आहे. शोधून मीच देतें बाहेर काढून तुम्हाला. परंतु मध्यंतरीं तुम्हाला एक महत्त्वाची बातमी देऊन ठेवतें. माझं हें फ़राळाचं तयार होऊन, खाणं आटोपून, तुम्ही माझा निरोप घेऊन निघून जाईपर्यंत अर्ध्या तासापेक्षां कांहीं अधिक वेळ लागायचा नाहीं. इतका थोडा वेळ तरी तुम्ही प्रसन्न मुखानं बोला. मन असं भारी करून बसून राहूं नका. "

उपेन्द्र कृत्रिमपणें हंसला, आणि म्हणाला, " ठीक, बोला. "

किरणमयी पुनः गालांतल्या गालांत हंसली.

क्षणभरानें ती म्हणाली, " तरी कांहीं हरकत नाहीं. वहिनीच्या शब्दाला मान देऊन तुम्हीं थोडं हंसलां, तुमची भेट झाल्यापासून एक गोष्ट माझ्या मनांत वारंवार येते. पण मी सांगितल्यावर ती उलटीच करून घेऊन तुम्ही माझ्यावर रागावणार तर नाहीं ? "

" नाहीं--रागावूं कशाला ? "

क्षणभर थांबून किरणमयी म्हणाली, " तुम्हाला माहीत असेलच, भाऊजी ! चांगल्या चांगल्या काव्यांत वाचतांच कीं नाहीं ? आमच्या देशांत म्हणा, किंवा इतर देशांत म्हणा, डोळयाच्या पहिल्या नजरेंतच एक प्रकारचं घनदाट प्रेम—बरं, हें शक्य आहे, असं तुम्हाला वाटतं भाऊजी ? "

उपेन्द्राचें मुखमंडळ क्षणार्धात लाल झालें.

तो म्हणाला, " चांगल्या किंवा वाईट, कसल्याच काव्याचं मला फारसं ज्ञान नाहीं, वहिनी ! या सर्व भानगडी माझ्या कल्पनेच्या बाहेर आहेत. "

किरणमयी म्हणाली, " हें कसं शक्य आहे, भाऊजी ? इतकं उच्च शिक्षण तुम्हीं घेतलंत, इतक्या परीक्षा पास होऊन किती बक्षिसं अन् लहान मोठ्या रकमांच्या किती स्कॉलरशिपा तुम्ही मिळविल्यात, अन् काव्याच्या संबंधानं तुम्हाला कांहीं माहिती नाहीं म्हणतां ? शाकुन्तल, रोमियो-जूलिएट हीं दोन्ही नाटकं तुम्हाला कधीं वाचावीं लागलीं नाहींत ? "

उपेन्द्र म्हणाला, " परंतु वाचून परीक्षा पास होण्याच्या उद्योगांत, शक्य अशक्य वगैरे कांहीं निश्चित करावं लागत नाहीं. पुस्तकांत जें छापलं होतं, तें घोटून पाठ करून, परीक्षेच्या वेळां खरडून आलों मी. असं होतं किंवा नाहीं— असा प्रश्न तुमच्याप्रमाणें कोणत्याही परीक्षकानं आम्हांला कधीं विचारला नाहीं. मला तुम्ही क्षमा करा, वहिनी ! परंतु तुमच्या बरोबर ही सर्व चर्चा करण्याचं सामर्थ्य मला नाहीं. "

किरणमयीनं विषण्ण होऊन एक मोठा उसासा सोडला आणि ती म्हणाली, " म्हणूनच तुम्हाला आधीं मी विचारलं होतं, कीं तुम्हांला राग बीग तर नाहींना येणार ? "

" पण राग तर मला बिलकुल आला नाहीं. "

" नसेल आला तर फार उत्तम. "

असें म्हणून किरणमयीनें पेटलेल्या चुलीवर तुपाची कढई चढविली.

कांहीं न बोलतां तीन चार पुऱ्या कढईत टाकून त्या खरपूस तळून बाहेर काढल्यावर किरणमयी मध्येंच म्हणाली, "जी गोष्ट कळावी असं मला उत्कंठेनं वाटत होतं, तिची चर्चा दिखील करावी अशी तुमची इच्छा नाहीं! दैव माझं! परंतु दुसरी एक गोष्ट तुम्हाला विचारतें. विचारूं ?

"बोला"

"प्रेमाला लोक आंधळं कां म्हणतात ?"

उपेन्द्र म्हणाला, "डोळ्यांनीं चांगलं दिसत असतां ज्या रस्त्यानें माणूस जाणार नाहीं, त्या रस्त्यानंही प्रेम त्याला नेतं म्हणून म्हणत असतील तसं, असं मला वाटतं."

किरणमयीनें अत्यंत उत्सुकतेनें प्रश्न केला, "त्या रस्त्यानं नेतं ? तर मग प्रेम आंधळं आहे, ही गोष्ट खरी कां ?"

"हो, खरीच म्हणायची! पुष्कळांच्या पुष्कळशा अनुभवावरूनच अशीं सुभाषितं बनत असतात."

किरणमयी म्हणाली, "फार उत्तम गोष्ट! असं आहे म्हणतां ? पण आंधळा जर खड्डयांत पडला, तर लोक त्याला वर काढतात—त्याच्यासाठीं त्यांना वाईट वाटतं, जें ज्याला साध्य असतं, तसं त्याचं भलं करण्याकरितां प्रत्येकजण झटत असतो. परंतु प्रेमानं आंधळा होऊन माणुस जेव्हां खड्डयांत पडतो, तेव्हां त्याला त्यांतून बाहेर काढण्यासाठीं कुणी धांवून येत नाहीं. उलट, आणखींही त्याचे हातपाय मोडून त्याच खड्डयांत माती लोटून, तो बुजवण्याची त्यांची धडाडी असते! ज्या सत्याचा माणूस प्रचार करतो, जरूरीच्या वेळीं त्याच सत्याचा तो बिलकुल मुलाहिजाही राखीत नाहीं! मी काय म्हणतें तें तुमच्या ध्यानांत आलं ना, भाऊजी ?"

उपेन्द्र मान हलवून म्हणाला, "आलं तर काय झालं!"

किरणमयी म्हणाली, "येईल, अशा कल्पनेनंच तुम्हाला मुळीं मी विचारलं. परंतु तसं असलं तरी असं पहा, दुसऱ्याच्या वेळीं माणुस स्वतःला ठाऊक असलेलं पुष्कळसं जबरदस्तीनं विसरून जाऊं इच्छितो. आंधळ्याला डोळसाची शिक्षा देऊन आपण मोठी बहादुरी केली, असं समजतों. दुसऱ्याचा न्याय करतांना, ही गोष्ट त्याच्या कधीं मनांतही येत नाहीं, कीं डोळे गेल्यावर

तो स्वतः खड्डयांत पडण्याची शक्यता त्या माणसापेक्षां तिळभरही कमी असत नाहीं. ”

उपेन्द्राला तिच्या या भाषणाचा विस्मय तर वाटलाच; पण त्याचें मन अप्रसन्नही झालें.

तो म्हणाला, “ नाहीं, हें मीही कबूल करतों. परंतु तुम्ही ही सर्व चर्चा कशासाठीं चालविली आहे, हें माझ्या कांहीं लक्षांत येत नाहीं, वहिनी ! खरी असो अगर खोटी असो, तुमच्या आयुष्यक्रमाशीं या मीमांसेचा कांहीं दिखील संबंध नाहीं. ”

उपेन्द्र अप्रसन्न झाला आहे, हें लक्षांत येऊनही किरणमयी हंसली.

त्याच्याकडे तीव्र नजर टाकून ती म्हणाली, “ आंधळा चर्चा करून कांहीं खड्डयांत पडत नाहीं, भाऊजी ! पडल्यानंतर करतो. मी पडलें नाहीं, किंवा पडण्यासाठीं तिकडे त्वरेनं जात नाहीं, हें तरी तुम्हाला कसं कळलं ? ”

उपेन्द्र म्हणाला, “ पण तुम्ही तर कांहीं आंधळ्या नाहीं ! तुमचे हे मोठ मोठे दोन डोळे मला चांगले दिसताहेत, वहिनी ! ”

किरणमयी म्हणाली, “ सगळी मुष्किल आहे ती इथंच, भाऊजी ! दोन तऱ्हेचे आंधळे असतात कीं नाहीं, म्हणून ! जे डोळे मिटून चालतात, त्यांच्या संबंधानं तर कांहीं काळजी करायची जरूरीच नाहीं–त्यांना ओळखतां येतं. परंतु जे डोळे उघडे ठेवून चालतात, परंतु ज्यांना दिसत नाहीं, त्यांच्या बाबतींत काय तो सारा घोटाळा होतो ! ते स्वतःही फसतात, अन् दुसऱ्यांनाही फसवल्यावांचून सोडीत नाहींत ! ”

उपेन्द्र कुंठित होऊन बसून राहिला.

त्याच्याकडून कांहीं उत्तर येत नाहीं असें पाहून, किरणमयीची उत्सुकता एकदम अतिशय वाढली आणि तिनें विचारलें, “ बरं, माझे दोन मोठाले डोळे आपण पहात आहों असं तुम्ही म्हणालां, भाऊजी, तें तुम्हीं कधीं पाहिले, असं तुम्हाला विचारलं तर चालेल का ? ”

उपेन्द्र म्हणाला, “ तुमच्या पतीच्या निधनानंतर त्या दिवशीं तुम्हाला ज्यानं पाहिलं, तो तुम्हाला जन्मांत कधींही विसरूं शकणार नाहीं. आपण आंधळ्या आहों असं तुम्हाला स्वतःविषयीं कां भय वाटतं, तें तुमचं तुम्हाला ठाऊक ! परंतु मला पक्कं ठाऊक आहे, कीं ती गोष्ट खरी नाहीं. त्या दिवशीं तुमच्या दोन्ही डोळ्यांत जी ज्योत मला पहायला मिळाली, तीवरून माझी अशी पक्की खात्री

झाली आहे, कीं अंधार कितीही घनदाट बनून तुम्हाला चहूंकडून घेरो, तुम्हाला भुलवणं त्याला कधींही शक्य नाहीं. योग्य रस्ता पाहूनच तो आक्रमीत सारा जन्म घालवाल, यांत शंकाच नाहीं. ”

किरणमयी कांहीं क्षण अगदीं गप्प बसून राहिली.

नंतर ती म्हणाली, “ इतक्या अवधीनंतर गोष्ट माझ्या ध्यानांत आली असावी, असं मला वाटतं, भाऊजी ! त्या दिवशीं, कां, कसं कोण जाणं, माझं सारं चैतन्य हरपून त्यांच्या पायांच्या तळाशीं मी पडून राहिलें. हें पाहून तुमची अशी कल्पना झाली असावी, असं मला वाटतं. ”

उपेन्द्र मस्तक हलवून म्हणाला, “ शक्य आहे. परंतु तें दृश्य कधीं जन्मांत कुणी विसरेल का, वहिनी ? ”

त्याचा हा उद्गार ऐकून किरणमयी किंचित् हंसली.

नंतर चार दोन क्षण गप्प बसून ती अगदीं असंकोचानें, अगदीं सहज वाणीनें म्हणाली, “ तुमची कल्पना चुकीची झाली असावी, असंच मला वाटतं. माझं तर माझ्या पतीवर मुळींच प्रेम नव्हतं. ”

किरणच्या तोंडून अकस्मात् बाहेर पडलेल्या या शब्दांनीं उपेन्द्र हतबुद्ध होऊन निःस्तब्धपणें तिच्याकडे पहातच राहिला.

क्षणभरानें किरणमयी पुढें म्हणाली, “ खरोखरच, माझं त्यांच्यावर कधीं एक दिवसही प्रेम नव्हतं. अन् केवळ माझं प्रेम नव्हतं असं नाहीं, तर त्यांचंही माझ्यावर नव्हतं. खरोखरच त्या दिवशीं माझं सारं भान अन् ज्ञान हरपलं—”

इतकें बोलून स्तंभित झालेल्या उपेन्द्राच्या चेहऱ्याकडे टक लावून ती एकदम थांबली.

परंतु दुसऱ्याच क्षणीं बलपूर्वक सर्व विचार बाजूला सारून ती म्हणाली, “ नाहीं—भिऊन आतां मला चालायचं नाहीं. तुमच्याजवळ माझी सर्व हकिगत आज मला सांगितलीच पाहिजे. ”

मोठ्या कष्टांनीं चेहरा वर करून उपेन्द्र तिच्याकडे पाहून म्हणाला, “ कां चालणार नाहीं ? माझी बिलकुल ऐकायची इच्छा नसली, तरी मला ती ऐकलीच पाहिजे—हा जुलूम कां ? ”

किरणमयी म्हणाली, याचं कारण, तुम्ही माझे गुरु आहां, भाऊजी ! तुमच्याजवळ सर्व कांहीं कबूल केल्याशिवाय मला कोणत्याही रीतीनं शांति मिळायची नाहीं. ”

उपेन्द्र स्थिरपणें तिच्याकडे पहात राहिला.

किरणमयी मृदु, पण दृढ स्वरानें बोलूं लागली, " माझ्यामध्यें जी गंभीर सखोल अन्तर्दृष्टि तुम्हाला दिसली, भाऊजी! ती नजरेची फसवणूक नव्हती, अगदीं खरीखुरी होती ती. परंतु ती अगदीं क्षणिक, भंगुर होती. पतीवर माझं कधीं एक दिवसही प्रेम नव्हतं; परंतु कायामनानं त्यांच्यावर प्रेम करण्याच्या प्रयत्नाला मीं सुरवात केली होती. परंतु ते वांचले नाहींत अन् माझा प्रयत्नही स्थिर झाला नाहीं. पुस्तकांतून ज्या कांहीं गोष्टी मीं वाचल्या होत्या त्या कधीं मला खोट्या वाटत, तर कधीं त्या नुसत्या कवि-कल्पना असाव्या, असंही मला वाटे. कधीं कधीं मनांत अशीही कल्पना येई, कीं कदाचित् माझ्यामध्यें प्रेम करण्याची शक्तिच नसेल, म्हणून मला असं वाटतं. ती शक्ति माझ्यामध्यें आहे कीं नाहीं, त्याची आजही मला कल्पना नाहीं, भाऊजी! परंतु प्रेमाची लालसा माझ्यामध्यें किती तीव्र आहे, हें तुम्हाला मी पहिल्यानं पाहिलं, त्या दिवशीं माझ्या लक्षांत आलं. तुम्हीच माझे गुरू, भाऊजी!"

क्षणभर किरणमयी थांबली.

नंतर कांहींसें आत्मगत भाषण केल्याप्रमाणें ती पुढें बोलूं लागली, " दोन दिवसांनीं तुम्ही इथून निघूनही जाल. पुन्हां कधीं जेव्हां तुमची भेट दैवयोगानं होईल, तेव्हां स्वतःची कहाणी सांगण्यासारखी माझ्या मनाची स्थिति कदाचित् असणारही नाहीं. कदाचित् ती सांगण्याचीच मला भयंकर शरम वाटून मला अगदीं मेल्यासारखं होईल. नाहीं, भाऊजी! तें व्हायचं नाहीं. आजच तुम्हाला माझी सर्व कहाणी ऐकवीन, तेव्हांच मला हायसं वाटेल!"

उपेन्द्र कातर स्वरानें म्हणाला, " वहिनी, आज निरनिराळ्या कारणांनीं तुमचं मन अतिशय क्षुब्ध होऊन गेलं आहे, असं मला स्पष्ट दिसतं. अशा स्थितींत काय बोलणं योग्य, काय योग्य नाहीं, याचा नीट विचार करतां न आल्यामुळं— नाहीं, नाहीं, वहिनी, पुन्हां कधीं तरी येऊन एक दिवस मी तुमची सारी कहाणी ऐकून जाईन—पण आज नको. माझं तुम्हांला हें अगदीं आग्रहपूर्वक सांगणं आहे."

किरणमयी म्हणाली, " अगदीं यासाठींच तर आजच सगळी कहाणी तुम्हाला ऐकवण्याची इच्छा आहे माझी, भाऊजी! कदाचित् पुढं लज्जा उत्पन्न होऊन माझा घात करील, किंवा संसाराच्या बऱ्या वाईट विषयींची बुद्धि माझा गळा आवळून धरील. आज मला राखून-झांकून, समजून-उमजून, सजवून

सोडून बोलणं शक्य नाहीं अन् तशी माझ्या मनाची आज प्रवृत्तीही नाहीं. म्हणून सांगण्यासारखा दिवस कुठला असेल, तर तो आजचा. कदाचित् यापुढं तुम्ही या जन्मांत माझं तोंड पहाणार नाहीं. म्हणून माझी प्रार्थना अशी आहे, कीं आणखी कांहीं वेळ ही दुर्बुद्धि, हा उन्माद माझ्या मनांत कायम असूं दे.—म्हणजे तुमच्या समोर अगदीं सगळं सगळं कांहीं खुलं खुलं मला बोलतां येईल ! ”

तिच्या चेहऱ्याकडे पाहून उपेन्द्राचें निर्मल, शुद्ध, सदन्तःकरण कसल्या तरी अज्ञात भयानें अगदीं त्रस्त होऊन गेलें.

एकवार तिला थांबवण्याचा अखेरचा प्रयत्न करून पहावा, या हेतूनें तो म्हणाला, “ वहिनी, माणुस तिथून त्याच्या गुप्त गोष्टी म्हणून असतातच. त्या कुणासमोरही खुल्या करण्याची बिलकुल कांहीं आवश्यकता नसते—उलट, त्या प्रकट करण्यांतच अधिक अकल्याण होतं. ही केवळ तुमची माझी गोष्ट मी सांगत नाहीं—सर्व सामान्य लोकांसंबंधानंच असं म्हणतां येईल. ”

किरणमयी यावर कांहींच बोलली नाहीं. तिच्या साऱ्या पुऱ्या आतां तळून झाल्या होत्या. एका ताटांत त्या नीट टापटिपीनें ठेवून उपेन्द्रासमोर तिनें तें ताट नेऊन ठेवलें.

नंतर ती म्हणाली, “ तुम्ही खायला सुरवात करा. माझी कहाणी तोंपर्यंत मी संपवितें.

“ पण नाहीं सांगितलीत तर काय होईल, वहिनी ? ”

किरणमयी म्हणाली, “ मी हात जोडून तुमची प्रार्थना करतें, भाऊजी, कीं मला आतां हरकत घेऊं नका. माझी सर्व कहाणी ऐकल्यावर, तुम्हाला वाटलं तर सासूबाई बरोबर माझाही भार तुम्ही घ्या. इच्छा नाहीं झाली, तर माझा स्वतःचा रस्ता मी शोधून काढीन, मीं पुष्कळांना फसवलं आहे, भाऊजी ! परंतु तुम्हाला मी ठकवूं शकत नाहीं. ”

“ तर मग बोला. ” असें म्हणून विमनस्कपणें एक पुरी घेऊन तिचा लहानसा तुकडा उपेन्द्रानें तोंडांत कोंबला.

किरणमयी म्हणाली, “ तुम्हाला मी सांगितलंच, भाऊजी, कीं पतीवर माझं मुळींच प्रेम नव्हतं अन् त्यांचंही प्रेम मला मिळालं नाहीं. परंतु त्याबद्दल मला कधींही खेद वाटत नाहीं. घरांत फक्त दोन माणसं–हे अन् सासूबाई. एकजण नुसते तत्त्वज्ञानी—माझ्याकडून खूब खूब वाचून घेण्यांतच त्यांना आनंद

व्हायचा; अन् दुसरं माणूस भयंकर स्वार्थी अन् आपमतलबी. प्राणापलीकडे माझ्याकडून श्रम करून घेण्यापेक्षां दुसऱ्या कशांतच त्यांना आनंद वाटत नसे. अशा रीतीनं माझ्या आयुष्याचे दिवस चालले होते. अन् असेच पुढंही गेले असते, असं म्हणायला हरकत नाहीं. परंतु एक वेळ अकस्मात् सर्व अगदीं उलटच्या पालटं होऊन गेलं! हे पडले खूब आजारी. त्यांच्याजवळ मी खूब पुस्तकं वाचून काढलीं. नाटकं कादंबऱ्याही कांहीं कमी वाचल्या असं नाहीं. परंतु वाचल्यावर आम्ही दोघंही खूब खूब हंसायचीं. प्रेमाचा किंवा ममतेचा वास-गंधही आमच्या घरीं कधीं नव्हता! त्यामुळें एक एक माणूस ज्याप्रमाणें जन्मान्ध किंवा जन्म-बधिर असतो, त्याप्रमाणें माझे पतिराज होते जन्म-नीरस! परंतु माझ्यामध्यें किती रस होता तें त्या वेळेपर्यंत जरी मला कळून आलं नव्हतं, तरी प्रेम करायची अन् प्रेम परत मिळवायची तहान माझ्यामध्यें इतर कोणंस्याही तरुण स्त्रीपेक्षां बिलकुल कमी नव्हती, हें एक दिवस एकाएकीं मला कळून आलं. अंहं–नाहीं नाहीं हं–इतक्यांतच असं सारं बाजूला सारून चालायचं नाहीं बरं का—"

उपेन्द्र विरक्त स्वरानें, खालीं मान घालून म्हणाला, "कोण जाणें कां तें, पण खायला बरं नाहीं लागत वहिनी!

किरणमयी चार दोन क्षण कसला तरी विचार करीत स्तब्ध बसली. नंतर ती म्हणाली, "मला ठाऊक आहे भाऊजी! आणखी थोड्या वेळानं पुरी भाजीचा स्वाद तुमच्या जिभेला अगदीं विषासारखा लागल्यावांचून रहायचा नाहीं! परंतु ती वेळ अजून थोडी दूर आहे. आणखीं एकाद दुसरी पुरी तुम्हांला खातां आली असती!"

उपेन्द्राचा चेहरा अधिकच काळवंडला.

त्याच्याकडे स्थिर दृष्टि लावून किरणमयी बोलूं लागली, "मी जर तुम्हाला म्हटलं, कीं तुम्हीं हें न खाल्याचं दुःख माझा स्वतःचा हा उजवा हात गळून पडल्यापेक्षांही मला अधिक वाटेल, तर त्यावर कांहीं तुमचा विश्वास बसायचा नाहीं. पण तुम्ही विश्वास ठेवा अथवा न ठेवा, परंतु हें अगदीं खरं आहे, हें मला माहीत आहे. तरी पण मला थांबतां कांहीं यायचं नाहीं, भाऊजी! सारी हकीगत सांगितली पाहिजेच मला—त्याशिवाय गत्यन्तर नाहीं."

"बरं तर—बोला."

"सांगतें. पतिराजांच्या दुखण्यांत फक्त माझे दागिने तेवढे सोडून, संचित

असं जें जें कांहीं होतं, तें तें एक एक असं सारं हळुहळू गेलं. तेव्हां अवतरले एक ताजे पास झालेले डॉक्टर आमच्या संसारांत ! बरं-काय हो भाऊजी ! अनंग डॉक्टरला तुम्हीं पाहिलं होतं, नव्हे काय ? ”

उपेन्द्र संक्षेपानें म्हणाला, “ हो. ”

विषवत् कटु हास्य करून किरणमयी म्हणाली, “ हो–तोच. माझं कपाळच मेलं फुटकं ! या खोलींत पतिराज मरत पडलेले, तर मी गेलें त्या खोलींत त्याच्याशीं प्रेमाची जळजळीत तहान भागवायला—”

खालीं मान घालून उपेन्द्र निस्तब्धपणें बसून राहिला होता. त्यानें एकवेळही वर पाहिलें नाहीं.

किरणमयी पुनः बोलावयाला प्रारंभ करणार होती. परंतु कोणी तरी तिचा गळा जोरानें दाबून धरून तिचा जणूं शब्दच बंद करून टाकला होता !

कांहीं वेळ जोराचा प्रयत्न करून शुष्क स्वरानें ती बोलूं लागली, “ मीं सांगितलेलं ऐकून तुम्हीं मान खालीं घातलीत, भाऊजी ! तरी त्या मेल्या अनंग डाक्तरची खरी पछान तुम्हाला नाहीं ! असती तर तुम्हाला कळून आलं असतं, कीं वर्षामागून अनेक वर्षांच्या भयंकर दुष्काळाची आग माझ्या या काळजांत एकवट होऊन नुसती धगधगत होती म्हणूनच ही अशक्य गोष्ट शक्य होऊं शकली ! तुम्हाला ठाऊक आहे, भाऊजी ? महाभयंकर तहान लागली असतां माणुस गटारांतलं काळंकुट्ट घनदाट पाणीही ओंजळीच्या ओंजळी भरून तोंडांत ओततो ना ? तशा प्रकारची होती माझी दिखील ही तहान ! परंतु हें मला कळलं केव्हां, विचाराल, तर तें पाणी घशांत ओतल्यावर ! त्यानंतर–उः ! सर्वांगांतूनच जणूं असह्य उलट्या होताहेत अशा भयंकर किळसवाण्या भावनेंत माझे दिवस चालले होते ! काय, कसं सांगू ?—”

बोलतां बोलतां तिच्या नखकेशांत सर्व शरीराला एकसारखे भयंकर शहारे येत होते. एक दुर्गंधपूर्ण भयंकर विषारी उलटी तिच्या अगदीं गळ्याच्या टोंकापर्यंत उसळून उठली होती ! परंतु तिनें ती कशीबशी दाबली.

कांहीं क्षण स्तब्ध बसून, आपणाला सांवरून घेण्याचा प्रयत्न करून ती म्हणाली, “ परंतु उलटी करून खळमळ सारी ओकून टाकणंही मला शक्य झालं नाहीं. सासूबाईनीं जोरानं माझं तोंड दाबून धरलं होतं. अनंग डॉक्टर त्यावेळीं संसाराचा अर्धा भार संभाळीत होता ना ! ”

पथ्थराच्या घडीव मूर्तीप्रमाणें उपेन्द्र तशाच एका स्थितींत निःस्तब्ध बसून राहिला होता.

त्याच्या निःशब्द, खालीं वांकलेल्या मुखाकडे एक तीव्र कटाक्ष टाकून किरणमयी म्हणाली, " यानंतर आसक्ति अन् तिरस्कार, तृष्णा अन् विरक्ति यांच्या एकसारख्या चाललेल्या संघर्षात जें तीव्र विष रात्रंदिवस बाहेर पडत होतं, भाऊजी, तितकं भयंकर विष, देवदानवांच्या मंथनांत मंदारगिरीच्या ताडनांत जर्जर झालेला वासुकिही, मला वाटतं, आपल्या जंगी फणेंतून बाहेर टाकूं शकला नसेल ! माझ्या मनांत येतं, कीं या घरची प्रत्येक वीट, लांकूड, दरवाजा, खिडकी, बहाल, बरगा विषानं निळीं काळीं पडलीं असतील ! "

तरीही उपेन्द्र गप्पच होता.

क्षणभर थांबून किरणमयी पुढें म्हणाली, " किती दिवसांनीं, या विष-प्रकरणाचा कोणत्या रीतीनं अंत झाला असता, तें मला कळत नाहीं ! निर-निराळ्या तऱ्हेनं, किती किती तरी मीं विचार केला; परंतु कोणत्याही बाजूला मुक्ततेचा कोणताही मार्ग माझ्या दृष्टीला पडेना ! परंतु कोणतं अमृत हातीं घेऊन तुम्ही आमच्या घरीं अवतरलां, भाऊजी, त्याचं मला वर्णनही करतां येत नाहीं ! तुमच्या उदयानं विषाच्या दारुण ज्वाला आपोआप विझल्या अन् मनांत भयंकर उसळ्या घेणाऱ्या द्वेष विरक्ति वगैरे भावनाही जागच्या जागीं विरून गेल्या ! डोळ्याचं पातं लवतं न लवतं इतक्या अवकाशांत सर्व कांहीं मला इतकं तुच्छ, क्षुद्र वाटूं लागलं, कीं अनंगाला निरोप द्यायला मला एक मिनिटही लागलं नाहीं ! तुम्हीं येऊन, जणूं काय माझ्या कानांतल्या कानांत कांहीं उपायाचा मंत्र सांगून निघून गेलां ! बायकामाणसांची दागिन्यांवर किती विलक्षण आसक्ति असते, हें तुम्हांला माहीत आहेच. माझ्या विषम दुःखी संसारांतले माझे दागिने म्हणजे जणूं काय माझ्या हृदयाच्या पिंजऱ्यासारखे मला वाटत ! आतां या वेळीं मान खालीं घालून ज्या जागेवर तुम्ही बसलां आहां, भाऊजी, त्याच, त्याच जागीं माझ्या छातीच्या त्या बरगड्या मी त्यांच्या पायांशीं आणून खसकन् ओतल्या. माझ्यासंबंधाची त्या डॉक्टरड्याची आसक्ति कितीही मोठी असली, तरी इतके दागिने हातीं पडल्यावर तो आपलं काळं तोंड मला फिरून कधींही दाखवणार नाहीं, मला आपल्या नागपाशांतून सोडून तो निघून जाईल अन् जन्मभर पुन्हां माझ्या वाटेला जाणार नाहीं हा मंत्र जणूं तुम्हीच मला शिकवलात, भाऊजी ! उः ! कोसळलेल्या दारुण

दुर्दशेच्या दाबाखालीं एक दिवस माझे सारे दागिने उडून नाहींसे होतील, अशी किती भीति काळजी रात्रंदिवस माझा सारखा छळ करीत होती. ते तर गेलेच ! त्यांना तर धरून पकडून ठेवूं मी शकलें नाहींच. पण आः ! केवढा तो विलक्षण ब्रह्मानंद ! मनाचं केवढं समाधान, तृप्ति ! अशाच एका अंधाऱ्या सायंकाळीं त्या दागिन्यांच्या लोभानं त्यानं आपल्या किळसवाण्या शेंपटीचा पाश माझ्या सर्व देहावरून काढून घेतला अन् मला पूर्ण मोकळं करून तो चोराप्रमाणं मुकाट्यानें इथून चालता झाला. त्या दिवशीं झालेला आनंद मी जन्मांत कधीं विसरणार नाहीं ! मला आनंदाची उसळी आली–मी वांचलें–मी वांचलें--मी पुरी वांचलें ! ”

एके दिवशीं सकाळीं आपल्या आणि सतीशाच्या मधून अनंग डॉक्टर चोराप्रमाणें हळूच कसा निसटून गेला, तें आतां उपेन्द्राला चांगलें आठवूं लागलें ! परंतु एक शब्दही न बोलतां तो तसाच स्तब्ध राहिला.

किरणमयी पुढें म्हणाली, “ त्या रात्रीची माझी उग्र विकट मूर्ति तुम्हाला आठवते का, भाऊजी ? त्या दिवशीं काय काय लक्षणं थेरं थेरं मीं केलीं ! आड लपून राहून तुमचीं भाषणं ऐकणं, खालीं येऊन तुमच्यावर डोळे तांबारून निरनिराळ्या तऱ्हेनं मोठं भय दाखवणं, वगैरे प्रकार मीं केल्यावर तुम्ही सारे मग निघून गेलां. स्वतःच निर्माण केलेल्या विषाची केवढी भयंकर ती ज्वाला ! परंतु तिच्या बदल्यांत मला दोन वस्तु मिळाल्या, भाऊजी ! माझा जणूं स्वर्ग तो— माझं जणूं अमृत तें ! श्रीरामचंद्राच्या पायाच्या स्पर्शानं पाषाण अहल्या ज्याप्रमाणं माणुस अहल्या बनली, त्याप्रमाणं मीही जणूं अजिबात बदलून गेलें ! अहल्येला मनुष्यरूप मिळाल्यावर तिला काय लाभ झाला, हें मला ठाऊक नाहीं; परंतु मला जें कांहीं मिळालं, त्याला तुलनाच नाहीं ! मला भाऊ नव्हता तर सतीश भाऊजी आईच्या पोटांतून आलेल्या भावाप्रमाणें मला मिळाले. अन् मिळालांत तुम्ही—छीः ! असे अगदीं काळवंडून जाऊं नका, भाऊजी ! पुरुष माणसाला का इतकी लज्जा शोभते ? ”

उपेन्द्रानें बलपूर्वक मान ताठ केली आणि तिच्याकडे तीक्ष्ण दृष्टीनें पहात तो दृढ स्वरानें म्हणाला, “ जी शरमेची गोष्ट, ती बायकांना काय किंवा पुरुषांना काय, सारख्याच शरमेची, वहिनी ! हें सारं ऐकायची मला बिलकुल इच्छा नाहीं. एक तर तुम्ही आतां गप्प रहा, नाहीं तर या क्षणीं उठून मी इथून चालता होईन—”

किरणमयी म्हणाली, “ जोर करून का ? ”

उपेन्द्र म्हणाला, “ हो—जोर करून. ”

किरणमयी म्हणाली, “ तर मग मी दिखील जोर करून तुम्हाला इथं डांबून ठेवायची शिकस्त करीन, पण तुम्हाला मी एक सांगून ठेवने भाऊजी ! या जोराच्या परीक्षेंत झाला तर मला लाभच होईल—नुकसान कांहीं व्हायचं नाहीं. ”

तिनें दिलेलं हें उत्तर ऐकून उपेन्द्र खालीं मान घालून बसून राहिला.

किरणमयी पुनः हंसली आणि म्हणाली, “ भिऊं नका भाऊजी ! भ्यायचं कांहीं कारण नाहीं बरं ! तुम्हाला तुमची इच्छा नसतां तुमच्या गळ्यांत पडून तुमच्या अंगावर मी हात टाकीन, इतका उन्माद अजून मला चढला नाहीं ! इच्छा असेल तर तुम्ही खुशाल उठून चला. मी तुम्हाला बिलकुल हरकत करणार नाहीं. ”

खालीं मान घालून उपेन्द्र स्तब्धपणें बसूनच राहिला.

मेघांनीं झांकलेला चंद्र जरी दृष्टीला प्रत्यक्ष दिसत नसला, तरी चंहूंकडे पडलेल्या अस्पष्ट ज्योत्स्ना प्रकाशाच्या खाणाखुणांनीं खरोखरची मूळ वस्तु जाणतां येते; त्याप्रमाणें या दोघां स्त्री-पुरुषांचा गुप्त परिचय संबंधही इतका वेळपर्यंत तितकाच आड आड राहिलेला होता. परंतु आतां झपाट्याचा वारा सुरू झाला होता; मेघ त्वरेनें बाजूला सरून इतस्ततः परतत होते ! मनाच्या अन्तर्भागांत उपेन्द्राला ही जाणीव अगदीं निश्चितपणें झाली असून तो तेथून पळून सुटका करून घ्यावयाचा प्रयत्न करीत होता. परंतु त्याचे ते सर्व प्रयत्न अगदीं फुकट गेले होते !

अकस्मात वाऱ्याचा एक जबरदस्त झपाटा येऊन सगळें आवरण फाटून जाऊन, जितक्या दूरवर नजर जाऊं शकत होती, तेथपर्यंत सगळें आकाश अगदीं मोकळें पडलें होतें !

किरणमयी आस्ते आस्ते बोलूं लागली, “ जाऊं दे सारं ! तुमच्यावर माझं प्रेम जडलं आहे, ही जाणीव तुम्हाला देऊन मी मोकळी झालें आहे ! आतां तुमच्या मर्जीला येईल तें तुम्ही करा—वाटेल तसें वागा—मला बोलण्यासारखं आतां कांहींच नाहीं. आंधळ्या आशेनें फसून मीं ही जाणीव तुम्हाला दिली, असं मात्र तुम्ही समजूं नका, भाऊजी ! तुम्हांला मी चांगली ओळखतें. मला

पुरंपुरं ठाऊक आहे, कीं हें सारं निष्फल आहे—क्षक म्हणून येऊन तुम्ही भक्षक होणं शक्य नाहीं. अगदीं आकाश कोसळलं तरीही नाहीं, हें मला पक्कं ठाऊक आहे ! ”

इतक्या वेळानंतर उपेन्द्रानें कोठें तोंड उघडलें ! मृदु स्वरानें तो म्हणाला, “ इतकी श्रद्धा, इतका भरंवसा जर माझ्याविषयीं तुम्हाला होता, तर तुम्हीं मुळीं मला ही जाणीव दिलीतच कशाला ? ”

किरणमयी म्हणाली, “ याला दोन कारणं आहेत. पहिलं कारण हें कीं, जर मी जाणीव दिली नसती तर मला चक्क वेड लागलं असतं. अन् दुसरं कारण तुम्हाला सगळं सगळं समजावून दिल्याशिवाय तुमचा आश्रय घेणं मला अगदीं अशक्य होतं. तसाच तो जर मी घेतला असता, तर सुरबालाच मला खाऊं घालते आहे, वस्त्र देते आहे, असंच केवळ मला वाटलं असतं; परंतु आतां ह्या नंतरही तुम्हीं जर माझा भार घेतला तर मी तुमचंच खातें पितें आहे—दुसऱ्या कुणाचं नाहीं, असंच मला वाटेल. बरं, काय हो, भाऊजी ! सुरबालेला माझी कहाणी सांगणार का तुम्ही ! ”

मान हालवून उपेन्द्र म्हणाला, “ नाहीं. ”

किरणमयीनें विचारलें, “ कां नाहीं ? ऐकून तिला वाईट वाटेल म्हणून ! ”

उपेन्द्र म्हणाला, “ नाहीं वहिनी ! तिला वाईट वाटणार नाहीं. तशी ती मारीच भोळी अन् बावळट आहे. गृहस्थाघरची बायको आपल्या नवऱ्याशिवाय दुसऱ्या कुणावर कोठल्याही परिस्थितींत कधीं प्रेम करूं शकेल, ही गोष्ट हजार वेळ सांगितली, तरी तिच्या माथ्यांत शिरणार नाहीं. बरं वहिनी, आतां परवानगी द्याल, तर मी उठतों. ”

या शब्दांनीं किरणमयीच्या मनावर तीक्ष्ण आघात झाला.

परंतु तसें कांहीं न दाखवितां, जणूं सहज स्वरानें ती बोलली, “ परवानगी दिल्याशिवाय कांहीं गत्यन्तरच नाहीं—दिलीच पाहिजे परवानगी. पण आणखी थोडा वेळ बसा, भाऊजी ! तुमच्यावर माझं प्रेम जडलं आहे, इतकंच फक्त तुम्हाला मी सांगितलं. पण तुम्हाला विसरून जायचीही माझी इच्छा होती, आज ही गोष्टही मला तुम्हाला सांगितली पाहिजे. परंतु या बाबतींत माझा गुरु कोण, ठाऊक आहे, भाऊजी ? ती मूर्ख बावळटांची पुढारी, धाकटी सून म्हणून तुमच्या घरांत घुसली आहे, तीच पोरगी ! ”

उपेन्द्राच्या चेहऱ्यावर विस्मयाचा थोडा भास प्रतिबिंबित झालेला पाहून

किरणमयी म्हणाली, "हो-तीच! तुम्ही सर्व मंडळी जिला 'पशुराज' म्हणून परिहास करतां. ती सुरबालाच माझा गुरु आहे, तुम्ही जें शिकवलंत, तें मीं विसरून जावं, अशी तिची इच्छा! ती मला परम पूज्य गुरुजन आहे!"

उपेन्द्र स्तब्धपणें बसून राहिला.

किरणमयी पुढें बोलूं लागली, "तुम्हाला मी पुनः पुन्हां सांगतें आहें, भाऊजी, कीं आज माझ्या लाजलज्जेच्या होत्या नव्हत्या त्या सगळ्या निधानावर मी जी तिलांजलि दिली, ती सगळा सगळा परिणाम पूर्ण जाणून! मला ठाऊक आहे तुमची सुरबाला आहे, अन् दुसरं काय तुमच्या जवळ आहे म्हणाल, तर तुमची कठिण, निष्ठुर पवित्रता! ती स्फटीकाप्रमाणं स्वच्छ अन् वज्राप्रमाणं बळकट आहे! तिच्या शुभ्र देहाला मी डाग लावूं शकेन, हें मला केवळ असाध्य आहे! परंतु तुम्हाला हें ठाऊकच आहे, भाऊजी, कीं माणसाला जें साध्य नाहीं, त्याच्याविषयींच त्याला भयंकर लोभ असायचा, असाच त्याचा दुर्भागी स्वभाव! परमेश्वराची प्राप्ति होत नाहीं, म्हणून तर माणूस असा सर्व प्रयत्नांनीं सर्वस्व अर्पण करूनही त्याला मिळवण्याचा अट्टाहास करतो! म्हणून माझ्या मनांत येतं, कीं तुम्ही जर संपूर्णपणं मला अलभ्य अशी वस्तु नसतां, तर तुमच्यावर माझं असं गाढ प्रेम जडलंच नसतं! हूंः—पण जाऊं दे त्या साऱ्या रडकथा!"

कांहीं क्षण किरण गप्प बसली.

नंतर एकाएकीं मोठा एक उसासा टाकून ती म्हणाली, "एकलव्याचा ज्याप्रमाणं द्रोण गुरु; त्याप्रमाणं माझा गुरु सुरबाला! परंतु हें कसं घडून आलं, ती हकीगत सांगून आज तुम्हाला मी रजा देतें. जिथं तुम्ही फराळाला बसलां आहां, भाऊजी, तिथंच, एक दिवस रात्रीं सतीश भाऊजी असेच खायला बसले होते. कोणत्या विषयावरून आठवत नाहीं, पण तुमच्या दोघांची गोष्ट निघाली. तुमची गोष्ट निघाली, कीं बंधुराज अगदीं बेहोष होऊन जातात, हें माहीतच आहे तुम्हाला! अशा वेळीं त्यांना संभाळणं मोठं कठीण काम होऊन जातं! त्यावेळीं माझी स्वतःची दिखील जवळ जवळ तीच अवस्था झाली होती. प्रेमाचं मद्य मात्र भरभरून मी नुकतंच घेतलं असल्यामुळें तुमच्या नशेनं माझे हातपाय अगदीं लुळेपांगळे झाले असून दोन्ही डोळे अगदीं धुंदकारल्यासारखे झाले होते. अशा वेळीं सतीशभाऊजी किती दृष्टान्त, किती पुरावे देऊन, तुमचं सुरबालेवर केवढं गाढ प्रेम आहे, हें

सांगण्यांत अगदीं मशगुल होऊन गेले होते ! सुरबालेला एकदां नुसतं गोवरं आलं असतां, खाणं पिणं झोंप वगैरे सर्व सोडून तुम्ही तिची शुश्रूषा करीत होतां. कधीं एकदां तुमचं माथं धरलं होतं म्हणे, तेव्हां हातीं पंखा घेऊन तुम्हाला वारा घालीत तिनं सारी रात्र तुमच्या उशाशीं बसून, जागून काढली —अशा दिवस रात्रीं घडलेल्या लहान-मोठ्या घटनांच्या किती तरी कहाण्या ! सतीशभाऊजींनीं तरी या साऱ्या ऐकलेल्या गोष्टी ! कदाचित् कांहीं त्यांत खोट्या असतील, कांहीं अतिशयोक्तीच्याही असतील; परंतु त्यामुळं आम्हा उभयतांपैकीं कुणाचंही कांहीं नुकसान झालं नाहीं ! तुम्हा नवराबायकोमध्यें या प्रेमाची गंगा वहात जात आहे, तींत, आम्ही दोघं बहीणभावंडं पहातां पहातां बुड्या मारूं लागलों—अगदीं तळापर्यंत जाऊन त्या गंगेचा ठाव घेऊं लागलों. त्यानंतर, खूब रात्र झाल्यावर सतीश भाऊजी आपल्या बिऱ्हाडीं निघून गेले. पण मी मात्र इथं सैंपाकघरांतच बसून राहिलें. किती वेळ अशी मी बसून राहिलें होतें कोण जाणे ! बाहेर पडून पहातें, तो आकाशांत समोर शुक्राची चांदणी चमचम करीत होती ! मला एकदम वाटूं लागलं, सुरबालेचं मुखमंडळ जणूं असंच असेल ! असंच मधुर, असंच उज्ज्वल ! अशा तऱ्हेनंच तिच्याही मुखावरून दृष्टि काढवत नसेल. मनांतल्या मनांत सुरबालेला उद्देशून मी म्हणालें, " तूं कशी आहेस हें मीं पाहिलंही नाहीं. तूं कशीही अस; परंतु आजपासून तूं माझी गुरु झाली आहेस. तुझ्याकडून मीं पतिप्रेमाचे धडे घेतें आहें. प्रेमाची गोडी मी चाखली आहे. ती मी आतां बिलकूल सोडूं शकत नाहीं. प्रेम आतां मला हवंच हवं—मला प्रेम करणं आतां भागच आहे. मग दुसऱ्या कुणावर प्रेम करून मी तें कां व्यर्थ करूं ? आज तरी माझे पति हयात आहेत. अजून कांहीं वैधव्याचं वज्र मजवर पडलं नाहीं. मग ही चूक मी कां म्हणून करूं ? तुझ्यासारखं आपल्या पतीवरच मीही आजपासून प्रेम करीन—दुसऱ्या कुणावरही नाहीं." सुरबालेला उद्देशून मी हें बोललें मात्र, तोंच आपली सगळी शक्ति एकवट करून त्याला साथ देत माझं मन म्हणालं, 'प्रेम परत मिळेल अशी तुला आशा नाहीं हें खरं; तरी दिखील तुला पतीवरच प्रेम केलं पाहिजे.' पण माझं दुर्दैव इतकं प्रचंड, कीं ते वांचले नाहींत. माझ्या मोठ्या आशेची साधना अंकुरित होते न होते तोंच नष्ट झाली ! अन् म्हणूनच त्यांच्या मृत्यूच्या दिवशीं माझा जो चेहरा तुम्हाला दिसला, त्यांत तिळमात्रही कपट किंवा फसवणूक नव्हती. !"

बोलतां बोलतां तिचा कंठस्वर कारुण्यानें आर्द्र झाला आहे, हें उपेन्द्राच्या लक्षांत आलें; परंतु तो कांहींच बोलला नाहीं.

किरणमयी स्वतःही चार दोन क्षण स्तब्ध बसली. नंतर ती म्हणाली, " जे मूर्ख, जे जुनेपुराणे सनातनी, त्यांच्या लक्षांत येणार नाहीं हें खरं; परंतु तुम्हाला तर माहीत आहे कीं, विश्वसंसारांतील प्रत्येक वस्तूला नैसर्गिक नियम हे आहेतच. ते नियम लक्षांत न घेतां, पति-पत्नीपैकीं कुणीही दांपत्याचा चिरमधुर संबंध निर्माण करूं शकणार नाहींत. लग्नाच्या वेळचे मंत्र कर्तव्य बुद्धि देऊं शकतील, भक्ति-श्रद्धा देऊं शकतील; सहमरणाची प्रवृत्तीहि देऊं शकतील. परंतु माधुर्य द्यायची शक्ति त्याच्यामध्यें बिलकुल नाहीं. ती शक्ति केवळ या निसर्गाच्या हातींच आहे. निसर्गानें केलेला नियम पाळण्याचं जेव्हां सामर्थ्य होतं, संधि होती, तेव्हां आम्हीं दोघांनीं दोन दोन पायांनीं ते नियम हवेतसे लाथाडले. त्यांची कदर केली नाहीं–त्यांचा बिलकुल मान राखला नाहीं. आज भलत्याच वेळीं, पति जेव्हां अगदीं मरणाच्या दारीं पडलेले, अशा वेळीं प्रयोजन पडलं म्हणून, त्यांच्या जवळ मी जाऊं तरी कोणत्या मार्गानं–कोणत्या साधनानं ? तरी दिखील मी कांहीं पुरी आशा सोडली नाहीं, भाऊजी ! अजूनही एक रस्ता मला मोकळा आहे, अशी मला आशा वाटत होती. ती म्हणजे पतीची सेवा, आमरण पतिसेवा करूनच झाला तर एक दिवस त्याचा लाभ मला होईल. परंतु मी अशी हतभागी, कीं तेवढा अवकाशही मला मिळाला नाहीं—ते जग सोडून निघून गेले."

विस्मयचकित होऊन उपेन्द्रानें डोळे वर करून किरणमयीकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांतून दरदरा अश्रुप्रवाह चालला होता.

क्षणभर थांबून तो तिला सांत्वनपर वाणीनें म्हणाला, " तुम्ही हाराणदादाची जशी सेवा केलीत, तशी माणुस कांहीं करूं शकणार नाहीं, असं मी ऐकलं आहे. त्या दृष्टीनं पाहूं गेलं तर पत्नीचं कर्तव्यपालन करण्यांत तुमची तिळ-मात्रहि चुकी झाली नाहीं."

किरणमयी म्हणाली, " कदाचित् नसेलही झाली. परंतु माणसालाच जें अशक्य, तें मला तरी कसं करतां येणार, भाऊजी ? तसं कांहीं नाहीं. तशी सेवा प्रत्येक स्त्रीला करतां येईल. पण मी निव्वळ कर्तव्य म्हणून कांहीं केलं नाहीं. मला दुसरे सर्व रस्ते बंद होते, म्हणून माझ्या सेवेच्या साधनानं त्यांचा लाभ मला व्हावा, अशी मीं तीव्र इच्छा करीत होतें. म्हणूनच त्या बाबतींत शक्य तों मी कधींच चालढकल किंवा अवहेलना केली नाहीं. मला असं वाटत होतं;

जर एक वार त्यांना माझ्या हृदयांत मी पक्कं स्थान देऊं शकलें तर माझ्या अन्तापर्यंत कोणत्याही ठिकाणीं, कशीही मी असलें, तरी उमत्त, निष्कलंक रीतीनं मीं आयुष्य काढूं शकेन. पण माझे सर्व प्रयत्न अगदीं फुकट गेले. त्यांचा लाभ करून घ्यायला मी सुरुवात केली खरी; परंतु ते मला मिळालेच नाहींत! पहिल्यापासून तुम्ही जे माझ्या हृदयांत ठाव धरून राहिलां, त्या तुम्हाला त्या स्थानापासून यत्किंचित्‌ही मी हलवूं शकलें नाहीं! माझ्या पतींना दिखील माझ्या अन्तर्यामांत मला स्थान देतां आलं नाहीं. "

उपेन्द्र एकदम उठून उभा राहिला आणि म्हणाला, " रात्र खूब झाली, वहिनी! मीं जातों आतां. "

किरणमयीही उठली आणि म्हणाली, " चला, तुम्हाला दरवाज्यापर्यंत पोंचवून दार बंद करून मी येतें. उद्यां भेट होईल कां?

" नाहीं–उद्यां मी घरीं जाणार आहें. "

" बरं, पुढं कधीं तरी भेट होईल? "

" होईल असा तर संभव दिसतो. बरं, नमस्कार, वहिनी! "

" नमस्कार भाऊजी! दिवाकरना इकडे पाठवाल का? "

" पाठवीन, अवश्य पाठवीन, वहिनी! त्याला आई बाप कुणी नाहीं. मीच आजपर्यंत त्याला हवं नको सर्व पहात आलों. आजपासून त्याला सांभाळून, त्याची सर्व प्रकारची काळजी घ्यायची जबाबदारी तुम्ही घेतां आहां–तेव्हां ती जबाबदारी सर्वतोपरी तुमच्यावर संपवायला मला कांहींच हरकत वाटत नाहीं. "

किरणमयीच्या डोळ्यांतून झरझरां आंसवें झिरपूं लागलीं.

ती म्हणाली, " हा सगळा प्रकार ऐकल्यानंतरही तुम्हीं विश्वासानं एवढी मोठी जिम्मेदारी माझ्यावर संपवितां, हें आश्चर्य नव्हे कां, भाऊजी? दिवाकरांवर तुमचं किती प्रेम आहे, तें मला चांगलं ठाऊक आहे. "

दरवाज्याबाहेर येऊन उपेन्द्र म्हणाला, " या कारणासाठींच तर तुमच्यावर मीं त्याचा भार संपवतों आहें, वहिनी! ज्यांच्यावर माझं प्रेम आहे, त्यांचं तुमच्याकडून कधींही अमंगल होणार नाहीं, अशी माझी पक्की खात्री आहे. "

असें म्हणून तो त्वरेनें पुढें निघाला.

अंधाऱ्या गल्लींत तोंड पुढें करून डोकावून किरणमयीनें उच्च स्वरानें विचारलें, " आणखीन्‌ एक गोष्ट सांगून जा, भाऊजी! सतीश काय कलकत्त्यांत नाहींत? "

उपेन्द्रानें दुरूनच जबाब दिला, " नाहीं. "

किरणमयीनें पुनः प्रश्न केला, " मला न सांगतां सवरतां ज्या अर्थी ते निघून गेले, त्या अर्थी कांहीं तरी मोठ्या दुःखामुळं ते गेले, अशी माझी खात्री आहे, भाऊजी ! या घरांत पाऊल टाकायला दिखील तुम्ही त्यांना बंदी केली होती कां ? "

उपेन्द्र म्हणाला, " करायची इच्छा होती—पण केली नाहीं. "

किरणमयीनें विचारलें, " इच्छा होती, तर कां नाहीं केली ? "

उपेन्द्र कांहींच बोलला नाहीं.

उत्तर न मिळाल्यामुळें किरणमयीनें पुनः विचारलें, " अशी इच्छा तरी कां झाली हें नाहीं का मला कळणार ? "

उपेन्द्र म्हणाला, " कदाचित् माझी कांहीं चूक झाली असण्याचाही संभव आहे. तें कांहीं असो, तो कुठंही असला, तरी त्याचा शोध करून तुमच्याकडे यायला मीं त्याला पत्र पाठवीन. मग त्यालाच तुम्ही तें विचारा. "

असें म्हणून दुसऱ्या प्रश्नाची वाटही न पहातां उपेन्द्र त्वरीत गतीनें त्या अंधाऱ्या गल्लींतून पुढें सटकला.

## ३

जी पक्की सडक बरोबर संताल परगण्यांतून वैद्यनाथपासून दुमकापर्यंत गेली आहे, तिच्याच कडेला, वैद्यनाथपासून जवळजवळ दोन कोस अंतरावर, एका बागेंत एक बंगला होता.

कलकत्ता सोडून सतीश जो निघाला, तो या बाजूला येऊन त्यानें बंगल्याचा ' शोध ' लावला आणि भाड्यानें घेऊन तो तेथें राहिला होता.

स्वतःचेंच सूक्ष्म निरिक्षण करून स्वतःशींच सर्व बाजूंनीं ' समझौता ' करून घेण्यासाठीं सतीश या निर्जन एकान्त स्थळीं अज्ञातवासासाठीं आला होता. अर्थात् चहूंबाजूंना जवळपास कोठें गांव नाहीं, समोरच्या रस्त्यानें लोकांची जा-ये ही अगदीं तुरळक असते, असें जेव्हां त्याला आढळून आलें तेव्हां अतिशय खूष होऊन तो स्वतःशीच म्हणाला होता, " वाः ! मला पाहिजे होतं तें अगदीं हेंच ! अशा निर्जन शांत निःस्तब्धतेचीच मला आवश्यकता आहे ! "

कलकत्त्याहून अपयश आणि दुःख यांचा जो प्रचंड बोजा घेऊन तो आला

होता, त्याचा अशा एकान्त स्थलीं बसून, एक एक निरनिराळा हिशेब करून, त्याचे देणें घेणें निश्चित ठरवावें, असा त्याच्या मनांतील हेतु होता.

पहिली गोष्ट, सावित्रीविषयीं पराकाष्ठेचा तिरस्कार आपल्या मनांत उत्पन्न करून तो सतत तेवत ठेवणें जरूर आहे. दुसरी गोष्ट पाथुरेघाटच्या वहिनीला अजिबात विसरून जाणें आवश्यक आहे आणि तिसरी गोष्ट म्हणजे उपेनदादाशी सर्व संबंध पार तोडून टाकले पाहिजेत! हें सगळें कठिण काम या रानांत बसून आपणाला पुरें केलें पाहिजे, असा सतीशनें मनाशीं निश्चय केला होता.

सतीशबरोबर बिहारी आणि त्या मुलखांतला एक स्वयंपाकी ब्राह्मण असे दोघे नोकर होते. बिहारीचें काम होतें, धन्याची सेवा करून बाकी राहिलेल्या वेळांत बल्लवाचार्यांशीं वादानुवाद करून त्यांना मूर्ख आणि अडाणी ठरविणें आणि आचार्यांचें काम होतें एवढेंच, कीं नेहमींची भातभाजी पकवून बाकीच्या फावल्या वेळांत बिहारीबरोबर भांडण करून तो बाजारच्या पैशांत दोन्ही हातांनीं चांगली ओरपणी करतो आहे, हें सिद्ध करणें!

म्हणजे या नोकरांचे दिवस एक प्रकारें चांगले चालले होते, असें म्हणा-वयाला हरकत नाहीं; परंतु त्यांचे जे मालक, ते प्रतिक्षणीं केवळ तत्त्वचिंतनांत निमग्न होऊन राहिले होते. संसारांत कामिनी-कांचन हेंच सगळ्या अनर्थांचें मूळ, वैराग्य हीच जगांतली सर्वोतली परम काम्य वस्तु, पक्ष्यांची किलबिल हेंच श्रेष्ठ संगीत, वन-जंगल पहाड-पर्वत हेच सौंदर्याचे निर्दोष आदर्श, हीं सत्तत्त्वें संपूर्णपणें हृदयांत ठसविणें हेंच सतीशचें सांप्रत येथें तपःसाधन होतें.

अर्थात् तें साधण्यासाठीं व्हरांड्यांत एका मोडक्या आरामखुर्चीवर पडून सर्व दिवसभर झाडाच्या फांद्यांफांद्यांवरच्या पक्ष्यांचा किलबिलाट सतीश कान खडे करून ऐकूं लागला. मोहाच्या झाडांतून वहाणाऱ्या वाऱ्याचा सों सों आवाज कोणत्या रागरागिणींत सुरू आहे, याचा तो मनःपूर्वक विचार करूं लागला. आकाशांत इतस्ततः फिरणारा कोणताही ढग पाहून उल्लासित होऊन तो मनांत त्याची प्रशंसा करूं लागला आणि दूरच्या पहाडांच्या उतरणींवर वेळूंच्या सुक-लेल्या पानपाचोळ्याला वणवा लागला असतां, तो पहात सतीश रात्रीच्या रात्री जागून काढूं लागला!

दुसऱ्या बाजूनें, मांस-मच्छी सोडून सतीशनें सात्त्विक आहार सुरू केला

आणि कोठून तरी दगडाचा एक गोटा निवडून आणून सकाळीं त्याची पूजा आणि रात्रीं आरती करावयाला त्यानें प्रारंभ केला.

आणि या नव्या पद्धतीच्या जीवनक्रमाशीं सतीशाची कोणत्याही काळीं बिलकुल ओळख नव्हती! यापूर्वी नेहमींच त्याला पक्ष्यांच्या शब्दापेक्षां सतारीचा किणकिणाटच गोड लागत आला; वायुलहरींत रागरागिणींच्या अस्तित्वाची त्यानें स्वप्नांतही कधीं कल्पना केली नव्हती आणि आकाशांतील मेघांच्या उदयानेंही तो पूर्वी कधीं विचलित झाला नव्हता!

वस्तुतः निसर्गदेवतेची ही सर्व शोभा संपदा केवढीही विशाल किंवा महान् असली, तरी तिची दाद घ्यावयाला सतीशला कधीं फुरसतच होत नसे! जेथें गायनवादनाची मैफल, जेथें नाटक कॉनसर्ट, जेथें फूटबॉल् क्रिकेटचे सामने, तेथेंच सतीशनें आतापर्यंत दिवस काढले होते. कोठें ठोकाठोकी मारपीट करावी लागेल, कोणत्या जागीं स्टेज बांधणें अवश्य आहे, कोणत्या घरचें मढें भाजावयाचें आहे, कोणाला संकटकालीं पांचपन्नास रुपये जमवून द्यावयाचे आहेत, असल्या सगळ्या काळज्या तो वाही आणि तीं सारीं कामेंही तो उरकी!

पक्ष्यांच्या गायनांत माधुरी आहे किंवा नाहीं, कोकिळा पंचमांत ओरडते कीं ओरडत नाहीं, आकाशपटावर कुणाचा कुंचला रंग फांसतो आहे, नदीचा प्रवाह कलकल शब्द करीत कोणत्या सुभाषिताची घोषणा करीत आहे, कामिनी आणि कांचन ही संसारांत कोणत्या कसल्या अनर्थाच्या मुळाशीं आहेत, हीं सारीं तत्त्वें सतीशाच्या माथ्यांत यापूर्वी कोणत्याही काळीं शिरलीं नाहींत, आणि त्यासाठीं तो दुःख करीत बसला आहे, असेंही कधीं कोणाच्या दृष्टीला पडलें नाहीं! तो एक सरळ माणूस होता आणि सरळ रीतीनेंच तो संसारांतही सारीं कामें करीत असे. ज्या व्यक्तीवर तो प्रेम करी तिच्यावर अगदीं कसलाही विचार न करतां तो प्रेम करी; आणि त्यावर प्रहार झाला म्हणजे काय करावें हें त्याला कांहीं सुचत नसे.

जगांत दोन व्यक्तीवर त्यानें सर्वांपेक्षां विलक्षण प्रेम केलें होतें. एक सावित्री आणि दुसरा त्याचा उपेनदादा. सावित्री त्याला फसवून कुमार्गगामी, विश्वासघातकी विपिनचा हात धरून कोठें निघून गेली होती आणि त्याला एकही प्रश्न न करतां उपेनदादा एका अंधाऱ्या रात्रीं त्याचा त्याग करून चालता झाला होता!

उमें राहाण्यासारखी थोडीशी जागा त्याला होती, ती केवळ एका किरण-

मयीजवळ ! परंतु तो दरवाजाही बंद झालेला पाहून त्या घरीं परत पाऊल टाकण्याचें धाडस सतीशला झालें नाहीं आणि म्हणून या शांत निर्जन स्थळीं येऊन आकाश वायु पशु पक्षी यांच्याशीं जबरदस्तीनें नवीनच संबंध जोडून घेऊन तो वैराग्य साधनाला प्रवृत्त झाला होता.

परंतु आप्त मित्र, बंधु बांधव, आमोद-प्रमोद यांच्या मध्येंच ज्या माणसानें आजवर आपलें आयुष्य मोठ्या धामधुमींत काढलें होतें, त्याचा हा जीवन-क्रमणाचा नवा प्रयत्न पाहून बुड्ढ्या बिहारीच्या डोळ्यांना मात्र जेव्हां तेव्हां पाणी आल्यावांचून रहात नसे !

तो एकाद्या वेळीं धन्याजवळ येऊन म्हणे, " बाबूजी, कुणी तरी दोघे बंगाली गृहस्थ समोरच्या रस्त्यानं चालले आहेत. मला वाटतं, तपोवन बघायला जाताहेत ते—"

त्याचें वाक्य पुरें होतें न होतें आहे तोंच " कुठं रे ? " असें उद्गारून सतीश ताडकन् उडी मारून उभा राही; पण दुसऱ्याच क्षणीं, " जाऊं दे झालं ! " असें म्हणून उद्विग्न मुखानें आपल्या खुर्चीवर पुनः पडे.

बिहारी म्हणे, " त्यांना बोलवून त्यांच्याशीं थोडी बोलाचाली जर—"

सतीश म्हणे, " कशाला पण ?—"

नंतर उच्च तात्त्विक पद्धतीचें शुष्क हास्य करून तो म्हणे, " मला बुवा आतां या बोलण्याबिलण्याची जरूरी वाटत नाहीं-अन् बरींही लागत नाहींत तीं. तुला माहीत आहे, बिहारी, रानांतलीं पांखरं आजकाल मला गाणं शिकवतात, वारा हू हू करीत माझ्या कानाकानांत किती मुलुखांतल्या, किती राज्यांतल्या गोष्टी सांगून जातो; फालतू अलबत्या-गलबत्यांबरोबर थट्टाविनोदांत वेळ घालवायची मला आतां इच्छा तरी आहे का रे ? "

तोंड एवढेंसें करून कांहीं न बोलतां बिहारी मग निघून जात असे. परंतु त्यानंतरही बराच वेळपर्यंत मालकांचा तो वेदनांनीं विकृत झालेला कंठस्वर त्याच्या कानांत री री करीत त्याला त्रास देत असे.

बिहारीच्या स्वभावांत एक गुण असा होता, कीं दिलेला शब्द तो कधींही मोडीत नसे. अनेक शिष्ट सभ्य म्हणविणाऱ्या गृहस्थांना जो लोभ आवरतां येत नसे, तो आवरावयाची शक्ति या हलक्या दर्ज्याच्या माणसामध्यें होती. त्या रात्रीं, सावित्री कांहीं तरी मोठी प्रवंचना करून गेली, अशी बिहारी

मनाची एक प्रकारची समजूत घालावयाचा प्रयत्न करीत असे. ती सतीशची अगदीं निःसीम मंगलाकांक्षी होती आणि त्याच्यावर तिचें प्राणापलीकडे प्रेम होतें, याबद्दल बिहारीला तिळप्राय शंका नव्हती. तरीही, जो अपराध तिनें केला नव्हता, तो कबूल करून आणि जें पाप तिच्या हातून कधीं झालें नव्हतें, त्याचा बोजा आपल्याच हातानें आपल्या मस्तकावर चढवून, आपल्या धन्याला विलक्षण यातना देऊन ती कां निघून गेली, याबद्दल सतत विचार करूनही त्या रहस्याचा उलगडा बिहारीला कधीं झाला नाहीं !

तरी सुद्धां सावित्रीवर बिहारीची अगदीं निःसीम भक्ति होती. तिला तो ' आई ' म्हणून संबोधी आणि ती कोणीतरी शापभ्रष्ट देवता आहे, असेंच त्याला वाटे. म्हणून स्वतःच्या बुद्धीनें कांहीं निर्णय जेव्हां त्याला करतां येईना, तेव्हां, शेवटीं कांहींतरी चांगलाच परिणाम झाल्याशिवाय रहाणार नाहीं, अशी तो मनाची समजूत घालण्याचा प्रयत्न करी. या ' चांगल्या ' परिणामाच्या आशेनें तो या बाबतींत अगदीं गप्प बसून राहिला होता. धन्याचा विषण्ण चेहरा पाहून, सावित्रीसंबंधीचा खरा प्रकार त्याला सांगून टाकण्याचा मधून मधून जेव्हां त्याला अगदीं विलक्षण आवेग येई; तेव्हां, ' माझ्या आईपेक्षां कांहीं बाबूजीवर माझी अधिक ममता नाहीं; स्वतः दुःख देऊन ती जेव्हां निघून गेली आहे, तेव्हां मी तरी उगीच कशाला तिच्या इच्छेमध्यें विघ्न आणूं ? अजाणतां किंवा परिणामाकडे दृष्टि न देतां, कांहीं न कळविण्याविषयीं मला शपथ घालून ती गेली नाहीं ! ' असें म्हणून बिहारी आपल्या मनाला मोठ्या कष्टांनीं आवर घाली.

अशा तऱ्हेनें या मंडळीच्या अज्ञातवासाचे दिवस चालले होते; आणखी, मला वाटतें, पुढेंही असेच गेले असते. परंतु अकस्मात् एक दिवस पुढें वर्णन केलेली घटना घडून येऊन त्यांत विघ्न उपस्थित झालें.

' काल वैशाखी ' म्हणून जिला म्हणतात, तशी त्या दिवशींची ती वेळ होती. सर्व दिवसभर जरी अकाल दुर्दिनाचें कांहीं सुद्धां लक्षण दिसत नव्हतें, तरी संध्याकाळच्या सुमाराला पंधरा वीस मिनिटांच्या अल्प अवधींत आकाशांत जबर वादळ सुरू झालें—एकदम प्रचंड वावटळ सुटली.

एका क्षणांत घोड्यांच्या टापांच्या आवाजानें सतीश एकदम चकित झाला आणि मान उंच करून पाहूं लागला. एक सुंदर तेज घोडा पाठीवर आपला सारा सरंजाम घेऊन वावटळीबरोबरच उन्मत्त वेगानें दौडत चालला होता !

सतीशनें हांक मारून विचारलें, " काय रे बिहारी, हा कुणाचा घोडा सुटून दौडत निघाला आहे, माहीत आहे का रे तुला ?"

बिहारी खोलींत दिवे पुशीत होता. तो काम करतां करतां म्हणाला, " कुणा श्रीमंता बीमंताचा असेल—"

सतीश म्हणाला, " या बाजूला कोण आहेत रे श्रीमंत मंडळी ? "

" या बाजूला नाहींत. पण देवघरहून नेहमीं असे लोक गाडी करून त्रिकूट पहायला, तपोवनांत सहल करायला येतात. त्यांच्यापैकीं असेल एकाद्याचा. वावटळीच्या भीतीनं मरतो आहे लेकाचा ! उधळत निघाला आहे ! "

" तसं असेल तर मोठी मुष्किल आहे ! "

असें म्हणून सतीश पुनः आपल्या आरामखुर्चीवर लवंडला. परंतु मनांतून तो विचार कांहीं केल्या त्याला दूर करतां येईना.

त्याला वाटूं लागलें, कोणी का असे ना बिचारा; पण बरोबर जर एकादें बाई–माणूस असलें, तर कांहीं त्याची धडगत नाहीं या संकटांतून ! या ठिकाणीं गाडी–मेण्याची तर गोष्ट दूरच; पण एका माणसाचीही मदत मिळणें कठीण आहे ! शिवाय आतां संध्याकाळ व्हावयालाही फारसा अवकाश नाहीं आणि बहुतेक पाऊस कोसळल्याशिवायही रहाणार नाहीं, असें लक्षण दिसतें.

सतीशला आतां रहावेना ! व्हरांड्याच्या कोपऱ्यांत लाठी होती. ती त्यानें पटकन् हातीं घेतली आणि तो वेगानें बाहेर निघाला.

रस्त्यावर येऊन तो पहातो, तों पथ्थरांचा बारीक चुरा वावटळीच्या वेगानें सरसरत येऊन अंगाला छर्ऱ्यांप्रमाणें विंधीत आहे आणि सगळा रस्ता धुळीनें आणि वाळूनें नुसता अंधारून गेला आहे !

एकाएकीं त्या अंधारांतून वादळाच्या तोंडाशीं 'हो हो' असा चीत्कार जणूं तरंगत आला !

होळीच्या दिवशीं सुटी मिळून, हिंदुस्थानी दरवानांचीं टोळकीं ज्या प्रकारचा चीत्कार शब्द करीत रस्त्यावर बाहेर पडतात, तोच नेमका आवाज हा !

एकंदर प्रकार आहे तरी काय, हें समजून घेण्याकरतां सतीश त्या धुळीच्या माऱ्यामध्येंच पुढें निघाला. थोडासा पुढें तो जातो तों त्याला आढळून आलें, सडकेवर एक टमटम गाडी उभी असून, तिला चहूंकडून गराडा घालून आठ दहा लोक आनंदाचा तो आवाज काढीत आहेत ! कोणाच्या माथ्यावर टोपी,

तर कोणाच्या माथ्यावर पागडी !—सगळ्यांचा पोषाक अस्सल हिंदुस्थानी होता !

त्यांना हा आनंद तरी कसला झाला आहे, हें समजावें म्हणून सतीश आणखीही जरासा पुढें आल्यावर त्याला आढळून आलें—टमटमचा एक हातोटा धरून एक तरुणी माथें खालीं घालून अतिशय जडमूढ स्थितींत उभी आहे; आणि तिलाच उद्देशून तें टोळकें जी भाषा वापरीत होतें, ती उच्चारील अशी जबर जीभ हिंदुस्थानी खेरीज दुसऱ्या कोणत्याही जातीची असणें शक्य नव्हतें.

सतीशला पहिल्यानें वाटलें, कीं या बाईला घेऊन हे लोक चैन, मौज करण्याकरतां या बाजूला कोठें आले असावे, आणि नंतर आतां घोडा पळून गेल्यामुळें हिच्या भोंवतीं ही एक विशिष्ट प्रकारची मौज करीत असावे !

तेव्हां एकवार त्याला वाटलें, कीं जावें झालें परत ! परंतु कोण जाणे का तें, आज आपल्या कुतूहलाचें त्याला कांहीं केल्या दमन करतां येईना !

तितक्यांत एकाएकीं सतीशाची विस्मयपूर्ण दृष्टि त्या स्त्रीच्या पोषाकाकडे गेली. संध्याकाळच्या आणि वाळू–धुळीच्या अंधारांतूनही, तिनें परिधान केलेलें वस्त्र जणूं बंगाली तरुणींच्या पद्धतीनें पेहरलेलें आहे; तिच्या पायांत पायतणें आहेत; परंतु ते लखनौचे लपेटे नसून—इंग्रजी स्त्रिया जे बूट वापरतात, तशा तऱ्हेचीं तीं आहेत, असें सतीशला आढळून आलें.

एकाएकीं ती तरुणी उच्च स्वरानें त्याला संबोधून ओरडली, " मला वांचवा, महाशय, मला वांचवा. "

वांचवा !

क्षणार्धांत सतीशाचा वैराग्याचा नशा पार उडून धुळीला मिळाला. कामिनी आणि कांचन हीं अत्यंत तिरस्करणीय आहेत, या तत्त्वाचा त्याला विसर पडला.

वाघाप्रमाणें उडी मारून तो एकदम त्या तरुणीजवळ येऊन ठेपला आणि त्यानें विचारलें, " काय झालं ? "

आतांपर्यंत त्या तरुणीला एकाकी स्थितींत त्या टोळक्याचा तो सारा छळ सहन करावा लागला होता. सतीशच्या शब्दांनीं तिला आतां भडभडून आलें. तोंड पंजांनीं झांकून ती एकदम खालीं बसली आणि स्फुंदून रडूं लागली.

सतीश आतुरतेनें म्हणाला, " काय आहे हा एकंदर प्रकार ? झालंय तरी काय ? "

" या साऱ्या चांडाळांनीं माझा मोठा अपमान चालवला आहे मघांपासून—"

" अपमान चालवला आहे ? कोण हे ? "

" ठाऊक नाहीं मला."

" ठाऊक नाहीं ? "

सतीशनें एकदम प्रश्नांची नुसती फैर उडवली, " तुम्ही कोण ? कुठून इथं आलां ? तुमच्या बरोबरचीं माणसं कुठं आहेत ? ही गाडी कुणाची ? "

तरुणीनें डोळे पुसले आणि रुद्ध स्वरानें ती म्हणाली, " माझा सैस, घोडा सुटून दौडत गेला त्याला पकडून आणायला त्याच्या बरोबरच धांवत गेला आहे. दुसरं आणखीं कुणीं नाहीं. मी तपोवन पहायला आलें होतें–नेहमीं येतें–तिथून हे चांडाळ माझा छळ करीत करीत इथपर्यंत आले आहेत ! "

सतीश एकदम भडकून ओरडला, " फार उत्तम करताहेत हे लोक ! तुम्ही काय आपणाला बड्या मेमसाहेब समजतां, तर टमटम हांकीत तुम्ही इतक्या दूर आलां ? तुम्ही काय एखाद्या गोऱ्या साहेबाची मुलगी बिलगी आहां, कीं कुठंही एकट्याच गेलां तरी तुम्हाला भय नाहीं ? आमचे देशी गांवढळ लोक, असहाय हिंदी स्त्री मिळाली, कीं तिचा असाच अपमान करणार–अत्याचार करणार ! या देशाचा हा नियमच आहे–रीत आहे. तुमच्या आई--बापांना ही गोष्ट माहीत नाहीं वाटतं ? "

असें म्हणून, त्या हिंदुस्थानी टोळक्यांत जो सर्वांत वडील होता, त्याच्याकडे आगीचा जळजळीत कटाक्ष टाकून तो ओरडला, " तुम लोग खडा काहे हाय ?"

तो म्हणाला, " हमारी खुसी ! "

त्या माणसाच्या डोळ्यांकडे पहातांच, त्यांना भांगेचें नाहींतर गांजाचें, किंबहुना दोन्ही पदार्थांचें, यथेच्छ सेवन केलें असावें, अशी कोणाचीही सहज खात्री झाली असती !

हात उंचावून, सरळ रस्ता दाखवून, सतीश संक्षेपानें त्याला म्हणाला, "जाव–"

उत्तरादाखल तोंड वेडेवांकडें करून तो माणूस म्हणाला, " आरे ! जाव रे ! "

प्रत्युत्तरीं, सतीशनें त्याच्या गालावर अशी एक 'जोरसे' ठेवून दिली, कीं तुच्छतेनें उच्चारलेल्या आपल्या त्या 'रे'ला थोडें देखील ताणावयाला त्याला मुळीं अवकाशच मिळाला नाहीं !

तो तत्क्षणीं मूर्च्छित होऊन रस्त्यावर कोलमडून पडला. त्याचें जणूं चैतन्यच नाहींसें झालें.

आणि त्याच क्षणीं, त्याच्या शेजारच्या बिचाऱ्या एका बावळटशा रोगी

किडकिडीत छोकऱ्याला त्याचा कांहीं अपराध नसतां, सतीशच्या डाव्या हाताची जोराची श्रीमुखांत बसून, पहिल्यानें तो सैसाच्या बसावयाच्या जागेवर आणि नंतर चाकाच्या तळाशीं डोळे मिटून आदळला.

टोळक्यापैकीं बाकीचे कोणी स्वतःच्या नशेच्या गुणानें, तर इतर थपडांच्या जोराच्या प्रहारांमुळें, हतबुद्ध होऊन जागच्या जागीं टकमकां पहात उभे राहिले.

सतीश समोरच्या आदमीला उद्देशून ओरडला, "तब तुम आव—"

उत्तरादाखल तो जो तेथून विद्युद्वेगानें निघाला, तो सर्वांच्या मागें जाऊन उभा राहिला.

सतीश नंतर तरुणीला म्हणाला, "उठा आतां."

तरुणी मुकाट्यानें उठून उभी राहिली.

सतीश म्हणाला, "हो आतां पाऊस आलाच समजा. चला माझ्या बरोबर, या—"

तरुणी भयभीत स्वरानें म्हणाली, "मला काय टाऊनपर्यंत पायीं चालत जाववेल?"

सतीश म्हणाला, "टाऊनमध्यें नव्हे. माझ्या बिऱ्हाडीं. ही समोर दिसत आहे, या बागेंतल्या बंगल्यांत. आलाच बघा हा पाऊस. आतां स्वस्थ विचार करीत उभं राहून भागण्यासारखं नाहीं. यायचं नसेल, तर इथं उभं राहून तुम्हीं खुशाल भिजा—मी हा चाललों—"

तरुणी म्हणाली, "चला ना. आपणाबरोबर यायचं, त्यांत विचार करण्यासारखं काय आहे?"

इतक्या अवकाशांत थेंब थेंब पाऊस गळावयाला सुरवात झाली होती; आणि वादळाचा वेग कमी झाला असला, तरी तें अजिबात थांबलें नव्हतें.

थोड्याच वेळांत दोघें जण मुकाट्यानें चालत बागेच्या गेटाजवळ येऊन पोहोंचलीं.

गेटासमोर थांबून सतीश म्हणाला, "पण माझ्या घरांत बायको माणुस कुणी नाहीं–मी एकटाच रहातों इथं."

तरुणीनें विचारलें, "तर मग आपल्या घरीं सैंपाक पाणी, वाढप बिढप, घरची इतर कामं कोण करतं? स्वतः आपण?"

"नाहीं. नोकर आहेत. पण त्यांपैकीं कुणी बायको माणूस नाहीं."

" नसेल बाईमाणूस. पण म्हणून आपण उभे कां राहिलां ? चालतां चालतां काय तें सांगा ना—"

सतीश जरा थबकला. कांहींशा कुंठित स्वरानें तो म्हणाला, " म्हणूनच तर सांगितलं तुम्हाला, कीं माझ्या घरीं कुणी बायको माणुस नाहीं. या रात्रीं, आंत जाण्यापूर्वी, तुम्हाला सगळी कांहीं माहिती असणं उचित आहे, असं मला वाटलं. "

तरुणी म्हणाली, " जर उचित आहे, तर तिथंच कां नाहीं सांगितलं आपण मला हें ? पण मला कांहीं बाई आतां उभं रहावत नाहीं. माझे हातपाय कसे थरथरां कांपताहेत ! शिवाय, मला अशी भयंकर तहान लागली आहे, कीं काय सांगूं ! "

" या-या तर—"

असें म्हणून, कांहींसा खजील होऊन सतीश अंधाऱ्या बागेमधला रस्ता दाखवीत पुढें चालूं लागला.

या सगळ्या किळसवाण्या आणि तापदायक घटनांनंतर ती तरुणी किती त्रासून, दमून गेली असेल, याची मनांतल्या मनांत कल्पना येऊन सतीश शरमिंदा झाला.

थोड्या वेळानें तो आस्ते आस्ते म्हणाला, " तुमचा आवाज कुठं तरी ऐकला असावा, असं मला वाटतं—"

परंतु तरुणीनें त्याला कांहींच उत्तर दिलें नाहीं. आपला चेहरा अंधारांत सतीशला दिसला नसावा, हें तिच्या ताबडतोब ध्यानांत आलें.

व्हरांड्यांत चढून येतांच ती सतीशच्या त्या मोडक्या आराम खुर्चीवर जाऊन एकदम लवंडली.

क्षणभरानें तिनें विचारलें, " बरोबर तुमच्या बिहारी आहे ना ? "

नंतर उच्च स्वरानें तिनें हांक मारली, " बिहारी, बिहारी, माझ्यासाठीं झट-कन् ग्लासभर पाणी घेऊन येतोस ? "

बिहारी पलीकडील बाजूच्या खोलींत होता. हांक ऐकतांच तो ताबडतोब पाणी घेऊन त्वरेनें आला.

व्हरांड्याच्या भिंतीवर मारलेल्या एका खिळ्याला एक रॉकेलचा दिवा मिण-मिण करीत तेवत होता. त्याच्या क्षीण प्रकाशांत, तरुणी दृष्टीला पडतांच बिहा-रीनें तिला चटकन् ओळखलें.

विस्मयानें तो म्हणाला, " ताईसाहेब, तुम्ही ? "

" ती मोठी लांबलचक हकीगत आहे—"

असें म्हणून तरुणीनें स्वतः उठून बिहारीच्या हातून पाण्याचा ग्लास घेतला आणि सपाट्याबरोबर सर्व पाणी घटघटां पिऊन तिनें त्याच्या हातीं तो परत दिला.

नंतर चार दोन क्षणांनीं ती म्हणाली, " दादाला खबर दिली पाहिजे, बिहारी ! पत्ता जर मीं दिला, तर या अशा रात्रीं बंगला शोधून काढून बातमी कळवून येशील काय ? "

बिहारी मान हलवून हळुहळू म्हणाला, " नाहीं, ताईसाहेब ! मला तर शहरांतली बिलकुल कांहीं माहिती नाहीं. शिवाय, मी हा असा बुड्ढा माणूस ! वादळ-वाऱ्यांत पावसांतून रस्त्यानं चालणंही अशक्य आहे मला, ताईसाहेब ! "

" तर मग आतां कसं रे व्हायचं, बिहारी ? घोडा जाऊन जर तबेल्यांत घुसून राहील, तर दादा काळजीनं अगदीं हैराण होऊन जाईल ! मला कांहीं भीति नाहीं, मी सुखरूप आहें, हें कसं तरी त्याला कळवलंच पाहिजे. "

बिहारी चार दोन क्षण विचारांत स्तब्ध राहून म्हणाला, " आमचा सैंपाकी ठाकूर आहे कीं नाहीं, तो आहे या मुलखांतलाच माणूस. इथले रस्ते बिस्ते सर्व कांहीं त्याच्या उत्तम माहितीचं आहे. ज्योतिषसाहेबांच्या बंगल्याचा त्याला पत्ता सांगितला, म्हणजे तो खात्रीनं आपलं काम करून येईल. त्याला जाऊन बोलावून घेऊन येतों. "

असें म्हणून बिहारी स्वयंपाकघराकडे निघून गेला.

तरुणी कोण, हें आतां सतीशनें तत्काळ ओळखलें.

तो म्हणाला, " पण तुमच्या दादांना एक पत्र लिहा तुम्ही. "

तरुणी म्हणाली, " पत्र तर दिलंच पाहिजे. "

सतीश म्हणाला, " तुम्ही त्यांना लिहा, बहिणीला मेमसाहेब करून सोडण्याचा परिणाम आज काय झाला, हें साहेबांनीं ऐकल्यावर ते बहुधा खुष झाल्यावांचून रहाणार नाहींत. "

टोमणा बोंचल्यामुळें सरोजिनीला राग आला. आजचें तिचें आचरण दैव-विडंबनामुळें अतिशय लज्जाजनक झालें होतें, हें खरें; आणि त्याबद्दल तिला स्वतःलाही कमी पश्चाताप झाला होता असेंही नाहीं. परंतु असें असलें म्हणून दुसऱ्या कोणी वारंवार ' मेमसाहेबांशीं ' तुलना करून आपला अतिशय उपहास करावा, हें तिला सहन होणें शक्य नव्हतें.

तिखट स्वरानें सरोजिनी म्हणाली, "दादाला आपणंच लिहा, तुमच्या बहिणीला मी एकट्यानं प्रचंड भयंकर संकटांतून सोडविलं, हे तुमच्यावर माझे अतिशय मोठे उपकार आहेत !"

तिच्या चिडीचें आणि विरक्तीचें कारण सतीशाच्या तेव्हांच लक्षांत आलें. परंतु या असल्या सगळ्या साहेबी फॅशनेबल गोष्टींचा त्याला भयंकर तिटकारा होता ! त्याला त्या बिलकुल सहनच होत नसत.

तो म्हणाला, " खरोखरच तसं लिहिणं योग्य आहे. त्यामुळं तुमच्या साहेबी समाजाला थोडं बहुत चैतन्य आलं तर आलं !"

सरोजिनी म्हणाली, " आमच्या समाजाविषयीं तुम्हाला भयंकर तिटकारा वाटतो. नाहीं ? तुमची ठाम कल्पना अशी, कीं आम्ही मुळीं माणसंच नाहीं !"

सतीश म्हणाला, " माझी कल्पना कांहीं असो; पण तुमच्या समाजांतील लोकांची मात्र कल्पना अशी, कीं आपणाशिवाय बंगालदेशांत मुळीं माणसंच नाहींत !—असंच ना ?"

सरोजिनी म्हणाली, " आमच्यापैकीं ज्या मंडळीची अशी कल्पना असेल, त्यांना निदान मी तरी दोष देणार नाहीं. "

सतीश म्हणाला, " तें मला माहीत आहे. अन् त्या साठींच आज तुम्हाला आणखीही कडक शिक्षा व्हायला हवी होती, असं माझं मत आहे. तिथं जर तुम्ही कोण हें मला कळलं असतं, तर मी मुकाट्यानं तसाच परत आलों असतों. एक शब्दही बोललों नसतों. "

सरोजिनी म्हणाली, " शिक्षा कोणती—ऐकूं द्या तरी ? अपमान अन् अत्याचार—हीच कीं नाहीं ?"

सतीश म्हणाला, " हो—हीच. "

सरोजिनी म्हणाली, " असहाय स्त्रियांचा अपमान करणं हें तुमच्या हिंदी लोकांच्या चरित्रांत मुरलेलं आहे, असं तुम्हीं मघाशीं कां म्हणालां, तें इतक्या वेळानं माझ्या लक्षांत आलं. आपल्या दारीं आणून शिल्लक राहिलेला माझा अपमान करावा, अशी आपली इच्छा होती. आतां मी आपल्या ओळखीची निघालें, हें आपणांला बाधलं, त्याबद्दल तुमचा माझ्यावर इतका राग !"

सरोजिनीच्या बोलण्याच्या तिखट धारेमुळें सतीशला राग आला; तरीही तो हंसला.

तो म्हणाला, " हो, असंच ! तुमचा हवा तेवढा अपमान मला करतां आला नाहीं, म्हणूनच मला तुमचा भयंकर राग आला आहे. आमच्या बंगाली भाषेंत ' कृतज्ञता ' म्हणून एक शब्द आहे. तुमच्या साहेब-मेम लोकांच्या कोशांत तो शब्द कदाचित् लिहिलेला नसेलही ! "

सरोजिनीच्या अधरोष्ठावर मेघांनीं झांकलेल्या विजेच्या चकमकीप्रमाणें एक दाबलेली स्मितच्छटा चमकून गेली, तरीही क्रोधाच्या स्वरानेंच तिनें त्याला जबाब दिला. परंतु तिच्या कंठस्वरामध्यें इतकी कृत्रिमता होती, कीं विशेष लक्ष नसणाऱ्या, अमनस्क श्रोत्यांच्या कानांनाही ती उमगावी !

सरोजिनी म्हणाली, " नाहीं-खरंच नाहीं. ही साहेब-मेम मंडळी जशी अकृतज्ञ, तशीच अधार्मिक, दुराचारीही आहे. तुम्ही त्यांच्या कळपांत आल्याशिवाय त्यांचा उद्धार होणें शक्य नाहीं. याल का तुम्ही त्यांच्या कळपांत ? "

उत्तरादाखल, येणारें हंसूं दाबून, सतीश कांहीं बोलणार होता, इतक्यांत हनुमान पांडेजींना घेऊन बिहारी तेथें आला.

आपली ब्याग घेऊन सरोजिनीनें तिच्यांतून पांच रुपये काढले आणि ते खुर्चीच्या हातावर ठेऊन ती म्हणाली, " हें तुमचं बक्षीस, पांडेजी ! पण आतांच्या आतां शहरांत जाऊन मी देतें तें पत्र जर तुम्ही देऊन आलां, तरच हें तुमचं हं ! "

असें म्हणून पत्र कोठें कोणाला कसें द्यावयाचें, तें तिनें पांडेजींना यथासाध्य वर्णन करून सांगितलें.

आपल्या दोन महिन्यांच्या कमाईइतक्या त्या रकमेकडे पांडेजींनीं आपली लोलुप नजर टाकली आणि क्षणार्धांत कामाला राजी होऊन पत्रासाठीं त्यांनीं हात पुढें केला.

सरोजिनीनें त्या पसरलेल्या कर-कमलाच्या ठायीं रुपयांची चळत ठेवून पत्र लिहिण्यासाठीं ती आंत निघून गेली.

लिहिण्याचें टेबल समोरच होतें. अल्पावधींतच पत्र लिहून सरोजिनीनें तें पांडेजींच्या हातीं आणून दिलें.

पांडेजींनीं तें आपल्या आंखुड कुडत्याच्या खिशांत नीट ठेवलें आणि डाव्या हातीं हरिकेन कंदील आणि उजव्या हातीं वेळूची उंच काठी घेऊन, बाहेर कोसळणाऱ्या त्या मुसळधार पावसाच्या वृष्टींत ते पहातां पहातां नाहींसे झाले !

चार दोन क्षणांनीं कुंठित स्वरानें बिहारी म्हणाला.

" बाबूजी, पांडे आतां कधीं परत येईल, त्याचा कांहीं नेम नाहीं. सैंपाकाची काय व्यवस्था ?

सतीशनें सरोजिनीच्या तोंडाकडे एकवार पाहिलें आणि अनिष्ट प्रसंग कसा तरी दाबून टाकण्याच्या हेतूनें तो तुच्छ स्वरानें बेफिकिरपणें उद्गारला, " ओः ! होईल नंतर–"

परंतु धन्याच्या या अभिवचनानें बिहारीची काळजी तिळमात्र कमी झाली नाहीं. तो म्हणाला, " तें कसं काय जमणार, हें मला कांहीं कळत नाहीं बाबूजी ! "

सतीश अप्रसन्न स्वरानें म्हणाला, " तुला नाहीं कळलं, तरी चालण्यासारखं आहे बिहारी, तूं जा ना आतां. ती सारी व्यवस्था मी करतों, अन् शिवाय आज मला तशी भूकही नाहीं."

परंतु बिहारी एक पाऊलभरही हलला नाहीं. कारण धन्याच्या बोलण्यावर त्याचा बिलकुल विश्वास बसला नाहीं. एक तर, सामान्य पांच माणसांच्या भुकेपेक्षां आपल्या धन्याच्या भुकेचें प्रमाण अधिक आहे, हें त्याला माहीत होतें. आणि इतक्या दिवसांच्या त्याच्या नोकरींत, भूक या वस्तूचा अभाव बाबूजींच्या ठिकाणीं कधीं एक दिवसही त्याला आढळून आला नव्हता.

बिहारी थोडक्यांत म्हणाला, " तें नाहीं जमण्यासारखं ! "

सतीश त्याच्याकडे पहात तिरस्कारानें म्हणाला, " ज्या त्या गोष्टींत नेहमीं वाद घालायचा, हा तुझा मोठा दोष आहे, बिहारी ! सांगतों आहे ना मी तुला, कीं मीं ती सारी व्यवस्था पाहीन, तूं जा ! पण तें कांहीं नाहीं–समोर उभा राहून तोंडावर तूं मला सुनावणारच ! "

बिहारी आतां मात्र रागानें क्षुब्ध झाला. तो तसाच जावयाला निघाला.

परंतु त्याला परत बोलावून सरोजिनी म्हणाली, " माझ्यामुळेंच तूं आज मोठ्या संकटांत पडला आहेस, बिहारी ! सैंपाकाची व्यवस्था कांहींच का नाहीं होण्यासारखी ? "

बिहारी म्हणाला " होण्यासारखी नाहीं का ताईसाहेब ? पण सैंपाक करणार कोण, ही आहे मुख्य पंचाइत ! पांडेजींना यायला किती उशीर होईल, याचा कांहीं अंदाजच नाहीं."

असें म्हणून अप्रसन्न मनानें तो तेथून निघून गेला.

क्षणभर दोघेंही स्तब्ध होतीं.

नंतर सरोजिनी म्हणाली, " मी मेमसाहेब असलें, नाहीं तर कुणीही असलें, तरी तुमची माझी जात तर एकच ना ? माझ्या हातचं खाल्लं तर कुणाची जातबीत जाईल कीं काय ? "

तिचा हा प्रश्न ऐकून सतीशला खूब हंसूं आलें.

तो म्हणाला, " जात जाईल कीं काय, हें मला सांगतां नाहीं येणार. परंतु मेमसाहेबांच्या हातचा सैंपाक गळ्याखालीं जाईल कीं नाहीं, हा आहे मुख्य प्रश्न ! "

" इश्श ! काय तरीच काय बोलतां ! मेमसाहेबांच्या हातचा सैंपाक खाल्या-वर जन्मांत कधीं विसर पडणार नाहीं—ठाऊक आहे ? "

असें म्हणून हास्य आणि इसेन्सचा सुगंध यांनीं तें सर्व स्थान दरवळून सोडून सरोजिनी उठून त्वरित गतीनें आंत गेली.

सुमारें पांच एक मिनिटांनीं ती जेव्हां बाहेर आली, तेव्हां तिच्याकडे पाहून सतीश क्षणकाल अगदीं मुग्धच होऊन गेला.

मोजे आणि बूट यांच्या ऐवजीं मोकळे स्वच्छ कोमल पाय, रेशमी साडी आणि ब्लाउजाच्या बदलीं फक्त एक आंतलं पातळ पोलकें आणि त्यावरून सतीशचें एक साधेंसुधें लाल किनारीचें धोतर तिनें पेहरलें होतें.

सरोजिनीची ती त्या वेषांतली मूर्ति पाहून सतीशचे डोळे चकित होऊन तिच्यावर स्थिरावले.

तो अतिशय भावनावेगानें उद्गारला, " आः ! किती सुंदर दिसतो आहे तुम्हाला हा वेष ! जणूं काय देवी कमलाच ! "

त्याच्या तोंडची ही विलक्षण प्रशंसा ऐकून सरोजिनीच्या शिरेशिरेंतून आनं-दाचें एकदम उधाण वाहूं लागलें !

परंतु तितकीच विलक्षण लज्जाही तिला वाटूं लागली. खालीं मान घालून ती हंसऱ्या स्वरानें म्हणाली, " अशी थट्टा कराल, तर सैंपाकाला मुळीं हात दिखील लावणार नाहीं मी, सांगून ठेवतें. मग उपास पडेल ठणठणीत तेव्हां कळेल मजा ! "

परंतु लज्जेच्या या प्रदर्शनाला तिनें तत्क्षणीं आळा घातला. कारण लज्जेला एकदां आसरा दिला, कीं ती एकदम उत्कट होऊन जाते, हें तिला माहीत होतें.

म्हणून मस्तक वर करून ती हंसत हंसत म्हणाली, "काय नांवाजणी करायची असेल, ती मागाहून करा. तूर्त सैंपाकघर कुठं आहे तें दाखवायला सांगा पाहूं."

असें म्हणून ती स्वतःच पुढें निघाली.

## ४

स्वयंपाक आणि जेवण झाल्यावर, व्हरांड्यांतल्या दोन खुर्च्यांवर तीं दोघें परस्परांसमोर बसलीं.

सरोजिनी म्हणाली, " एक गोष्ट आमच्या कुणाच्याच डोक्यांत आली नाहीं, याबद्दल आश्चर्य वाटतं."

सतीशनें तिच्याकडे पाहिलें. तो कांहीं बोलला नाहीं.

" दादाच्या बंगल्याचा पत्ता ठाकुराला जर शोधूनही लागला नाहीं, तर दादा स्वतःच गाडी घेऊन येईल. मग काय होईल हो सतीशबाबू ? "

सतीश म्हणाला, " ही गोष्ट अगोदर लक्षांत आली असती तरी तिचा कांहीं उपयोग नव्हता. इतक्या रात्रीं, इतक्या दूर यायला कोणताही गाडीवाला तयार झाला नसता ! आतां तसं झालं तर तुम्हाला रात्रभर इथंच राहिलं पाहिजे एक, नाहीं तर पायीं चालत तिथपर्यंत गेलं पाहिजे–त्याशिवाय उपाय नाहीं."

" मी चालत जाऊं शकेन. पण तुमच्याशिवाय दुसऱ्या कुणाबरोबर नाहीं ! "

" म्हणजे ? याचा अर्थ काय ? माझ्याबरोबर तुम्ही गेलां, म्हणजे कांहीं संकट येणं संभवनीय नाहीं, अशी तुमची कल्पना आहे वाटतं ? "

" नाहीं का ?–आहे. परंतु त्याचा सगळा भार तुमच्यावर आहे. त्याचा जाब द्यावा लागला तर तो तुम्हाला–मला नव्हे."

सतीश म्हणाला, " मला जाब द्यावा लागेल ? अन् तो कां म्हणून ? माझा काय अपराध ? "

" इतर कुणाजवळ न लागला, तरी स्वतः जवळ तरी द्यावा लागेलच ना ? "

इतकें बोलून सरोजिनी एकाएकीं थांबून गप्प बसली. सतीशनें तिच्या या भाषणाचा प्रतिवाद केला नाहीं. परंतु आपण दोघें क्षणभर निस्तब्ध असतां, तेवढ्यांतच लज्जेचा एक जोराचा झपाटा येऊन गेला, असा त्याला स्पष्टपणें भास झाला.

" अं–कुणी येतं आहे वाटतं ? "

असें उद्गारून सरोजिनी खुर्चीवरून उठून उभी राहिली आणि कांहीं वेळ व्हरांड्याच्या रेलिंगवर रेलून अंधाऱ्या बागेकडे तिनें सारखी नजर लावली.

" नाहीं कुणी नाहीं."

असें बोलत कांहीं वेळानें सरोजिनी तेथून परत खुर्चीकडे आली आणि पुनः एक वार आपलीं वस्त्रें नीट, ठाकठीक करून बसली, तेव्हां सतीश तिच्याकडे नुसता पहात राहिला. एकही शब्द बोलला नाहीं.

यानंतर तीं दोघें बराच वेळ गप्पच बसून राहिलीं.

यावेळीं बाहेर वादळ बहुतेक थांबलें होतें, तरी वृष्टि सुरूच होती. माथ्यावरील आकाश अंधारून गेलें होतें आणि चहूं बाजूंच्या मोह वृक्षांच्या वन भागांत तो अंधार दसपटीनें घनदाट झालेला दिसून येत होता.

आणि अशा परिस्थितींत, निर्जन एकान्तांत, त्या किंचित् उजेड असलेल्या व्हरांड्यांत तें तरुणवयस्क स्त्री–पुरुषयुग्म भाषेच्या अभावीं जेव्हां समोरासमोर निस्तब्ध बसून राहिलें होतें, तेव्हां एक आंधळी देवता आड राहून गुप्तपणें गालांतल्या गालांत हंसत होती आणि त्या दाबलेल्या हास्याची प्रभा काळ्याकभिन्न मेघांच्या आडून मधूनमधून क्रीडा करीत होती.

बाहेरची सृष्टिदेवता आपल्या आकाश–वायु-अंधकार प्रकाश यांच्या लीलांनीं मनुष्याचे मनोभाव आणि हृदय-वृत्ति यांना कशी ओढून घेऊं शकते, हें कांहीं काळापूर्वी एके दिवशीं सतीशला चांगलें कळून आलें होतें. त्या दिवशीं विपीनबरोबर सावित्री घर सोडून निघून गेली, ही बातमी बिहारीच्या तोंडून ऐकल्यावर, आपलें सर्व भविष्य दुःखाच्या अथांग सागरांत बुडून गेलें, या विचारानें तो जेव्हां जणूं सर्व भान आणि ज्ञान हरपून एकटाच धांवत पळत किल्याच्या निर्जन आणि निःशब्द मैदानावर गेला आणि त्यानें एकदम निराशेनें लोळण घेतली, त्या वेळीं अशाच अंधारलेल्या आकाशानें आपल्या शीतल हातानें त्याच्या सर्व यातनांच्या ज्वाला शांत करून, सावित्रीला क्षमा करायला त्याला शिकविलें होतें.

त्याप्रमाणेंच आजची ही उद्दाम चंचल बाह्य सृष्टीही आपल्या पूर्ण चैतन्यमय स्पर्शानें सतीशच्या निराशेनें त्रस्त झालेल्या मनाला आतांही पुनः अनिवार वेगानें, दुसऱ्या एका मार्गानें ढकलीत नेऊं लागली.

सरोजिनीनें मध्येंच एकदम प्रश्न केला, " तुमच्या या वनवासाचा अर्थ काय बरं ? "

सतीश गंभीरपणें म्हणाला, " अर्थ कांहीं तरी खात्रीनं असलाच पाहिजे."

" तें तर खरंच आहे. परंतु कुणाला कांहीं न सांगतां सवरतां तुम्ही पळून कां आलां ?"

" पण मी पळून आलों, ही बातमी तुम्हाला दिली कुणीं ?"

सरोजिनी किंचित् हंसली आणि म्हणाली, " या बातमीचा शोध मीं स्वतः लावला. तुम्ही ज्या दिवशीं सकाळीं तिथून निघून गेलां ना, त्या दिवशीं मी स्वतः तुमच्या घरीं गेलें होतें."

सतीश हें ऐकून विस्मित होऊन म्हणाला, " आलं लक्षांत. मला वाटतं, उपेनदादा माझा शोध घ्यायला तिथं गेला अन् त्याच्याबरोबर तुम्हीही गेलां असाल ! तो गेल्याशिवाय रहाणार नाहीं, हें मला माहीत होतं. बरं, मी घरीं नाहीं हें पाहून तो काय म्हणाला ?"

सरोजिनी म्हणाली, " खात्रीनं ते कांहीं तरी बोलले असतील परंतु मी तें कांहीं ऐकलं नाहीं बाई ! कारण, ते स्वतः कांहीं तिकडे गेले नाहींत, माझ्या बरोबर एक पत्र त्यांनीं तुम्हाला द्यायला दिलं होतं."

सतीशनें विचारलें, " बरं, पुढं ?"

सरोजिनी म्हणाली, " मी तुमच्या घरीं गेल्यावर मला कळलं, कीं तुम्ही सकाळच्या गाडीनं निघून गेलां ! तेव्हां, माझ्या मनांत कांहीं कल्पना येऊन तुमच्या सैंपाकी ठाकुराला सांगून दरवाजा उघडून तुमच्या सगळ्या बिऱ्हाडभर मी हिंडून आलें. बाहेरच्या व्हरांड्यांत एक साडी सुकत पडली होती. ती कुणाची, म्हणून चौकशी करतां कळलं, कीं ती साडी माजींची ! ती आजारी असल्यामुळें तुम्ही तिला घेऊन पश्चिमेकडे गेलां म्हणे ! बरं, काय हो—ही माजी ' कोण ? या बंगल्यांत ती कुठं दिसत नाहीं ती ?"

सतीशाचा चेहरा पांढरा फटफटीत पडला.

कांहीं वेळ स्तब्ध राहून तो म्हणाला, " काय म्हणाला, तो भटुरडा ठाकुर ? तिला घेऊन मी पश्चिमेकडे गेलों म्हणून ? रास्कल ! हरामखोर, खोटा-रडा कुठला ! अन् उपेनदादाचा त्यांच्या बोलण्यावर विश्वास बसला ?"

सतीशच्या चेहऱ्याचें ' स्वरूप ' पाहून आणि कंठ-स्वर ऐकून सरोजिनीला अतिशय आश्चर्य वाटलें.

ती म्हणाली, " पण उपेनबाबू मुळीं नव्हतेच तिथं. अन् त्यांनीं विश्वास

ठेवला, तर त्यांचा दोष काय आहे? पण या 'माजी' तुमच्या कोण, सतीशबाबू?"

सतीश त्रासून रुक्ष स्वरानें म्हणाला, "माझी कोण? कुणी नाहीं–कुणी नाहीं! आमच्या एका जुन्या मेसमधली दासी! सैतान–बदमाष–हरामखोर बाई! म्हातारपणीं आजारांत मरत होती, म्हणून आली होती माझ्याकडे कांहीं भिक्षा मागायला. मी म्हणे तिला घेऊन पश्चिमेकडे गेलों! हूं:! तो हरामजादा बदमाष माझ्या तोंडावर जर हें बोलता, तर–तर त्याचा—"

सरोजिनीच्या विस्मयाला पारावार राहिला नाहीं.

थोडा वेळ गप्प राहून ती मृदु स्वरानें म्हणाली, "दासी! पण म्हणून तुम्ही इतके अगदीं चवताळून कां गेलां?"

सतीश म्हणाला, "अन्यायानं कुणीं ठपका दिला, तर कोण नाहीं चवताळून जात—सांगा?"

"त्यांतून त्या काय बेशुद्ध पडल्या?"

सतीश तशाच तापलेल्या स्वरांत ओरडला, "हो, पडली होती. पण म्हणून झालं काय? ती बेशुद्ध होऊन पडली, हा काय माझा अपराध? अन् तुम्ही तरी तिच्यासंबंधानं इतक्या आदराच्या, मानाच्या शब्दांनीं कशाला बोलतां आहां? घरच्या नोकर–मोलकरणींशी तुम्ही काय अनेक वचनी अन् 'आपण–आपला' वगैरे शब्दांनीं बोलतां?"

सरोजिनीनें या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. ती गप्प बसून राहिली.

इतका वेळपर्यंत तिच्या हृदयाच्या आकाशांत जो आनंदाचा चंद्रमा तळपत होता त्याला कुठून तरी काळ्याकुट्ट ढगानं येऊन पूर्णपणें झांकून टाकलें.

एक वेळ तिच्या मनांत असा प्रश्न उपस्थित झाला कीं त्या रात्रीं सतीशच्या घरीं सुरबालेसह उपेन्द्र आला न आला, तोंच क्षणार्धांत तिला घेऊन तो परत गेला कां? परंतु तिनें तो प्रश्न त्याला केला नाहीं. या प्रकरणांत कांहीं तरी पाणी मुरत असून, त्यासंबंधानें उपेन्द्र कांहीं वाच्यता करूं शकत नाहीं आणि सतीशही नाहीं, हें मनांतल्या मनांत एक प्रकारें ती समजून चुकली होती.

परंतु क्षुब्ध वातावरणांतील या निस्तब्धतेमुळें दोघांच्याही मनाला क्लेश होऊं लागले असावे, असें स्पष्ट दिसत होतें.

स्तब्ध रहाणें आतां अगदीं असह्य झाल्यामुळें सरोजिनीनें धीरे धीरे त्याला विचारलें, "बरं, एक गोष्ट विचारूं का तुम्हाला?"

किंचित् अभिमानाच्या स्वरानें सतीश म्हणाला, " कोणती गोष्ट ? "

" इतके दिवस इतके जवळ असतांही तुम्हीं दर्शन दिखील आम्हांला कधीं कसं दिलं नाहीं ? "

सतीशच्या बाजूतें या प्रश्नाला कांहीं उत्तरच नव्हतें !

तो गुळमुळीतपणें म्हणाला, " अनेक कारणांमुळं मला वेळच मिळाला नाहीं. "

" कोणतं कारण ? अभ्यास ? "

" नाहीं. माझा अभ्यास म्हणजे नुसता नांवाचा होता ! त्यामुळं मला कधींही कुठं जायला हरकत झाली नाहीं. "

" तर मग ? "

सतीशनें एकवार हंसण्याचा प्रयत्न केला. परंतु तो तितकासा साधला नाहीं. तो म्हणाला, " हें पहा, खरी गोष्ट तुम्हाला आतां सांगितली तरी चालण्यासारखं आहे. तुम्हा मंडळीची आठवण मला कधीं झाली नाहीं असं नाहीं. पण काय सांगूं तुम्हाला ? आमचा ज्या प्रकारचा समाज, ज्या प्रकारची त्याची शिकवणी अन् कायदेकानू, त्यामुळं तुमच्याकडे येऊन तुम्हां मंडळींशीं मिसळणं मला फार कठीण वाटे—यामुळंच तुमच्याकडे मी कधीं आलों नाहीं, असं म्हणायला हरकत नाहीं. "

सरोजिनी म्हणाली, " म्हणायला हरकत नाहीं ! पण तुमच्या समाजाची शिकवण काय, ती तरी ऐकूं द्या मला. उपेनबाबूंच्या समाजाशीं, मला वाटतं, त्याचं फारसं साम्य नसावं ! कारण, आमच्याशीं मिसळायला त्यांना कांहीं हरकत वाटत नाहीं. "

सतीशच्या घरांतील त्या अज्ञात स्त्रीच्या आगमनाची गोष्ट निघेपर्यंत तिच्या अन्तर्यामीं एक आग पेटलेली होती. तशा स्थितींत अशा असंबद्ध कैफियतीमुळें त्या ईर्षा मत्सराचा दाह अधिक भडकला ! सतीशावर तिचें प्रेम जर गुप्तपणें जडलें असतें, तर त्याचा तो सर्व लपंडाव कदाचित् तिच्या पासून गुप्तच राहिला असता. परंतु प्रणयाच्या प्रखर अन्तर्दृष्टीला इतक्या सहजासहजीं फसवितां येणें शक्य नव्हतें. एकंदर प्रकार जरी तिला कळला नाहीं, तरी त्यांतलें अस्सल मर्म तिच्या हृदयाला कसें तरी कळून चुकलें होतें !

सतीशला विस्मय वाटला आणि दुःखही झालें. कांहीं वेळ सरोजिनीकडे तो पहात राहिला. तिच्या कंठस्वरांतील कलहाचा दाबलेला सूर सतीशच्या कानांना तीव्र ताप देऊं लागला आणि त्यानें त्याला सावित्रीची आठवण करून दिली.

परंतु इतक्या अवधींत सरोजिनीचेंही प्रेम आपणावर जडून राहिलें असेल, असा संभव सतीशाच्या मनांत काय, पण स्वप्नांतही कधीं उदय पावला नव्हता. त्यामुळें, तिच्या या प्रखर प्रश्नोत्तरमालेचा यथार्थ हेतु, सत्याच्या प्रकाशांत, त्याला दिसूं शकला नाहीं, तर त्यांत कांहीं नवल नव्हतें! त्याला तो उच्च शिक्षित तरुणीचा केवळ स्पर्धेचा अभिमान वाटला आणि तिच्यावर तो मनांतल्या मनांत खूब संतापला.

त्यानें तिला जबाबही दिला त्याच सुरांत!

तो म्हणाला, " उपेनदादाचा समाज अन् शिक्षण म्हणजे काय हें त्याचं त्याला चांगलं ठाऊक आहे! तरीही तुम्हां मंडळींत मिळणंमिसळणं त्याला शक्य होत असेल. पण दुसऱ्या कुणाला जर तसं करतां येत नसेल तर त्यानं त्याचा जाब द्यायला हवा, या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं! कांहीं असो--मला तुम्हीं माफ करा. या सर्व चर्चेत कांहीं अर्थ आहे असं मला वाटत नाहीं. तेव्हां—"

सरोजिनी स्तब्ध बसून राहिली. सतीशही खालीं पहात नंतर तमाच गप्प बसला होता.

इतक्यांत एक गाडी येऊन फाटकासमोर उभी राहिली, आणि 'सतीशबाबू —सतीशबाबू' अशा मोठमोठ्यानें हांका मारीत कंदील आणि नोकरचाकर यांच्यासह ज्योतिष बागेंत शिरला.

असंख्य धन्यवाद आणि मनःपूर्वक निमंत्रण वगैरे उपचार यथारीती आटोपल्यावर, बहिणीला घेऊन ज्योतिष तेथून निघावयाचा उपक्रम करूं लागला.

तेव्हां मध्येंच चटकन् आठवण झाल्यासारखें करून सतीशनें सरोजिनीला विचारलें, " एक बातमी तुम्हाला विचारायची राहून गेली. हाराणबाबू नांवाचे उपेनदादाचे एक स्नेही होते, त्यांची काय बातमी आहे ठाऊक आहे तुम्हाला ? "

ज्योतिष कांहींशा आश्चर्यानें म्हणाला, " वा:! तुम्हाला कळलं नाहीं ? ते वारले कीं! "

ती बातमी ऐकून सतीश चार दोन क्षण अगदीं गप्प बसला. नंतर तो एकदम उठून उभा राहिला आणि म्हणाला, " त्यांची आई, त्यांची बायको हीं दोघं कुठं आहेत, माहिती आहे तुम्हाला ? "

ज्योतिषऐवजीं सरोजिनीनें त्याच्या या प्रश्नाचें उत्तर दिलें. ती म्हणाली,"तीं दोघं आपल्या घरींच आहेत. त्यांच्या घरींच आहेत. त्यांच्या घरीं राहून दिवाकर-बाबूंनीं कॉलेजमध्यें जावं, असं ठरलं आहे. ते तिथं राहून त्यांना हवं नको पहाणार आहेत.

ज्योतिषनें मध्येंच एकदम बहिणीला विचारलें, "हाराणबाबूची बायको आमच्या घरीं आली होती ना ग ?"

सरोजिनी म्हणाली, "हो–आली होती अन् बराच वेळही होती. पुष्कळ बोलत होती ती."

आपणा स्वतःसंबंधानें तिनें काय सांगितलं, पतीच्या मृत्यूचा शोक वहिनीनें कसा काय सहन केला, इत्यादि माहिती समजून घेण्याकरतां सतीश सरोजिनीच्या चेहऱ्याकडे उत्सुक दृष्टीनें पहात राहिला. कारण, आपणा स्वतःसंबंधानें अगदीं जालीम चर्चा झाली असेल, या संबंधानें त्याला बिलकुल संशय नव्हता.

परंतु त्या अस्पष्ट प्रकाशांत त्याच्या चेहऱ्यावरील इंगित सरोजिनीला कळलें नरी नसेल, किंवा कळूनही त्याची तीव्र जिज्ञासा पूर्ण करण्याची आवश्यकता तिला वाटली नसेल.

आतां लवकर घरीं जावयाच्या हेतूनें दादाला किंचित् ढकलून ती मृदु स्वरानें म्हणाली, "आतां उगीच उशीर नको करूं, दादा ! चल–चल लवकर–"

"हं–चला, ताईसाहेब !"

असें हंसत म्हणून सतीशला नमस्कार करून ज्योतिष म्हणाला, "पुनः एकदां तुम्हाला असंख्य धन्यवाद देतों, सतीशबाबू ! उद्यां–परवां कधीं तरी एक दिवस गरीबाच्या घरीं पायांची धूळ झाडूं द्या—"

प्रति नमस्कार करून सतीश अस्पष्ट स्वरानें जें कांहीं बोलला, तें कोणासच कांहीं कळलें नाहीं.

सरोजिनीनें मागें वळून सतीशला एक छोटा नमस्कार केला आणि ती तेथून निघाली.

जवळच्या पायऱ्यावर सतीश कांहीं क्षण उभा असतां त्याच्या डोळ्यांतून आसवें झिरपूं लागलीं. त्या आसवांच्या उगमाचें अगदीं ठीक सरळ कारण काय, हें निःसंशय रीतीनें त्याला मनाशीही निश्चित करतां येईना ! परंतु, आपली सावित्री, आपली वहिनी, आपला उपेनदादा या सर्व मंडळींनीं एकदमच,

एकाच काळीं आपला कायमचा परित्याग केला आहे, अशी जाणीव—अन्तः-करणांतील एक अवर्णनीय अनुभव त्याला वारंवार त्रास देऊं लागला.

हें निर्जन स्थान सोडून आपणाला जावयाला एकही ठिकाण नाहीं, असें त्याला मनःपूर्वक वाटूं लागलें.

## ५

दोन महिन्यांपूर्वीं, हाराणच्या मृत्यूच्या वेळीं, दिवाकर कलकत्त्याला आला होता; त्यावेळीं फक्त दोन चार दिवसच तेथें राहून त्याला परत जावें लागलें होतें.

पण आतां किरणमयीच्या देखरेखीखालीं राहून कलकत्त्यांतील कॉलेजमध्यें त्यानें बी. ए. चा अभ्यास करावा, असें निश्चित झाल्यामुळें, आपली नवीच विकत घेतलेली स्टीलची ट्रंक, पुस्तकें, कागदपत्र आणि कपडालत्ता यांनीं तोंडोतोंड भरून, एके दिवशीं संध्याकाळीं, तो पाथुरेघाटावरच्या हाराणबाबूंच्या घरीं येऊन उपस्थित झाला.

किरणमयीनें आपल्या अल्पवयस्क धाकट्या भावाप्रमाणें अतिशय प्रेमळ स्नेहार्द्रतेनें त्याचें स्वागत केलें.

मामाच्या घरीं सुरबालेशिवाय दिवाकराकडे मायेच्या नजरेनें हवें नको पहाणारें कोणी नव्हतें. आणि त्या दृष्टींतही, महेश्वरीची प्रखर दृष्टि, शनीच्या दृष्टीप्रमाणें, पुष्कळ वेळीं बराचसा रस नष्ट करून त्याचें जीवन अगदीं शुष्क करून टाकी! परंतु या ठिकाणीं तसा कोणत्याही तऱ्हेचा त्रास त्याला नव्हता!

विशेष काळजी न घेतलेल्या टबांतल्या रोपट्याला दैवयोगानें धरणीच्या मांडीवर आश्रय मिळाला म्हणजे अमर्याद रसाच्या आस्वादानें त्याचीं भुकेनें वखवखलेलीं, हडहडलेलीं मुळें जशीं मातीमध्यें सहस्र बाहूंनीं विस्तार करतात, त्याप्रमाणेंच किरणमयीच्या आश्रयाखालीं दिवाकराच्या जीवनाची स्थिति झाली.

महानगरीच्या विस्तीर्ण आणि चित्रविचित्र परिस्थितीच्या हवामानांत येऊन पडल्यामुळें दिवाकरच्या आजपर्यंतच्या संकुचित आशा आणि त्यापेक्षांही गळाठलेलें त्याचें भविष्यही अधिकाधिक विस्तार पावूं लागलीं. आपण आतां 'मोठे' होत चाललों आहों, अशी त्याला अन्तर्गामीं जाणीव होऊं लागली. बी. ए. च्या परीक्षेंत नापास झाल्यापासून त्याचें विद्याभ्यासाचें जुनें बंधन तुटलें

होतें आणि नव्या बंधनाला अजूनही विलंब होता. या अत्यंत मधुर अशा मधल्या अवकाश–कालांत दिवाकर एक सारखा सर्वत्र हिंडून फिरून मिळेल तेथून ज्ञानार्जन करूं लागला.

नाटक पाहून येऊन तो स्वप्नदर्शनाचा अनुभव घेऊं लागला. 'जू' पाहून आश्चर्यस्तंभित झाला; पदार्थ संग्रहालय पाहून तो स्तिमित होऊन गेला. शिवपुरचा सरकारी बाग पाहून त्यानें प्रबंध लिहिला आणि राजवाड्यांप्रमाणें भव्य आणि प्रचंड इमारतींकडे तो 'आ' वासून टकमका पहातच राहिला.

आणि शेवटीं एके दिवशीं गाडीखाली सांपडून पाय मुरगळून तो घरीं आला.

आघात फारसा मोठा नव्हता–सामान्यच होता. घाईघाईनें हळद चुन्याचा खता गरम करून आणून त्याच्या पायाला लावीत असतां किरणमयी गालांतल्या गालांत हंसून म्हणाली, "कशाखालीं सांपडलांत, भाऊजी ? घोड्याची गाडी, कां बैलांचा खटारा ?"

दिवाकराचा चेहरा लाल झाला. तो खालीं पहात म्हणाला, "घोड्याची गाडी."

किरणमयी म्हणाली, "तरी निभावलं म्हणतें मी ! नाहीं तर या लंगड्या पायानं खुरडत दंड भरायला ठाण्यावर जावं लागायचं आणखी न् !—"

दिवाकर अधिकच शरमिंदा होऊन म्हणाला, "फारसं लागलं नाहीं—उद्यां सकाळपर्यंत होईल सगळं ठीक."

किरणमयी म्हणाली, "होईल कीं ! पण फार दूर आतां जाऊं नका हं तुम्ही ! पोरं पकडणारी एक टोळी कलकत्त्यांत आली आहे, असं ऐकलं बाई मीं नुकतंच !"

किरण किंचित मोठ्यानेंच हंसली आणि दिवाकर अधिकच खजील झाला.

अशा रीतीनें दिवस चालले होते.

निरनिराळ्या बऱ्याचशा तीर्थयात्रा आटोपून एक दिवस अघोरमयी घरीं आली. यापूर्वी दोन एक दिवस तिनें दिवाकरला पाहिलें होतें, त्यावेळीं पुत्रशोकानें तिचें मन, हृदय हीं जणूं मूर्च्छितच पडलीं असल्यामुळें, त्याचा चेहराही तिच्या कधीं चांगलासा दृष्टीला पडला नव्हता. आज त्या दाढीमिशीही नसलेल्या रम्यकान्ति, तेजस्वी, सुंदर छोकऱ्याकडे नजर जातांच तिचें मातृहृदय अगदीं गळून गेलें ! तिला अगदीं भडभडून आलें.

गद्गद स्वरानें अघोरमयी म्हणाली, "दिवू, नात्यानं मी तुझी मावशी होतें, बरं का ? मला 'मावशी' म्हणून हांक मार हं, बाबा !"

दिवाकरचेही आईबाप जिवंत नाहींत, हें ऐकून म्हातारीचे डोळे अगदीं भरून आले. डोळ्यांच्या कडांवर गळणारे दोन मोठाले अश्रुबिंदु पदराच्या टोंकानें तिनें झटकन् पुसून टाकले.

त्याच्याकडे ती क्षण दोन क्षण पहात राहिली आणि नंतर म्हणाली, " देवानं माझ्या हाराणला नेऊन या अभागिनीला तेवढं मागं ठेवलं आहे. म्हणून म्हणतें, कीं, जोंवर या कुडींत प्राण आहेत, तोंवर मला तूं सोडून जाऊं नको बाबा ! "

असें म्हणून हातानें त्याच्या मस्तकाला स्पर्श करून अघोरमयीनें आपल्या बोटांच्या टोंकांचें चुंबन घेतलें.

तिचें भाषण ऐकून आणि डोळ्यांतून झरणारीं आसवें पाहून, स्वतःच्या डोळ्यांतून गळणारे अश्रु दिवाकरनें झटदिशीं लपविले आणि तिच्या समोरून त्यानें ताबडतोब काढता पाय घेतला.

यानंतर अगदीं थोड्याच दिवसांत, जादुगाराच्या मायावृक्षाप्रमाणें, दिवाकरावरील तिच्या मायेचा वृक्षही शाखा-पर्ण-पल्लवांनीं अगदीं बहरून निघाला. यांत खरें मर्म असें होतें, कीं, ती पुत्रहीन माता, कांहीं दिवस यात्राप्रवासांत घालवून जेव्हां घरीं परत आली, तेव्हां तिचा पुत्रशोक वेगानें उफाळला आणि मुलाची जागा भरून काढावयाची तिला अनिवार तृष्णा लागली. याच घरांत कांहीं महिन्यापूर्वी जेव्हां तिचा स्वतःचा मुलगा मरण पावला, तेव्हां त्या सर्वग्रासी निष्ठुर शोकानेंच तिच्या मातृत्वाचा खुराक पुरवून कशी तरी संसारांत तिला उभी ठेवली होती; आतां तो शोक अपेक्षेप्रमाणें शांत झाल्यावर तिचे भुकेनें कावलेलें मातृहृदय अपत्याच्या अभावामुळें अजिबात खचून चाललें होतें. मुलाच्या मृत्यूनें शून्य झालेल्या त्या सिंहासनावर तिनें मोठ्या धामधुमीनें अभिषेक करून दिवाकराची स्थापना केली.

एका बाजूला अघोरमयी आणि दुसऱ्या बाजूला किरणमयी या दोघांच्या मध्यें ममतेची जागा मिळाल्यामुळें या घरांत त्याच्या लाडांना जणूं मर्यादाच नव्हती !

भूक लागली नसेल, तरी कैफीयत देणें अवश्य, थोडेंसें कोठें दुखलें खुपलें, तरी पुनः पुनः त्याबद्दल होणाऱ्या चौकशीला तोंड देणें जरूर, अशा सर्व स्नेहार्द्र ममतेचें गूढ रहस्य दिवाकराच्या आजवरच्या वीस वर्षांच्या आयुष्यांत त्याला कळून आलें नव्हतें. जीवनांत अकस्मात् झालेल्या या परिवर्तनाच्या

पहिल्या पहिल्या दिवसांत तर त्याला अगदीं चुकल्या चुकल्यासारखें वाटत असे. कोठें कसलाही अधिकार नाहीं, म्हणून त्याला आजपर्यंत जो अतिशय संकोच वाटत असे, तो एकदम नाहींसा होणें शक्य नव्हतें. परंतु थोड्याच दिवसांत अत्यंत कृश झालेलें त्याचें मन, या दोघां स्त्रियांच्या अमर्याद ममतेमुळें अगदीं निर्मर्यादपणें विस्तृत होऊं लागलें. शेवटीं, एके दिवशीं, अत्यन्त क्लेशामध्यें झालेली ती असह्य संवय, शुष्क त्वचेप्रमाणें, देहांतून नकळत कधीं गळून पडली तें त्याला कळलेंही नाहीं !

जें कांहीं पहाण्यासारखें होतें, तें क्रमशः पाहून झालें. पुनः गाडीखालीं सांपडण्याची शक्यता जेव्हां राहिली नाहीं, तेव्हां दिवाकरानें सभा समिती—संमेलनांत भाग घ्यावयाला सुरवात केली आणि थोड्याच दिवसांत एका मासिक पुस्तकाचा तो उत्साही आणि मान्य लेखकही होऊन राहिला.

लहानपणापासून त्याला गाणेंबजावणें आणि वाङ्मय यांची अतिशय आवड असे. 'हाय' 'वेहाय' वगैरे यमकांनी त्याला कविता जुळवितां येत असत. आतां 'दिवाकर वंद्योपाध्याय' अशा स्पष्ट नांवानें तो गोष्टीही लिहूं लागला.

कॉलेजच्या कांहीं विद्यार्थ्यांनीं मिळून 'चन्द्रोदय' या नांवाचें एक मासिक सुरू केलें होतें. त्यांत दिवाकर अगदीं मश्गुल होऊन गेला.

आतां तो वाटेल तेव्हां घराबाहेर पडत नसे. त्याला विलक्षण काम असे ! पडक्या गच्चीवरच्या एका निर्जन कोपऱ्यांत चोपडी आणि पेन्सिल घेऊन तो चेहरा गंभीर करून बसून राही. आंघोळीचें किंवा जेवणाचेंही त्याला भान रहात नसे. खूब हांका बिका मारून त्याला खालीं बोलवून घ्यावें लागे.

दिवाकराच्या मनोराज्यांत ही जी प्रचंड उलथापालथ चालली होती तिच्या-कडे अघोरमयी भयशंकातुर दृष्टीनें पाहूं लागली. ती म्हणाली, " हा या घरचाच गुण ! माझ्या हारागनं लिहून वाचूनच आत्महत्या केली. दिवूला दिखील हाच रोग झालेला दिसतो. छेः बाई ! काय करावं ? परक्याचा मुलगा !—"

किरणमयी सर्व कांहीं लक्षपूर्वक पहात होती.

ती हंसून म्हणाली, " तशी काळजी करायचं कांहीं कारण नाहीं सासूबाई ! त्यांनीं ज्या लिहिण्यावाचण्याचा धोशा घेतला आहे, त्यानं आयुष्य कमी व्हायचं नाहीं—उलट वाढेल ! "

यानंर थोड्याच दिवसांनीं वर सांगितलेल्या ‘ चंद्रोदय ’ मासिकांत ‘ विषारी सुरी ’ नांवाची गोष्ट प्रसिद्ध झाली. ‘ सूर्योदय ’ नांवाच्या नियतकालिकानें आपल्या समालोचनांत त्या गोष्टीची स्तुति करून म्हटलें होतें— ‘ सुप्रसिद्ध तरुण लेखक श्रीयुत दिवाकर वंद्योपाध्याय यांनीं प्रस्तुत कथा लिहिली असून त्यांत प्रेमाचें निर्दोष चित्र रेखाटलें आहे.’

पुढें, या ‘ निर्दोष चित्रांत ’ काय काय आहे, आणि समालोचक महाशयांना ती वाचतांना अश्रु कसे आवरले नाहींत; आणि अशीच दुसरी सुंदर कथा वाचावयाला ते कसे उत्कंठेनें आतुर होऊन राहिले आहेत, वगैरे बाबतींचा आभास उपसंहारांत दिलेला होता.

ही निर्लज्ज चाट स्तुति सत्यच आहे, अशी समजूत करून घ्यावयाला दिवाकरानें मुळींच मागेंपुढें पाहिलें नाहीं. याचे कारण हें, कीं मानवी जीवनांतील ज्या कालांत आशा आणि आकाशपुष्प हीं दोन्हीं कल्पनारूपी मातेची मांडी सोडून निराळीं झालेली नसतात, त्या कालांत तो होता ! तो काल म्हणजे तारुण्याचा प्रारंभ ! एवढ्या लहानशा कालावधींत चारदोन भक्त मित्रांच्या साहाय्यानें तों माथ्यावर साहित्याची जरीची टोपी चढवून दिमाखांत बसला असून, ‘ सूर्योदया ’ च्या संपादकानें त्याच्या गळ्यांत शब्दांचा एक गेंदेबाज घसघशीत हार घातला होता.

अशा अपूर्व साहित्याचा किरीट मस्तकावर चढवून दिवाकर, एक दिवस सकाळीं स्वयंपाक घरांत आला. त्याच्या हातीं ‘ सूर्योदया ’ चा तो अंक होता.

त्यानें विचारलें, “ वहिनी, फार गडबडींत दिसतां तुम्ही ? ”

किरणमयी स्वयंपाकांत गुंतली होती.

ती म्हणाली “ नाहीं–तशी अगदीं गडबडींत आहें असं नाहीं मी. आटोपलंच आहे बहुतेक काम माझं. तुमच्या हातीं हा अंक कसला हो, भाऊजी ?”

“ ओः ! हा होय ? आहे एक मासिक--‘ सूर्योदय ’ नांवाचं. नवीनच निघालं आहे. पण कांहीं म्हणा तुम्ही, वहिनी, लिहितं मोठं छान हं ! ”

किरणमयीला ‘ सूर्योदया ’ च्या अस्तित्वाची दखलही नव्हती.

ती आतुरतेनें म्हणाली, “ खरं ? तर मग द्या मला, बघूं तरी काय आहे तें–”

“ आतां पहातां ? ”

“ नाहीं. आतां नाहीं. माझ्या अंथरुणावर ठेवून द्या तें. दुपारीं फुरसत झाली म्हणजे पाहीन. ”

जेवण खाण आणि इतर काम-धाम आटोपल्यावर किरणमयीनें जाऊन तो ‘ सूर्योदया ’ चा अंक हातीं घेतला.

अंक साधारण चाळतां चाळतां तिची नजर हव्या असलेल्या जागेवर बरोबर गेली.

दिवाकर शेजारच्या खोलींत होता. तिकडे जाऊन ती म्हणाली, “ कुठं आहे भाऊजी ? बोला, कुठं आहे ‘ विषारी सुरी ’? समालोचन दाखवलंत, आतां अस्सल जिन्नस काढा बाहेर. कुठं ? कुठं आहे तो ? ”

दिवाकर सलज्ज विनयानें म्हणाला, “ ओः ! ती गोष्ट होय ? अंः ! ती–म्हणजे कांहीं विशेष अर्थ नाहीं, वहिनी ! अगदीं गडबडीनं लिहिलेली आहे ती गोष्ट ! ”

किरणमयी हंसून म्हणाली, “ असूं द्या. द्या ती अगोदर. ”

असें म्हणून स्वतःच उठून तिनें तो ‘ चन्द्रोदया ’ चा अंक शोधून बाहेर काढला आणि तेथेंच खुर्चीवर बसून तिनें तो उघडला.

तिनें ‘विषारी सुरी’ ही गोष्ट मुकाट्यानें वाचायला सुरवात केली. दिवाकरही आशा आणि आकांक्षा यांचा तीव्र क्षोभ शक्य तेवढा लपवून, तेथें बसून उगीचच्या उगीच एका पुस्तकाचीं पानें उलटूं लागला.

दिवाकराच्या ‘ विषारी सुरी ’ या गोष्टीची नायिका ही असामान्य सुंदर असून सोळा वर्षांची—म्हणजे तारुण्याच्या ऐन भरांत होती. वैभवसंपन्न जमीनदाराची कन्या असतांही तिचें प्रेम दैवविलासामुळें एका निर्धन सुंदर तरुणावर जडलें ! जमीनदाराला अर्थातच त्याचा थांगपत्ता लागून त्यानें क्रोधानें नायक विजयेन्द्रकुमाराला तो प्रदेश सोडून जाणें भाग पाडलें. परंतु नगेन्द्र-नंदिनीला यांपैकीं कांहींच माहीत नव्हतें. वसन्ताच्या एका सायंकाळीं मालती कुंजांत बसून आपणाशींच रंगून ती एक पुष्पहार गुंफीत होती. इकडे तिच्या रूपानें मुग्ध झालेला पूर्ण-चंद्र झाडाच्या आडून डोकावून पाहूं पाहूं करीत होता; परंतु आकाशांत चढून येण्याचें धाडस त्याला होत नव्हतें. सकाळ झाली अशा कल्पनेनें मधून मधून कोकिळा कुहू कुहू शब्द करीत होती; वरती भ्रमर गुं गुं करीत निद्रेमुळें आळसावलेल्या मालतीची झोंपमोड करीत होता.

अशा सुंदर समयीं धीरे धीरे कोण बरें येतो आहे हा ? विजयेन्द्र तर नव्हे ? हां–होय–तोच खरा ! परंतु हा काय त्याचा वेष ! भगवें वस्त्र, कपाळ भस्म-चर्चित, गळ्यांत रुद्राक्षमाला !

नगेन्द्रनंदिनीच्या हातांतील मालतीचा हार खालीं पडला.

विजयेन्द्र जवळ येऊन म्हणाला, " निरोप दे अखेरचा—चाललों मी—"

नगेन्द्रनंदिनीच्या मस्तकावर जणूं एकाएकी दारुण वज्राघात झाला! काळजांत लक्षलक्ष वृश्चिकदंशांच्या असह्य यातना होऊं लागल्या. आपल्या हृदयाचा पिंड जणूं शतशः विदीर्ण होत आहे, असें तिला वाटूं लागलें. तिच्या दृष्टीला चंद्राचा प्रकाश काजळाप्रमाणें काळाकुट्ट दिसूं लागला. कानांत गुंगणाऱ्या कुहू ध्वनीचें घुबडाच्या कर्कश आरोळींत रूपान्तर झालें.

तरुणीला आतां उभेंही रहाणें अशक्य झालें! ती धाडकन मूर्च्छित होऊन जमिनीवर कोसळली.

येथपर्यंत वाचून किरणमयीनें वर डोळे करून दिवाकराकडे पाहिलें आणि विचारलें, " भाऊजी, तुमचं खात्रीनं कुणावर तरी प्रेम बसलें आहे—खरं ना ?

दिवाकर चकितच झाला! विस्मयस्वरानें तो उद्गारला, " काय माझं प्रेम ?

" हो-हो —तुमचं-तुमचं प्रेम भाऊजी! खात्रीनं लपून छपून तुम्ही कुणावर तरी प्रेम करतां आहां! "

या आकस्मिक निंदेच्या आरोपानें दिवाकर शरमेनें अगदीं हतबुद्धच झाला! काय बोलावें तें त्याला सुचेना!

परंतु चार दोन क्षणांनीं स्वतःला किंचित् सांवरून प्रतिवादाचा प्रयत्न करून तो कुंठित स्वरानें व गडबडीनें म्हणाला, " मी ? छीः ! राम-राम ! देवाचं नांव ! कधीं नाहीं-कध्धीं नाहीं-बिलकुल नाहीं. "

" नाहीं ? बरं, काय हो, भाऊजी ? तुम्हाला कधीं विंचू चावला आहे का हो ? "

" नाहीं. कधीं नाहीं बुवा ! "

किरणमयी म्हणाली, " आश्चर्य आहे मोठं! बरं, कधीं कुणाला विंचू चावलेला तरी पाहिला आहे तुम्हीं ? "

" नाहीं–तेंही पाहिलं नाहीं. "

किरणमयी अधिकच आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " तुमचं हृदय कधीं शतधा विदीर्ण झालं असेल, असंही वाटत नाहीं. कधीं तुमचं प्रेम कुणावर जडलं नाहीं; एकादा लहानसा दिखील विंचू तुम्हीं नजरेनं कधीं बघितला नाहीं; वज्राघाताच्या यातना कशा असतात, तेंही तुम्हाला माहीत नाहीं. तरीसुद्धां हें सर्व भयानक वर्णन तुम्हाला कसं करतां आलं ? "

किरणमयी ढकलीत ढकलीत आपणाला कोणीकडे नेत आहे, हें हळुहळू दिवाकराच्या ध्यानांत येऊं लागलें होतें.

आरक्त मुखानें तो चांचरत म्हणाला, " हें सगळं ज्ञान काय करून नाहीं घेतां येत ? "

किरणमयी म्हणाली, " कसं घेतां येतं, हें मला तरी बाई माहीत नाहीं. परंतु ऐकून किंवा दुसऱ्यांच्या पुस्तकांतून चोरी करून हें लिहितां येईल–हें मात्र खरं आहे ! "

तिच्या या भाषणानें दिवाकर एकदम क्षुब्ध झाला.

त्यानें रागानें विचारलें, " मीं चोरी केली, असं तुम्हाला म्हणायचं आहे काय ? "

किरणमयी हंसून म्हणाली, " हो–असं मला म्हणायचं आहे. तुम्हीं चोरी केली आहे, हें तर अगदीं निश्चित ! परंतु आपण चोरी करतों आहों, याचाही पत्ता न लागण्याइतके तुम्ही आंधळेही आहां ! रागवूं नका, भाऊजी ! परंतु एक विंचू अन् दुसरा वज्राघात, यांशिवाय तुमच्याजवळ दुसरी कांहीं पुंजीच नाहीं ! एवढी छोटीशी पुंजी घेऊन तुम्ही हा अथांग समुद्र पार होऊं शकाल, असं खरोखर वाटतं तुम्हाला ? कादंबरी कथा लिहिणं इतकं सोपं किंवा छोटं काम नाहीं, भाऊजी ! तरी दिखील, एका उडीसरशीं समुद्र पार व्हायच्या तुमच्या इच्छेला देवतांचा आशीर्वाद पाहिजे—असं होणं शक्य नाहीं, "

असें म्हणून ती हंसूं लागली.

किरणमयी असें कांहीं तीव्र आणि लागट बोलेल, अशी दिवाकराला बिलकुल कल्पना नव्हती. त्यामुळें तो अगदीं स्तंभितच होऊन गेला. आतापर्यंत जिच्याकडून फक्त चांगले शब्द आणि मधुर परिहास यांच्याशिवाय त्याला दुसरें कांहीं मिळालें नव्हतें, तिच्याचकडून हें तुच्छतादर्शक आचरण आणि शुष्क व्यंग भरलेलें प्रत्युत्तर मिळालें असतां, आपण काय बोलावें यासंबंधानें तो चांगला घोटाळ्यांत पडला, तर त्यांत कांहीं नवल नाहीं.

कांहीं वेळ गप्प राहून दिवाकर आस्ते आस्ते म्हणाला, " तर मग इतके लोक जें लिहितात, त्या सगळ्यांचं काय कुणावर प्रत्यक्ष प्रेम जडलं असतं किंवा त्यांनीं चिरविरहाच्या ज्वाला सोसलेल्या असतात ? कधीं अशा ज्वालांचा

अनुभव आपणाला येईल, अशा आशेनं बसून रहावं लागलं, तर साहित्य-चर्चाच सोडून द्यावी लागेल असं मला वाटतं."

त्याचा तो क्षोभ पाहून किरणमयी किंचित् हंसली.

क्षणभर थांबून ती म्हणाली, "याला काय साहित्य–चर्चा म्हणायचं? याला म्हणतात, अनधिकार चर्चा!"

बोलतां बोलतां तिच्या मुखावरील हास्य लोपून तेथें एकाएकीं कठोरता आली आणि तिचे स्वतःचेच शब्द जणूं काय बुडी मारून हृदयाच्या अन्तर्भागाला हलवून घुसळून, रक्तांत भिजून, जड आणि आरक्त होऊन उसळून आले!

म्लान मुखानें ती म्हणाली, "माझं बोलणं आज तुम्हाला कळायचं नाहीं, भाऊजी! अन् मी तुम्हाला आशीर्वाद देतें, कीं तें कळण्याची तुम्हाला कधीं जरूरही पडूं नये! परतु मी तुमच्यापेक्षां वयानं वडील आहें. तेव्हां माझं एवढंच सांगणं तुम्ही ऐका, भाऊजी, कीं जें तुम्हाला स्वतःला समजत नाहीं, तें दुसऱ्यांना समजून सांगण्याचा खोटा प्रयत्न तुम्ही करूं नका. ज्याची तुम्हाला ओळख नाहीं त्याचा कांहीं तरी भलताच परिचय दुसऱ्यांना तुम्ही करून देऊं नका."

दिवाकर कांहीं बोलला नाहीं, कीं त्यानें वर मानही केली नाहीं.

किरणमयी कांहीं क्षण थांबली. नंतर आपला जड झालेला गळा खांकरून साफ करून ती म्हणाली, "ही रागाची किंवा अभिमानाची गोष्ट नाहीं, भाऊजी ही—दैवाची गोष्ट आहे—अत्यंत मोठ्या दुर्भाग्याची ही गोष्ट आहे. या जगांत, ज्या चार दोन हतभागी माणसांना या अत्यंत गूढ रहस्याचा परिचय इतरांना करून द्यायचा अधिकार मिळालेला आहे, त्यांच्याच हातीं ही मोठी जबाबदारी संपवून जर दुसऱ्या गोष्टींत तुम्ही मन घालाल, तर तें योग्य होईल, अन् नको तें होण्याचा संभवही कमी होईल. गच्चीच्या कोपऱ्यांत चेहरा जरा गंभीर करून बसल्याबसल्या कल्पना करण्यांत कांहीं फायदा नाहीं, हें मी तुम्हाला अगदीं निश्चितपणें सांगतें. गिलिट करून तुमच्यासारख्या अडाण्यांना फार तर तुम्ही फसवूं शकाल, परंतु आगींत जळजळून जे अस्सल सोन्याचा रंग ओळखूं शकतात,–या दुःखाच्या व्यवहारांत जें पूर्णपणं बुडून निघाले आहेत, त्यांना तुम्ही हुलकावण्या देणार कशा भाऊजी!"

दिवाकर आतां खूब नरम पडला. त्यानें विचारलें, "तर मग कल्पना म्हणजे काय कांहींच नाहीं ?"

किरणमयी म्हणाली, "कांहींच नाहीं, असं कांहीं मी म्हणत नाहीं. परंतु निवळ कल्पना कांहीं निर्माण करूं शकली तरी त्यांत प्राण भरूं शकणार नाहीं. पुस्तकांत ती ठीक, परंतु ती मार्ग दाखवूं शकणार नाहीं. हें मार्गदर्शन करील अशा प्रकारचा शोध जोंपर्यंत तुम्हाला लागणार नाहीं, तोंपर्यंत तुमचे विचार तुम्हाला डसतील—इतर कुणाच्याही शरीराला दंश करूं शकणार नाहींत !"

किरणमयीच्या शेवटच्या वाक्यानें दिवाकर मनांतल्या मनांत अतिशय संतापला. त्याच्या अंगाची अगदीं आग होळी झाली !

तो चेहरा लाल आणि भाराक्रान्त करून मुकाट्यानें बसलेला पाहून किरणमयी पुनः हंसली.

ती म्हणाली, "परंतु मला एक कळत नाहीं, भाऊजी !"

दिवाकर कांहीं बोलला नाहीं.

किरणमयी म्हणाली, "तुमच्या या 'सूर्योदय' महाशयांना अश्रु आवरतां न येण्याचा हेतु तरी काय ? नगेन्द्रनंदिनी शेवटीं विष पिऊन मेली बिली तर नाहीं ?"

तरीही तो बोलला नाहीं. तो खूब रागावला होता.

किरणमयीनें गोष्टीच्या शेवटच्या भागाकडे नजर टाकल्यासारखें केलें आणि ती एकदम उद्गारली, "तरीच !"

असें उद्गारून तिनें उच्च स्वरानें वाचावयाला प्रारंभ केला.

'परंतु स्मशानांत हा कोणाचा प्राणहीन देह नेण्यांत येत आहे ? कुणाच्या मागें हे इतके असंख्य लोक वक्षःस्थल जोरानें पिटीत पुढें चालले आहेत ? कोणाच्या शोकामुळें हा नृपतितुल्य दोर्दंडप्रताप जमीनदार असा उन्मादग्रस्त झाला आहे ? अहो ! केवढें हें हृदयविदारक करुण दृश्य ! विजयेन्द्र धीरे धीरे त्याच दिशेकडे येऊं लागला.'

किरणमयी पुढें कांहीं वाचूं शकली नाहीं.

हंसत हंसत हातांतला अंक दिवाकराच्या अंगावर भिरकावून देऊन ती म्हणाली, "आः ! फार उशीर झाला. जातें मी—तुमच्या फराळाची तयारी करायला हवीना !"

असें म्हणून ती हंसत हंसत दिवाकराकडे पहात तेथून निघून गेली.

## ६

यानंतर पांच सहा दिवसांची गोष्ट.

दुपारीं दिवाकर किरणमयीच्या खोलींत गेला आणि पहातो तों ती खालीं जमिनीवरच बसून अगदीं एकाग्र चित्तानें एक हस्तलिखित मूळ संस्कृत रामायणाची पोथी वाचीत आहे, असें त्याच्या दृष्टीला पडलें.

हें पाहून दिवाकराला अतिशय आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

सामान्य गृहस्थाच्या घरच्या बायकांचेपेक्षां किरणमयींचें शिक्षण अधिक झालें आहे, आणि बंगाली आणि इंग्रजी या दोन्ही भाषा तिला चांगल्यापैकीं अवगत आहेत, हें दिवाकराला माहीत होतें. परंतु त्या ' चांगल्या ' ची मजल हस्तलिखित पोथी वाचण्याइतक्या ' चांगल्या ' पर्यंत पोंचली असेल, अशी त्याची स्वप्नांत देखील कल्पना नव्हती.

तत्क्षणीं विस्मयानें स्तंभित होऊन तो जागच्या जागीं खालीं बसला. किरणमयीबद्दलच्या श्रद्धा भक्तीनें त्याचें मस्तक आपोआप खालीं वांकलें.

त्याची चाहूल लागतांच हातांतील पोथी जागच्या जागीं ठेवून त्याच्याकडे पाहून किरणमयी म्हणाली, " एकदम भलत्याच वेळीं हो ? "

दिवाकर किंचित् घोटाळला आणि म्हणाला, " तुम्ही वाचीत असाल, अशी माझी कल्पना नव्हती, वहिनी ! मला वाटलं होतं, कीं बहुधा—"

" झोंपलें असेन मी ! म्हणून छान एकान्त आहे असं पाहून मला उठवायला आलांत वाटतं ? "

दिवाकराचा चेहरा लाजेनें एकदम लालबुंद झाला. तो म्हणाला, " जेव्हां तेव्हां तुम्ही अशी थट्टा कराल तर घर सोडून मी पळून जाईन हां—सांगून ठेवतों तुम्हाला—"

किरणमयी हंसून म्हणाली, " पळून जाईन म्हणतांच पळून जातां येतं वाटतं भाऊजी ? चक्रव्यूहाचा रस्ता माहीत असावा लागतो त्याला ! बरं—बसा बसा अगोदर ! रागावून उठायला नको कांहीं ! मला वाटलं होतं, भाऊजी ! कीं ' विषारी सुरी ' च्या नंतर ' तरवार–बिरवार ' असं कांहीं तरी बडं जंगी तयार करतां आहां तुम्ही खोलीचीं दारं बिरं लावून ! म्हणून मींही तुम्हांला हांक मारली नाहीं. नाहीं तर मला तरी काय या भर दुपारीं रामायण वाचणं आवडतं म्हणतां ? "

दिवाकरनें विचारलें, " रामायणावर तुमचा विश्वास आहे, वहिनी ? "

किरणमयी म्हणाली, " आहे. "

तिचें हें उत्तर ऐकून दिवाकराला अतिशय आश्चर्य वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. तो हळुहळू म्हणाला, " परंतु पुष्कळांचा त्याच्यावर विश्वास नाहीं. तसं पहायला गेलं तर त्यामध्यें इतक्या खोट्या, इतक्या असंभवनीय, इतक्या प्रक्षिप्त गोष्टी आहेत, कीं त्या नाकबुल करतां येणंच शक्य नाहीं. "

किरणमयी किंचित् हंसली आणि पोथी हातानें जराशी त्याच्याकडे ढकलून म्हणाली, " हं–हा रामायणाचा मूळ ग्रंथ; यांतल्या प्रक्षिप्त गोष्टी कोणत्या त्या द्या बरं—"

दिवाकर एकदम खजील झाला.

तिच्याकडे कांहींशा करुण दृष्टीनें पहात तो म्हणाला, " मला त्या कशा काढून देतां येतील, वहिनी ? मला तर संस्कृत येत नाहीं—"

किरणमयी म्हणाली, " येत नाहीं म्हणून तर तुमच्या तोंडून चटकन् असं आलं ! विद्या नसली, कीं अज्ञानरूपी बयेनें येऊन चटकन् घेरलंच समजा ! याचाच परिणाम असा होतो, कीं माणसाला स्वतःला जेवढं माहीत असतं, त्यापेक्षां इतरांना अधिक माहिती द्यावी, असं त्याला वाटायला लागतं ! जें स्वतःला कळत नाहीं, तें इतरांना समजून द्यायला तो आतुर असतो ! ही खराब संवय तुम्ही सोडून द्या, भाऊजी ! "

दिवाकर पराकाष्ठेचा कुंठित झाला. तो जें कांहीं म्हणाला तें बोलण्यांत त्याचा विशेष कांहीं उद्देश होतां असें नाहीं. त्याला वाटलें होतें, कीं धर्मग्रंथांसंबंधानें अश्रद्धा, अविश्वास दाखविला, कीं वहिनी खूष होतील !

किरणमयी किंचित् हंसली आणि म्हणाली, " बरं, हल्लीं लेखन कसं काय चाललं आहे ? "

दिवाकर म्हणाला, " हल्लीं तर कांहीं मी लिहितंच नाहीं. "

आपणाला आश्चर्य वाटल्यासारखें दाखवून किरणमयी म्हणाली, " लिहीत नाहीं ? म्हणतां काय, भाऊजी ? पण तुम्हीं जें कांहीं लिहिलंत, तें कांहीं वाईट नव्हतं झालं. लिहिणं सोडलंत कां सांगा बरं ? "

दिवाकर म्हणाला, "कां उगीच मला लाजवतां, वहिनी ? त्यानंतर मी स्वतःशीं पुष्कळ विचार करून पाहिला—तुमचं म्हणणंच खरं होतं. माझं तें लिखाण दुसऱ्याची अगदीं चोरी नसली, तरी अनुकरण खास होतं. अन् खरंच आहे,

प्रेमा बिमाची मला काय माहिती आहे, तर त्याबद्दल इतकं लंबचवडं मीं लिहायला जावं ? म्हणून, आतां मी कांहीं लिहितच नाहीं–नुसता विचार करतों—"

"विचार करतां ? रात्रंदिवस कसला विचार करतां सांगा बरं ? माझ्याबद्दल तर नाहीं ?"

जणूं काय तिचें म्हणणें ऐकलेंच नाहीं असें दिवाकरनें दाखविलें.

तो म्हणाला, "अन् कथा-कादंबऱ्या लिहिण्याचा माझा नादही कांहीं केल्या सुटत नाहीं, असं दिसतं. म्हणून आज इथं येण्यांत माझा हेतु होता, कीं तुमच्या पासून कांहीं शिकावं !"

किरणमयी म्हणाली, "माझ्यापासून आणखीन् काय शिकणार तुम्ही भाऊजी ? प्रेम तर नव्हे ?"

तिच्या या उत्तरानें दिवाकर भयंकर शरमिंदा झाला. परंतु ती भावना शक्य तों दाबून तो गंभीर झाला आणि म्हणाला, "अगदीं सगळं कांहीं शिकणार ! जरूर पडली तर त्याचंही शिक्षण घेणार !"

शक्य तितकें कृत्रिम गांभीर्य चेहऱ्यावर आणून किरणमयी म्हणाली, "पण त्यांत एक घोटाळा आहे, भाऊजी ! मला पकडून प्रेमाचे धडे तुम्ही घ्यायला लागलांत, तर लोक म्हणतील काय, याचा विचार केला आहे कां तुम्ही ?"

दिवाकर ताडकन् उठून उभा राहिला.

किरणमयीकडे तीव्र दृष्टीनें पहात तो म्हणाला, "जा–जा–काय बोलतां तुम्ही हें वहिनी ? हा मी निघालों. तुमची आपली जेव्हां तेव्हां थट्टा !"

किरणमयीनें पुढें सरून पटकन् त्याचा हात पकडला.

गालांतल्या गालांत हंसून ती म्हणाली, "तर मग स्पष्ट बोला ना, भाऊजी, कीं आपणाला थट्टा बिट्टा नको—केवळ सत्यच हवं आहे."

दिवाकरानें तिच्या हातून जोरानें आपला हात सोडवून घेतला आणि त्वरेनें तो बाहेर पळाला.

किरणमयी मनांतल्या मनांत हंसली. नंतर पोथी आवरून तिनें ती जागच्या जागीं नेऊन ठेवली.

क्षण, दोन क्षण थांबून तिनें स्वतःशीं कांहीं विचार केला. नंतर तेथून निघून ती दिवाकराच्या खोलींत आली.

चेहरा जड भाराक्रान्त करून दिवाकर खिडकींतून बाहेर पहात स्तब्ध बसला होता. त्यानें तिच्याकडे पाहिलेंही नाहीं.

किरणमयी किंचित हंसली आणि म्हणाली, " रागवून तुम्ही पळून कां आलां, सांगा आधीं भाऊजी ? "

दिवाकरानें तोंड फिरवलें नाहीं कीं तो बोललाही नाहीं.

" बोला ना हो ! असं काय ? "

चिरडीच्या स्वरानें तो म्हणाला, " असली थट्टा मस्करी मला बिलकुल आवडत नाहीं ! "

किरणमयी चार दोन क्षण गप्प राहिली.

नंतर स्निग्ध, कोमल स्वरानें ती म्हणाली, " तुम्ही माझे दीर होतां, भाऊजी ! तुमच्याशीं थट्टा मस्करी करायचंच मुळीं माझं नातं आहे ! हें सगळं जर मी केलं नाहीं तर मी जिवंत तरी कशी रहाणार, सांगा बरं ? "

किरणमयीच्या या मृदु स्निग्ध भाषणानें दिवाकराचा सर्व राग ओसरला. आज पहिल्यानेंच त्याच्या मनांत विचार आला–खरेंच कीं ! मला शरमण्यासारखें किंवा रागावण्यासारखें यांत कांहींच नाहीं. आमचे दोघांचें जें नातें आहे, तें थट्टा-विनोद करण्याचें नातें आहे !

बंगाली समाजांत दीर आणि भावजय या उभयतांमध्यें एक मधुर हास्य परिहासाचा संबंधच चालत आला आहे, ही गोष्ट कांहीं खोटी नव्हे. परंतु कोठें, अगदीं बरोबर कोठल्या ठिकाणीं त्याची मर्यादा रेखा पडते, हें देखील पुष्कळांच्या नजरेला येत नाहीं, आणि तें कळावें अशी आवश्यकताही त्यांना वाटत नाहीं. या निर्दोष हास्य परिहासाचा अतिरेक झाला म्हणजे पुष्कळ प्रसंगीं, किती भयंकर विषाचें बीज पेरलें जातें, अगदीं नकळत, ध्यानीं मनीं नसतांना, त्याला अंकुर फुटून त्याचा प्रचंड विषवृक्ष तयार होतो, आणि पुढें एक वेळ सगळ्या कौटुंबिक बंधनांना तो पापानें लडबडून सोडतो, याची कल्पना तरी किती लोकांना असते ?

दिवाकरानें आतां वहिनीकडे तोंड फिरवून पाहिलें.

ती हंसून म्हणाली, " बोला—

अभिमानाच्या स्वरानें दिवाकर म्हणाला, " मी आलों तुमच्याकडून धडे घ्यायला अन् तुम्हीं माझा उपहास करून मला पार हांकून दिलंत, तेव्हांच सोडलंत ! "

किरणमयी बिछान्याच्या एका टोंकाशीं बसून म्हणाली, " कसले धडे घ्यायला आलां होतां भाऊजी, तुम्ही ! "

दिवाकर म्हणाला, "सांगितलंच कीं मीं आतां तुम्हाला—कथा लेखनाचा नाद कांहीं केल्या माझा सुटत नाहीं. म्हणून मनांत मी म्हटलं होतं, कीं तुम्ही मला शिकवाल, तोंडानं बोलत जाल, मी तें भरभर लिहून घेईन—"

किरणमयी हंसून म्हणाली, "मग तें माझं लिखाण होईल, भाऊजी!– तुमचं नव्हे."

"होऊं दे झालं तर! परंतु त्यानं मला शिक्षण मिळेल. नुसतं डोक्यांत ज्ञान असलं म्हणजे झालं नाहीं; तें व्यक्त करण्याचं सामर्थ्यही अंगीं असलं पाहिजे–"

"तें तर हवंच म्हणा–पण व्यक्त काय करणार तुम्ही, तें तर ऐकू द्या अगोदर—?"

"तें तर तुम्ही सांगायचं आहे—"

किरणमयी पुनः एकदां मोठ्यानें हंसली.

दिवाकरनें चमकून तिच्याकडे पाहिलें.

क्षणभरानें ती हंसत हंसत म्हणाली, "तर मग तुम्ही दुसरा कुणी तरी गुरू पकडा, भाऊजी! हे काम माझ्यानं होण्यासारखं नाहीं. मारवाडांत माणुस तहानेनं कसा मरतो, हें पाण्यांतल्या माशाला जर समजून घ्यायचं असेल, तर तिथं दुसऱ्या कुणा माणसाची जरूरी आहे—माझ्या विद्येनं किंवा बुद्धीनं हें काम निभावण्यासारखं नाहीं."

दिवाकर कांहीं क्षण गप्प राहिला.

नंतर तो म्हणाला, "वहिनी, मारवाडच्या मुलुखांत तहान कशी लागते, हें मला माहीत नाहीं; पण मी जलचर प्राणीही नाहीं. तुमच्या सारखं जमिनीच्या स्थलावर ज्याअर्थी माझं वास्तव्य आहे, त्याअर्थी तहानेचीही जाणीव थोडी बहूत मला असणारच! एकवार सांगून तर पहा माझी समजूत पटते, कीं नाहीं ती—"

किरणमयी कांहीं बोलली नाहीं; केवळ हंसतमुखानें त्याच्याकडे पहात राहिली.

दिवाकरही जवळजवळ मिनिटभर गप्प राहिला. नंतर तो म्हणाला, "आतां तुम्ही जें रामायण वाचीत होतां, वहिनी, त्याच्याच संबंधानं मी बोलतों. सीतेच्या ज्या सौंदर्याच्या आगींत सकुटुंब सपरिवार जळून रावणाचा जो पुरा विध्वंस झाला, तें स्त्रीचं सौंदर्य हें काय प्रकरण आहे? अन् हा रावण कांहीं एकटाच नाहीं. असें किती तरी रावण इतिहासांत आहेत!"

असें म्हणून तो किंचित् थांबला.

किरणमयी तरीही कांहीं बोलली नाहीं.

क्षणभरानें दिवाकर पुढें म्हणाला, " रूप–तृष्णा–रूपाची तहान, असं कवि म्हणतील. तुम्हीं दिखील अशीच उपमा दिलीत, नव्हे ? तुम्ही असं समजूं नका, वहिनी, कीं मी तुमच्याशीं वादविवाद करतों आहें ! मला ठाऊक आहे, तुमच्या पायांशीं बसून मला किती तरी कालपर्यंत धडे घ्यावे लागतील ! मला फक्त एवढंच ऐकायची इच्छा आहे, कीं हिला 'तहान' म्हणून कां म्हणतात ? पाणी माणसाच्या दृष्टीला पडलं, कीं त्याला तहान लागते असं जर नाहीं, तर रूपाचं दर्शन होतांच त्याला तहान लागावी कां म्हणून ? "

किरणमयी चेहरा वर करून एकदम मोठ्यानें हंसली.

" लागते का पण तहान त्याला ? "

तिचें हास्य आणि प्रश्न यांचा खरा अर्थ ध्यानांत आल्यामुळें दिवाकर चार दोन क्षण बावरल्यासारखा झाला. काय बोलावें तें त्याला सुचेना !

परंतु लगेच तो म्हणाला, " खात्रीनं लागते ! "

थोड्या वेळापूर्वी आपल्या मनांत विलक्षण संकोच उत्पन्न होऊन आपली बुद्धिही एक प्रकारें कुंठित झाली होती, तर्कवादांत धाडस करून कांहीं मुद्दे चांपावे, असलाही आंवाका आपणाला राहिला नव्हता, याचें दिवाकराला स्मरण होतें; परंतु थट्टा विनोद, रहस्यालाप हीं सुरू असतां, त्यांतूनच हळुहळू तें लुप्तप्राय साहस पुनः ताजेंतवानें कसें झालें, हें त्याचें त्यालाही कळलें नाहीं !

तो कांहींशा आवेशानें म्हणाला, " तसं जर नसतं, तर जगांतल्या मोठमोठ्या कवींनीं शाकुंतल लिहिलं नसतं, रोमिओ-जूलिएटही लिहिलं नसतं ! म्हणून तर समजून घ्यायची माझी इच्छा आहे, कीं स्त्रीचं रूप ही वस्तु खरोखरी आहे तरी काय ? अन् प्रेम दिखील इतक्या घनिष्ठ रीतीनं त्याच्याशीं जुळून कां जातं ? त्याच्यावर उड्या कां टाकतं ? "

किरणमयी गंभीरपणें म्हणाली, " ओः–नाहीं. तुमची अवस्था तितकी खराब नाहीं. "

दिवाकर विषण्ण झाला. उद्विग्न स्वरानें तो म्हणाला, " सगळ्याच गोष्टी जर तुम्हाला अशा रीतीनें उडवून द्यायच्या असतील वहिनी ! तर राहूं दे. मी तुम्हाला आतां कांहीं विचारीतच नाहीं. "

त्याचा तो चेहरा पाहून आपणही अतिशय विषण्ण झालों आहों, असा कृत्रिम भाव चेहऱ्यावर आणून किरणमयी म्हणाली, " मी एक मूर्ख बाई-माणूस,

भाऊजी ! या सगळ्या बड्या बड्या गोष्टीबद्दल मला काय ज्ञान असणार, तें तुम्ही माझ्यावर उगीच रागवावं ? ”

दिवाकराला चटकन् दुसऱ्या एका दिवसाचें स्मरण झालें. त्या दिवशीं वेदांचाही किरणमयीनें तुच्छतेनें उल्लेख करतांच त्यानें कानांत बोटें घातलीं होतीं.

तो हळुहळू म्हणाला, “ मला ठाऊक आहे, वहिनी ! तुम्ही मोठ्या विदुषी आहां–तुमचं ज्ञान अगाध आहे ! मनांत आणलंत, तर तुम्ही सर्व विषय मला उत्कृष्ट रीतीनं समजावून द्याल, अशी माझी खात्री आहे. ”

किरणमयी हंसून म्हणाली, “ असं ? बरं तर मग, मी जर सांगितलं कीं स्त्रीचं रूप हा एक केवळ भ्रम आहे, त्यांत अस्सल वस्तु कांहीं दिखील नाहीं–मृगजळाप्रमाणं तें खोटं आहे, तर त्यावर तुमचा विश्वास बसेल भाऊजी ? ”

दिवाकर मान हालवून म्हणाला, “ नाहीं. त्याचं कारण असं, कीं मृगजलही खोटं नाहीं—तें आहे तेंच आहे. आरशांत माणसाचं प्रतिबिंब पडतं, ती छाया, माणूस नव्हे ही तर सर्वांना माहीत असलेली गोष्ट आहे. छायेला माणूस म्हणून धरायला गेलं, तर ती अर्थात् स्वतःची फसवणूक होईल. परंतु रूप हें त्याप्रमाणं कांहीं कोणत्याही वस्तूचं प्रतिबिंब नाहीं. सापाला दोरी म्हणून समजणं ही भूल, मृगजलालाही पाणी म्हणून धांवत जाऊन धरण्यांत फसगतच होणार ! परंतु माणूस रूपाच्या तृष्णेनंच त्याच्या मागं धांवत जातो, वहिनी ! ”

किरणमयी म्हणाली, “ भाऊजी, आतांच तुम्ही आरशांत प्रतिबिंब पहायची एक उपमा दिलीत. ज्या दिवशीं तुम्हाला कळून येईल, कीं स्त्री हीच माणसाची छाया—माणूस नव्हे, केवळ त्याच दिवशीं तुम्हाला प्रेमाचा शोध लागेल. पण तें असू दे. तुम्हाला विचारतें, रूपाच्या मागं तरी माणूस धांवत जातो, तें कां ?”

मान हालवून दिवाकर म्हणाला, “ तें मला ठाऊक नाहीं. भ्रमरला सोडून दिखील गोविंदलाल रोहिणीच्या मागं धांवत गेला, ही गोष्ट मला अतिशय अद्भुत अन् विस्मयकारक वाटते. ”

“ परंतु त्याचा परिणाम काय झाला ! ”

“ परिणाम कांहींही झाला असो वहिनी, त्याच्या न्यायाची जबाबदारी माणसाच्या हातीं नाहीं. रोहिणीपाशीं रूप होतं–पण गुण नव्हते. परंतु सौंदर्याबरोबर गुणही तिच्या ठिकाणीं असते, तर गोविंदलालाचं काय झालं असतं, हें सांगतां येत नाहीं. ”

किरणमयी गप्प राहिली.

या बी. ए. झालेल्या छोकऱ्या संबंधानं मनांतल्या मनांत ती संतुष्ट नव्हती. केवळ परीक्षा नापास झाल्यामुळेंच तिचें मन तसें होतें असें नव्हे. तो पास झाला असता, तरी तिला वाटलें असतें, कीं नेमलेली पुस्तकें तोंडपाठ करूनच ही मंडळी कशी बशी परीक्षा पास होत असतात ! दुसरें कांहीं यांना शक्यच नसतें ! परंतु जरूर पडली म्हणजे त्यांचे शिक्षित मन तर्क युक्तीही लढवूं शकतं, ही कल्पना तिला मुळींच नव्हती.

ती म्हणाली, " भाऊजी, रूप ही छाया नव्हे, ही भावना इतक्या निःसन्देहपणें मनांत कायम करून ठेवूं नका. तें कांहीं असो, मी तुम्हांला विचारतें, भाऊजी, हें सर्व तुम्हीं मनाशीं विचार करून ठरवलं आहे, कीं कुणीं तरी दुसऱ्यानं विचार करून ठरवलेल्या गोष्टी तुम्ही बोलतां आहां ? "

दिवाकर मृदु हंसला.

तिनें जिज्ञासु नजरेनें त्याच्याकडे पाहिलें, तेव्हां तो म्हणाला, " नाहीं, वहिनी ! मी बोलतों आहें, हे सगळे माझे स्वतःचेच विचार आहेत. लहानपणापासूनच परमेश्वरानं मला अनेक गोष्टींचा विचार करण्याची हवी तेवढी संधि दिली आहे पहा. "

किरणमयी कांहीं क्षण स्तब्ध बसून राहिली.

नंतर ती म्हणाली. " अन् इतकं असूनही, इतकी संधि मिळूनही, रूपाचं तत्त्व तुम्हाला शोधूनही सांपडलं नाहीं; परंतु आश्चर्य एवढंच वाटतं, कीं सतीशभाऊजींनीं देखील एक दिवस मला हीच गोष्ट विचारली होती. दुसऱ्या एकानंही हाच प्रश्न केला होता, अन् आज तुम्हीही तेंच विचारतां आहां. माझ्या मनांत असं येतं कीं माझं रूप पाहूनच तुम्हा सर्वांच्या मनांत हा प्रश्न उत्पन्न झाला काय ?

एकाएकीं दिवाकर मनांत चमकला !

शरमेनें त्याच्या मस्तकाचा चुरा होऊं लागला. तो खालीं मान घालून म्हणाला, " मला माफ करा, वहिनी ! मला हें ठाऊक नव्हतं—"

किरणमयी हंसून म्हणाली, " एक वेळ नाहीं, तर तुम्हाला शंभर वेळ मी क्षमा करतें. "

असें म्हणून ती कांहीं वेळ गप्प राहिली. मनांत अकस्मात् उत्पन्न झालेल्या एका शंकेला बलपूर्वक हांकून देऊन तिनें तें अगोदर साफ केलें.

आपला अतुल सुंदर कंठभाग किंचित् उचलून कांहींशा कारुण्यपूर्ण मृदल स्वरानें ती बोलूं लागली, " भाऊजी, आज तुम्हीं जितक्या गोष्टी मला विचाऱल्यात त्यांची उत्तरं जर मी देऊं लागलें, तर तें माझ्या दांभिकपणाचं लक्षण असं तुम्हाला खास वाटेल. तें अगोदर तुम्हाला विसरून गेलं पाहिजे! नाहीं तर स्वतःच्या चुकीनं माझ्याविषयीं चुकीचा समज करून घेऊन तुम्ही साराच एक घोटाळा उडवाल! मी काय म्हणतें तें ध्यानांत आलं तुमच्या, भाऊजी?"

दिवाकरानें मुकाट्यानें मान हलविली.

किरणमयी एक क्षण स्तब्ध राहिली. नंतर ती म्हणाली, " माझ्या शरीराचं हें सौंदर्य, केवळ तुम्हा पुरुषांच्या दृष्टीलाच नव्हे, तर मला स्वतःलाही एक अतिशय अद्भुत, विलक्षण गोष्ट वाटते. यामुळं माझ्या रूपाबद्दल मीं पुष्कळ पुष्कळ विचार केला आहे. त्या संबंधानं जे सिद्धान्त मीं स्वतःशींच विचार करून ठरवलें आहेत, ते बरोबर असतील, किंवा कदाचित् नसतीलही; परंतु तें कांहीं असलं तरी, माझ्या या भावना दुसऱ्या एका दिरापाशीं प्रकट करायला ज्याअर्थी मला लज्जा वाटली नाहीं, त्याअर्थी तुमच्याजवळही त्या बोलायला मागं पाऊल घ्यायचं मला कांहींच कारण नाहीं. माझं स्वतःचं निरीक्षण केल्यावर मला काय वाटलं ठाऊक आहे? माझी अशी भावना झाली आहे, कीं अपत्यधारणेसाठीं जीं सर्व लक्षणं सर्वांपेक्षां अधिक उपयोगी, तेंच हें स्त्रीचं रूप. सगळ्या जगांतल्या साहित्यांत, काव्यांत हें वर्णन म्हणजेच तिच्या रूपाचं वर्णन!"

दिवाकर मुग्धपणें गप्प राहून किरणमयीचें हें प्रवचन ऐकत होता.

त्याच्या त्या स्तब्ध मुखमंडलावर नवीन यौवनांतील नुकत्याच जागृत झालेल्या एका क्षुधेची मूर्ति तिच्या दृष्टीला दिसूं लागून, ती संकोचानें एकदम थांबली.

परंतु एक क्षणच!

दुसऱ्याच क्षणीं नेटानें, बलपूर्वक ती दृष्टीआड करून ती म्हणाली, " तसं पाहिलं तर, भाऊजी, या ठिकाणींच रूपाचं एक संधान बरोबर सांपडतं. याच कारणामुळें, स्त्रीच्या बालपणच्या रूपानं माणूस जरी आकर्षित होतो, तरी त्यामुळें तो बेहोष होत नाहीं; त्याप्रमाणेंच, ज्या कालीं संतानधारणेचं तिचं वय मागं पडतं, त्या वेळींही असचं होतं. तुम्ही हेंही लक्षांत घ्या, भाऊजी, कीं केवळ स्त्रियांचीच नव्हे, तर पुरुषांची दिखील हीच स्थिति आहे. ज्या क्षणा-

पर्यंत व्यक्ति उत्पत्ति करूं शकतें आहे, तोंपर्यंतच तिचं रूपही आहे. हे सृजन करण्याचं तिचं सामर्थ्य हेंच तिचं रूप-सौंदर्य, तारुण्य! उत्पत्ति करण्याची तिची इच्छा, हेंच तिचं प्रेम!"

दिवाकर आस्ते आस्ते म्हणाला, "पण—"

किरणमयी त्याला मध्येंच थांबवून एकदम म्हणाली, "नाहीं—'पण परंतु' ला यामध्यें जागा नाहीं! चराचर विश्वाची कोणतीही बाजू तुम्ही पहा—जिकडे तिकडे ही एकच गोष्ट! भाऊजी, सृष्टितत्त्वाची मूळ कथा तुमच्या त्या सृष्टिकर्त्यासाठीं हवी तर राखून ठेवा; परंतु सृष्टिकार्याकडे तुम्ही एकवार नजर फेंका. तुम्हाला असं आढळून येईल, कीं स्वतःला नवरूपांत निर्माण करण्याची त्यामधल्या अणु-परमाणूंची तीव्र इच्छा असते. कशा तऱ्हेनं स्वतःचा विकास करून घ्यावा, कुठं गेलं असतां, कुणाशीं मिसळलं असतां, काय केलं म्हणजे, आपण आणखीही अधिक सबल, अधिक उन्नत होऊं, हाच त्यांचा अविश्रान्त उद्योग चालू असतो. म्हणूनच, आंत अन् बाहेर, दृश्यांत अन् अदृश्यांत, निसर्गाची नेहमींच अशी प्रचंड घडामोड सुरू असते, अन् म्हणूनच, स्त्रीमध्यें पुरुष जेव्हां कांहीं विशेष पाहूं शकतो, तेव्हां, समजून असो अथवा अजाणतां असो, आपणाला आणखीही अधिक सुंदर, अधिक बलवान् कसं करून दाखवितां येईल, हा लोभ त्याच्या मनांत एकसारखा धमधमत असतो अन् तो कधींही थांबत नाहीं!"

दिवाकर हलु हळू म्हणाला, "असं दिसत नाहीं—"

किरणमयीनें त्याच्याकडे प्रश्न दृष्टीनें पाहिलें.

तो लगेच म्हणाला, "तसं असतं, तर चहूंकडे मारामारी, काटाकाटी सुरू असती!"

किरणमयी म्हणाली, "मधून मधून असते तर काय झालं! परंतु माणसाची लोभदमन करण्याची शक्ति, स्वार्थत्यागाची शक्ति, समाजाची शासन-शक्ति अशा अनेक विरोधी शक्ति अस्तित्वांत असल्यामुळें, चहूंकडे एकदमच आगीचा हलकल्लोळ होऊं शकत नाहीं. आणि या सामाजिक माणसाच्या आयुष्यांत असाही एक काळ होता, कीं त्या काळीं तो प्रवृत्तीशिवाय दुसऱ्या कुणाचंच शासन मानीत नसे!—सौंदर्याच्या आकर्षणामधील त्याच्या या दुर्दान्त प्रवृत्तीची प्रेरणा हेंच त्याचं प्रेम होतं! असे आश्चर्यानं स्तिमित होऊन जाऊं नका.

भाऊजी ! यालाच फॅशनेबल कापडचोपड पेहरवून, सजवून गोजवून उभं केलं, कीं कादंबऱ्यांतील नितळ प्रेम तयार होतं ! ”

दिवाकर स्तंभित होऊन म्हणाला, “ कुठं पाशवी प्रवृत्तीची प्रेरणा, अन् कुठं स्वर्गीय प्रेमाचं आकर्षण ! जो माणुस पशूच्या प्रवृत्तींनीं कांठोकांठ भरलेला, त्याला शुद्ध, निर्मल, पवित्र प्रणयाचा गौरव कितीसा कळणार ? ही वस्तु त्याला कुठं अन् कशी मिळणार ? तुम्ही कुणाबरोबर कुणाची तुलना करतां आहां वहिनी ? ”

किरणमयी म्हणाली, “ मीं तुलना केलीच नाहीं, भाऊजी ! दोन्ही वस्तु एकच आहेत, एवढंच मीं सांगितलं. भाऊजी, इंजनांतली जी वस्तु त्याला पुढं ढकलते, तीच वस्तु त्याला मागंही ढकलूं शकते; इतर कोणतीही वस्तु असं करूं शकत नाहीं. जो प्रेम करूं शकतो, तोच केवळ सुंदर, असुंदर सर्व प्रकारच्या प्रेमांत आपणाला बुडवूं शकतो–दुसऱ्यांना हें शक्य होत नाहीं. ”

दिवाकर कांहीं बोलणार होता, असें दिसलें; परंतु तो गप्पच राहिला.

किरणमयी म्हणाली, “ तुम्हीं गोविंदलालचंच उदाहरण दिलंत भाऊजी ! त्याच्यामधील ज्या प्रवृत्तीनं भ्रमरवर त्याला प्रेम करायला लावलं, तीच प्रवृत्ति त्याला रोहिणीकडेही ओढून घेऊन गेली; परंतु हरलालला तें शक्य झालं नाहीं. संसारांतलं चांगलं वाईट, कर्तव्य अकर्तव्य, सुयोग कुयोग, यांचा कीस काढीत त्यानं आत्म-संयमन केलं; परंतु गोविंदलालला तें करतां आलं नाहीं. अन् हरलाल हा माणुस गोविंदलालपेक्षां कांहीं बरा नव्हता—पुष्कळच वाईट होता. परंतु तिरस्कारानं जिचा त्याग करून तो गेला, तिलाच दुसऱ्या एकानं माथ्यावर धारण केलं–”

“ पण—”

किरणमयी मध्येंच म्हणाली, “ निरनिराळ्या कारणामुळं हें एकाद्या व्यक्तीला माथ्यावर घेणं निष्फळही होऊं शकेल; परंतु सर्व दुःख, ग्लानि, लज्जा यांच्या पलीकडे एका मोठ्या सार्थकतेचा संकेत एका व्यक्तीला दुसऱ्या व्यक्तीकडे ओढून नेत नाहीं, असंही कुणी छातीला हात लावून सांगूं शकत नाहीं, भाऊजी ! ”

दिवाकर आतां अतिशय क्षुब्ध स्वरानें म्हणाला, “ तुमचं सर्वच भाषण जरी मला समजूं शकलं नाहीं, तरी पवित्र प्रणय हा स्वर्गीय नाहीं, हा अद्भुत सिद्धान्त मी कांहीं केल्या मानायला तयार नाहीं, वहिनी ! ”

किरणमयी म्हणाली, “ तुमच्या मानण्या-न–मानण्यावर कांहीं अवलंबून

नाहीं, भाऊजी ! आमचा हा देहसुद्धां अत्यंत नश्वर, संपूर्ण पण एक पार्थिव वस्तु आहे. पण त्यांत कांहीं दुःखाचं कारण आहे, असं मला वाटत नाहीं. मूल जन्माला आल्यापासून जोंपर्यंत त्याच्या जड देहामध्यें शक्तीची अन् पुष्टतेची भरपूर भर होत नाहीं, तोंपर्यंत प्रेमाचं सिंहद्वार त्याच्या समोर बंदच असतं. प्रवृत्तीच्या प्रेरणेच्या जोरानंच त्या सिंहद्वारांतून तो पलीकडे जातो. त्यापूर्वी तो आपल्या आई–बापांवर, भावांबहिणीवर प्रेम करतो. परंतु त्याचा पंचभूतात्मक देह वाढून जोंपर्यंत मोठा होत नाहीं, तोंपर्यंत तुमच्या स्वर्गीय प्रेमाची बातमी दिखील मिळवायचा अधिकार त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होत नाहीं ! तोंपर्यंत स्वर्गीय आकर्षणं त्याला एक तिळभर दिखील हलवूं शकत नाहीं. पृथ्वीचं गुरुत्वाकर्षण तर सदोदित कायमच आहे. परंतु झाडावरचं पिकलेलं फळच केवळ त्या आकर्षणांत आत्मसमर्पण करूं शकतं—हिरवं–कच्चं करूं शकत नाहीं. त्याचा गर किंवा खाद्य भाग पृथ्वीच्या रसानंच परिपक्व होतो—स्वर्गातल्या रसानं नव्हे. सुंदर फूल, सौंदर्य, सुवास, अन् मद्य यांच्या साधनांनीं मधमाशीला आकर्षून आणतं अन् त्याचं फळं बनतं ही त्याची प्रकृति, ही त्याची प्रवृत्ति, हें त्याचं स्वर्गीय प्रेम ! सगळ्या विश्वभर हा जो अविराम सृष्टीचा खेळ, सौंदर्याचा खेळ चालला आहे, तो स्वर्गीय नाहीं म्हणून त्यांत दुःख करण्यासारखं किंवा लाज वाटण्यासारखं कांहीं आहे असं मला वाटत नाहीं."

किरणमयी किंचित् थांबली. दिवाकरही कांहीं बोलला नाहीं.

थोड्या वेळानें किरण म्हणाली, " अंधारांत भुतांच्या भयानं डोळे मिटूनच जर तुम्हाला आराम वाटत असेल, तर ते उघडून पहायला मी तुम्हाला सांगत नाहीं; परंतु प्रवृत्तीच्या प्रेरणेकडे ढुंकूनही न पहातां स्वर्गीय प्रेमाचा मात्र मी उपभोग घेईन—प्रेमाचा व्यवहार इतका सरळ अन् सोपा नाहीं ! "

दिवाकर म्हणाला, " तर मग जगांत पवित्र प्रेम, निंद्य प्रेम हीं दोन्ही कां आहेत ? "

किरणमयी एकदम मोठ्यानें हंसली.

क्षणभर थांबून ती त्याच्याकडे पहात जरा गंभीर होऊन म्हणाली, " तुमचा हा मुद्दा अगदीं सतीशभाऊजींच्या चालीवरच आहे. जगांत हीं दोन्ही असायचींच, म्हणूनच तीं आहेत. मनुष्याची प्रवृत्ति ही असायची म्हणूनच आहे. ज्याला तुम्हीं ' निंद्य ' म्हणतां, तें म्हणजे वास्तविक सुबुद्धीचा अभाव–अर्थात् ज्यावर प्रेम करणं योग्य नाहीं, त्यावरच प्रेम करणं ! बेसावध-

पणें झाडावरून पडून हात पाय मोडून घ्यावयाचे अन् दोष द्यायचा गुरुत्वाकर्षणाला ! तोच प्रकार प्रेमाला निंद्य, अपवित्र, कुत्सित अशीं नांवं ठेवण्याचा आहे. भाऊजी, या जगांत एकाचा अपराध दुसऱ्याच्या माथ्यावर चापला जातो तो असा ! ”

असें म्हणून किरणमयी एकदम थांबली आणि स्वतःच्या अन्तर्यामी कोणत्या तरी गोष्टीचें बारकाईनें निरीक्षण करूं लागली.

कांहीं वेळानें ती म्हणाली, “ तुम्हाला मी मघाशींच सांगितलं, भाऊजी, जीवांतला प्रत्येक अणु-परमाणु, रक्ताचा प्रत्येक कण, शक्य तितका आपला उत्कृष्ट विकास व्हावा अशी तीव्र इच्छा करीत असतो अन् तो लोभ तो कधींही सोडीत नाहीं. ज्या देहांत त्याचा जन्म झालेला असतो, त्या देहांतील त्याच्या परिणतीची ठराविक मर्यादा एका काळीं उलटून जाते; तेंच त्याचं तारुण्य ! याच वेळीं दुसऱ्या देहाशीं संयोग होऊन केवळ अधिकांत अधिक कृतार्थ व्हावं म्हणून शिराशिरांत अन् उपशिरांत जें तांडव तो उत्पन्न करतो, त्याचीच पंडित मंडळीच्या नीतिशास्त्रांत ‘ पाशविक ’ या संज्ञेनं निंदा केली जाते ! या सर्व प्रकारांतलं मर्म न कळल्यामुळं, हतबल झालेलं ‘ तज्ज्ञ ’ पंडितांचं टोळकं त्याला ‘ निंद्य ’, ‘ अपवित्र ’ वगैरे विशेषणं देऊन आपल्या मनाचं समाधान करून घेतं ! पण आज तुम्हांला मी अगदीं निश्चयपूर्वक सांगतें भाऊजी, कीं एवढं प्रचंड आकर्षण, कांहीं झालं तरी, असं तिरस्करणीय, असं निंद्य, असं क्षुद्र होणं कधींही शक्य नाहीं. हें सत्य आहे—सूर्य प्रकाशाप्रमाणं सत्य आहे. ब्रह्मांडाच्या आकर्षणाइतकं सत्य आहे. कोणत्याही तऱ्हेचं प्रेम कधींही निंद्य, तिरस्करणीय होऊं शकत नाहीं. ”

किरणमयीनें संभाषणाच्या भरांत आवेगानं केलेलं हें प्रवचन ऐकून दिवाकर खरोखरच अगदीं थरारल्यासारखा झाला. त्याच्या अन्तर्भागांत कांहीं विलक्षण तऱ्हेनें ‘ शिर शिर ’ असे आवाज होऊं लागले. असा अतिशय कडक तापलेला खणखणीत कंठस्वर त्यानें कधीं ऐकला नव्हता. डोळ्यांतील अशी उत्कट, अशी आगीआग नजरही कधीं त्याच्या दृष्टीला पडली नव्हती !

भयभीत होऊन त्यानें कशीबशी हांक मारली, “ वहिनी—”

“ काय, भाऊजी ? ”

“ माझ्यासारख्या मूर्ख माणसाला उपदेश करतां करतां, मला वाटतं, तुमचा सारा धीर गळाला असावा ! ”

किरणमयी कांहींशा आश्चर्यानें म्हणाली, " हें काय म्हणतां, भाऊजी ? मला तर हें सारं छान वाटतं आहे. "

दिवाकरनें थोडासा हंसावयाचा प्रयत्न केला.

" कां हो, भाऊजी ? "

" छान जर वाटतं, तर तुमच्या तोंडून या साऱ्या उलट्या पालट्या गोष्टी निघाल्या कशा ? आतांच तर तुम्ही स्वतःच म्हणालांत, कीं ज्यावर प्रेम करणं योग्य नाहीं, त्याच्यावरच प्रेम करणं, याचंच नांव ' निंद्य ' प्रेम ! अन् पुन्हां तुम्हीच म्हणतां, याचं मर्म न कळल्यामुळं पंडितांच टोळकं त्याची निंदा करतात ! आतां, या दोहोंपैकीं खरं काय ? "

किरणमयी तत्क्षणीं उत्तरली, " दोन्ही खरी. "

दिवाकरानें विचारलें, " विधवा रोहिणीवर प्रेम करणं हें गोविंदलालनं फार वाईट कृत्य केलं नाहीं काय ? "

" प्रेम हें काय एकादी कृति आहे, तर त्यांत बरं वाईट, न्याय-अन्याय असेल ? बायकोचा त्याग करून निघून जाणं, हें मात्र त्याच्याकडून वाईट कृत्य झालं. "

दिवाकर पुनः एकवार उत्तेजित झाला.

तीव्र स्वरानें तो म्हणाला, " बायकोला सोडून निघून जाणं हें तर खात्रीनं वाईट काम आहे ! हजार वेळ वाईट काम आहे ! परंतु बायकोला सोडून दुसऱ्या एका स्त्रीवर मनांतल्या मनांत प्रेम करणं हा दिखील काय अत्यंत अन्याय नाहीं ? "

दिवाकराची ती क्षुब्धता पाहून किरणमयीला हंसूं आल्यावांचून राहिलें नाहीं.

त्याच्याकडे ती तीव्र दृष्टीनें पहात राहिली. नंतर ती म्हणाली, " भाऊजी, स्वतःला इतकं शक्तिमान् समजणं केव्हांही बरं नाहीं. माणसाला जरा कमी अहंकार असावा. तुमची अशी का कल्पना आहे, भाऊजी, कीं इच्छा झाली, कीं माणूस खुशीप्रमाणं वाटेल तें करूं शकतो ? गोविंदलाल स्वतःच्या इच्छेप्रमाणं रोहिणीवर प्रेम करूं शकता, किंवा न करता, अशी का तुमची कल्पना आहे ? "

दिवाकर म्हणाला, " नाहीं नाहीं, तशी माझी बिलकुल कल्पना नाहीं. इच्छापूर्वक प्रयत्न पाहिजे, एवढंच माझं म्हणणं आहे. "

किरणमयी म्हणाली, " अन् त्याबरोबरच तसं करण्याचं सामर्थ्य–किंवा असामर्थ्यही म्हणा–पाहिजे. नुसता प्रयत्न करूनही भागण्यासारखं नाहीं. या

गच्चीच्या कोंपऱ्यांत बसल्या बसल्या तुमच्या माथ्यांत जरी झाड उगवलं, तरी कालिदासाप्रमाणें दुसरं एखादं ' मेघदूत ' तुम्हाला लिहितां येणार नाहीं ! आकाशांत मेघ पाहून तुम्हाला फार तर वादळाची किंवा पावसाची कल्पना येईल—सर्दी होण्याच्या भयानं तुम्ही व्याकुळ व्हाल. विरही जनांच्या दुःखाच्या भावनेचा विचार करायला तुम्हाला मुळीं फुरसतच होणार नाहीं ! हजार प्रयत्न तुम्हीं केलेत, तरीही तुम्हाला हें शक्य नाहीं. हा सामर्थ्याचा अभाव तुमच्या हाडाहाडांत अन् मेंदूंतच पुरा मुरलेला आहे. त्याला बाजूला सारून कांहीं करणं तुम्हाला शक्यच होणार नाहीं ! ''

असें म्हणून ती गप्प राहिली.

दिवाकरानेंही तिला कांहीं उत्तर दिलें नाहीं. खालीं मान घालून तो मुकाट्यानें बसून राहिला.

बराच वेळपर्यंत कुठें कसलाही शब्द झाला नाहीं. शांत, निःस्तब्ध अशा त्या खोलीच्या कोपऱ्यांतून फक्त एका जुन्यापुराण्या, धुळीनें माखलेल्या घड्याळाचा टिक् टिक् आवाज ऐकूं येत होता तेवढाच !

बराच वेळपर्यंत गप्प राहून किरणमयीनें मध्येंच अकस्मात् अतिशय मिठ्या गळ्यानें बोलावयाला सुरवात केली. ती म्हणाली, '' तुम्हाला आणखींही एक दोन गोष्टी सांगाव्या, असं माझ्या मनांत आहे. त्या दिवशीं तुमच्या ' विषारी सुरी ' संबंधानं मी कांहींही बोललें असलें, भाऊजी, तरी मला असंही दिसून आलं, कीं तुमच्यामध्यें खऱ्या प्रेमिकाचं, खऱ्या कवीचं व्यक्तित्व म्हणून कांहीं तरी नक्की आहे ! त्या व्यक्तित्वाला जर तुम्हाला ठार करून टाकायचं नसेल, तर इतरांच्या माथीं अपराध मारून आपण सुखी व्हायचा प्रयत्न करणं तुम्हाला सोडून दिलं पाहिजे. ''

दिवाकर तिच्याकडे विस्मयानें पाहूं लागला.

'' हें तुम्ही पक्कं लक्षांत ठेवा, भाऊजी, कीं कवि हा कांहीं न्यायाधीश नाहीं. नीतिशास्त्राच्या मताशीं तुमचं मत जरी अक्षरा अक्षरागणिक जुळत नसलं तरी त्यामुळं तुम्हाला लाज वाटायचं कांहीं कारण नाहीं. मला ठाऊक आहे, दुसऱ्याची अक्षमता अन् अपराध हीं एकाच तागडींत माणूस वजन करून त्याला शिक्षा देत असतो. परंतु त्याची वजनं उसनी आणून तुमचं काम भागण्यासारखं नाहीं. ''

क्षणभर किरणमयी थांबली आणि बोलूं लागली, '' तुम्ही वारंवार गोविंद-

लालचा उल्लेख केलात. परंतु केवढ्या प्रचंड शक्तीसमोर पराभूत होऊन, सर्व-स्वाचा त्याग करून गोविंदलाल गेला, हा प्रश्न या जगांत ज्यानीं केवळ बऱ्यावाईटाचा न्याय करायचा भार उचलला आहे, त्यांचा नाहीं—हा प्रश्न तुमचा आहे. खुनाच्या खटल्यांत जज्ज जेव्हां हतभागी अपराध्याला फांशीची शिक्षा देतो, तेव्हां तो न्यायाधीश असतो; परंतु अपराध्याच्या अन्तर्यामीच्या दुर्बलतेची जाणीव येऊन तो जेव्हां शिक्षा कमी करतो, तेव्हां तो कवि असतो भाऊजी ! अशा रीतीनंच जगांत औचित्याचं रक्षण होतं—या प्रकारामुळंच जगांतल्या चुका, भूल–भ्रान्ति, अपराध अगदींच असह्य होत नाहींत ! कवि केवळ सृष्टि करतो असं नाहीं, तर तो सृष्टीचं रक्षणही करतो. जें स्वभावतःच सुंदर, त्याला अधिक सुंदर करून प्रकट करणं हें जसं त्याचं एक कर्तव्य तसंच जें सुन्दर नाहीं, त्याला असुन्दराच्या हातून वांचविणं हें दिखील त्याचं एक कर्तव्यच आहे ! ”

दिवाकर विचारांत पडला. कांहीं बोलला नाहीं.

नंतर तो एकदम म्हणाला, “ पण त्यामुळं अन्यायाला उत्तेजन दिल्या-सारखं होतं नाहीं का, वहिनी ? ”

किरणमयी म्हणाली, “ तें मला नक्की ठाऊक नाहीं. होतही असेल. वाईटाच्या विरुद्ध अत्यन्त तिरस्कार जागृत करणं हें दिखील कवीचं कर्तव्य आहे, असं म्हणतात. परंतु चांगल्या संबंधानं अतिशय लोभ जागृत करणं हें त्यापेक्षांही मोठं अन् स्पृहणीय काम नाहीं काय ? शिवाय, जोंपर्यंत पापाची जगांतून पुरी हकालपट्टी होऊं शकत नाहीं, जोंपर्यंत माणसाच्या हृदयाचं दगडांत रूपान्तर होत नाहीं, तोंपर्यंत या पृथ्वीवर अन्याय, चुकी, भूल, भ्रांति हीं सर्व राहणारच अन् त्यांना क्षमा करून थोडं फार उत्तेजनही दिलं पाहिजे. पाप नाहींसं करणं शक्य नाहीं अन् तें सहन करण्याचं सामर्थ्यही जावं, यांत काय सुख किंवा सुव्यवस्था आहे, हें मला कळत नाहीं, भाऊजी ! ”

दिवाकर ताडकन् म्हणाला, “ सुव्यवस्था हेंच काय तें जगांतलं सर्वस्व नाहीं. अव्यवस्था, दुःख यांमध्येंही न्याय अन् धर्म यांचं पालन केलं पाहिजे. जें मंगल, जें निर्मल, जें सूर्याच्या प्रकाशाप्रमाणं स्वच्छ, त्याला सर्वांच्या वर स्थान देणं अवश्य आहे. ”

किरणमयी जोरानें मान हलवून म्हणाली “ नाहीं, तसं नाहीं. मनुष्याच्या रक्ताशीं जर पाप जडलेलं नसतं, तर तुम्ही म्हणतां तें खरं झालं असतं. केवळ

एका न्यायाशिवाय जगांत मग दुसऱ्याला रहातांच आलं नसतं. दया, माया, क्षमा वगैरे हृदयाच्या वृत्तीचं नांव दिखील मग कुणाला ठाऊक नसतं. तुम्हीं सूर्याच्या पांढऱ्या रंगाशीं न्यायाची तुलना केलीत, भाऊजी ! परंतु पांढरा रंग हा सर्व रंगांच्या मिश्रणामुळंच तयार होतो ना ? हा पांढरा प्रकाश ज्याप्रमाणं वक्र कांचेमधून अनेक रंगांचा बनतो, त्याप्रमाणंच अन्याय, अधर्म, पाप, ताप यांच्या वांकड्या मार्गानं अन्याय हा दया, माया, क्षमा असल्या विचित्र रूपांत आढळून येतो ! अन्यायाला क्षमा केली असतां अधर्माला उत्तेजन दिल्यासारखं होतं, हें मला मान्य आहे; परंतु अधर्म दिखील त्याचंच एक रूप नाहीं, ही गोष्टही मान्य न करणं अशक्य आहे. कदाचित् तर्कयुक्तीनीं माझं म्हणणं तुम्हाला पटवून देणं मला जमणार नाहीं, भाऊजी ! परंतु क्षमा ही ज्या प्रेमांतून उत्पन्न झालेली असते, त्या प्रेमाचं मर्म जेव्हां तुम्हाला कळेल, तेव्हां अन्याय, अधर्म, अक्षमता यांना क्षमा करून त्यांना थोडं फार चुचकारणं, ही दिखील धर्माचीच शिकवण आहे हें तुम्हांला कळून येईल. ''

ती एकदम थांबली. बोलण्याच्या भरांत किरणचें जणूं दुसरीकडे लक्षच नव्हतें. तिनं इकडे तिकडे पाहिलें आणि ती एकदम चपापली.

'' पण वेळ तर अगदीं टळून गेली, भाऊजी ! आज तहान भूक तुम्हाला कांहीं लागलीच का नाहीं ? ''

असें म्हणून धांदली धांदलीनं ती तेथून धांवतच बाहेर निघून गेली.

संध्याकाळ उलटून दिवाकर जेव्हां फराळाला बसला. तेव्हां तो आस्ते आस्ते म्हणाला, '' आज सारा दुपारचा वेळ माझा मोठ्या आनंदांत गेला. किती नव्या नव्या गोष्टी मी शिकलों, तें मला सांगतांही येत नाहीं. ''

किरणमयी हंसली आणि म्हणाली, '' खरंच, खूप गोष्टी शिकलांत तुम्ही, भाऊजी ? तर मग मला तुम्ही आपला गुरु म्हणून मानलं पाहिजे. ''

दिवाकर अतिशय उत्तेजित होऊन म्हणाला, '' खात्रीनं, अगदीं खात्रीनं ! एक वार कां, शंभर वेळ, हजार वेळ मी कबुली देतों, कीं तुम्हीच माझ्या गुरु आहां. मी तुम्हाला अगदीं खरं सांगतों, वहिनी, कीं अशा रीतीनं जर मला तुमच्याजवळ शेवटपर्यंत नेहमीं रहातां आलं, तर दुसरी कांहीं दिखील माझी इच्छा नाहीं. ''

'' काय—म्हणतां काय ? इतक्यांतच इतकी विलक्षण ओढ ? ''

दिवाकराचें मन निराळ्याच विचारांत मग्न झालें होतें. त्यामुळें किरणमयीच्या

भाषणांतली खोंच त्याच्या लक्षांत आली नाहीं.

तो सरळ मनानें म्हणाला, " तुम्हाला सोडून आतां एक दिवसही कुठं मी रहाणं शक्य नाहीं, वहिनी ! "

किरणमयी खूब मोठ्यानें हंसली आणि म्हणाली, " चूप-चूप ! कुणीं जर ऐकलं, तर आश्चर्यानं थक्क होऊन जाईल ना ! "

आतां कोठें आपल्या भाषणाचा निराळा अर्थ दिवाकराच्या ध्यानांत येऊन तो विलक्षण लज्जेनें अगदीं लालबुंद झाला !

## ७

अंथरूण घालतां घालतां किरणमयी त्याच्या एका कोंपऱ्यावर बसली आणि म्लान, करुण स्वरानें म्हणाली, " तुम्ही काय कुणाची नोकरी करतां आहां, कीं दुकानदारी करतां आहां, तर मालकाच्या मर्जीवर किंवा दुकानाच्या खरेदी विक्रीवर तुमचं यश किंवा अपयश अवलंबून राहील ? हें तर तुमच्या हृदयांतलं धन ! बाहेरच्या माणसांना काय शक्य आहे, कीं तें हें विफल करतील ? "

असें म्हणून ती डोळे मिटून स्तब्ध बसली.

श्रद्धाभक्तीनें परिपूर्ण अशा दृष्टीनें दिवाकर तिच्या त्या सुंदर, एकाग्र झालेल्या मुखमंडलाकडे पहात राहिला.

नंतर त्यानें हळु हळू विचारलें, " वहिनी, डोळे मिटल्यावर तुम्हाला अन्तर्यामीं तुमच्या पतींचं मुख दिसतं काय ? "

त्याच्या या निराळ्याच प्रश्नानें किरणमयी किंचित् चकित झाली आणि तिनें चमत्कारिक नजरेनें त्याच्याकडे पाहिलें.

ती म्हणाली, " कुणाचं म्हणतां ? त्यांचं ? "

" हो–तुमच्या पतीचं. "

" हो–दिसतंच म्हणायचं, दुसरं काय ? जे माझे खरोखरचे पति, ते रात्रंदिवस या ठिकाणीं आहेतच ! "

असें म्हणून तिनें करांगुलीनें आपलें वक्षःस्थल दाखविलें.

दिवाकरानें तिच्या या बोलण्याचा अगदीं सरळ अर्थ घेतला. बोलूं न बोलूं अशा विचारांत तो क्षणभर पडला.

नंतर नम्र वाणीनें तो म्हणाला, " परंतु त्या दर्शनापासून फायदा काय

वहिनी ? तुम्ही देव-देवता मानीत नाहीं—इहकाल परकालही कबूल करीत नाहीं. मग मृत्यूनंतर तुम्ही त्यांच्याकडे कशा जाऊं शकाल ? "

किरणमयी म्हणाली, " मरणानंतर मी कुणाकडेच जाऊं इच्छित नाहीं, भाऊजी ! "

" कुठंही—कुणाकडेही नाहीं ? अगदीं एकटंच रहावं अशी इच्छा आहे तुमची ? "

असें म्हणून, हतबुद्ध झाल्याप्रमाणें दिवाकर किरणमयीच्या चेहऱ्याकडे पहात राहिला.

त्याचा हा प्रश्न ऐकून किरणमयीही क्षणभर निःस्तब्ध बसली; परंतु दुसऱ्याच क्षणीं बलपूर्वक हंसण्याचा प्रयत्न करून ती म्हणाली, " पण जेव्हां तेव्हां माझ्याच गोष्टी ऐकण्याची तुम्हाला इतकी आवड कां हो, भाऊजी ? "

" कुणास ठाऊक, वहिनी ! परंतु तुमच्या गोष्टी ऐकाव्या, अशी मला नेहमींच अतिशय इच्छा होते खरी ! "

बिछान्यावर पलंगपोस घालण्याच्या मिषानें किरणमयीनें तोंड फिरविलें.

नंतर ती कांहीं क्षण गप्प राहिली. मग म्हणाली, " एकाजवळ जावं, अशी मला फार इच्छा आहे. परंतु ती मरणाच्या पैलतीराला नव्हे—ऐल-तीरालाच ! "

दिवाकर म्हणाला, " परंतु ते तर मरणाच्या पैलतीराला निघून गेले आहेत. ऐलतीराला ते आतां तुम्हाला कसे भेटतील वहिनी ? "

किरणमयी हंसून म्हणाली, " ती माझी व्यक्ति अजूनही या तीरालाच आहे. एक दिवस मी निघूनही गेलें असतें. केवळ—"

ती मध्येंच थांबलेली पाहून दिवाकरानें चमकून तिच्याकडे पाहिलें.

" केवळ काय वहिनी ? "

किरणमयी तत्काल उत्तरली, " फक्त एकच—मी त्याला हवी आहे कीं नाहीं, हें जर तो मला एक वार कळवता—"

तिच्या या भाषणानें दिवाकर पुनः एक वार विस्मयानें स्तंभितच झाला. वहिनींच्या मनांत आहे तरी काय हें त्याच्या ध्यानांतच येईना !

आंवढा गिळून त्यानें विचारलें, " कोण आहे हो या तीराला वहिनी ? तुम्ही त्याला हव्या आहां कीं नाहीं, हें कोण तुम्हाला कळवणार ? तुम्ही हें सारं काय बोलतां आहां, वहिनी, तें माझ्या मुळीं ध्यानांतच येत नाहीं !

किरणमयीच्या मुखावर क्षणभर एक म्लान, मंद छाया तरंगून गेली. परंतु दुसऱ्याच क्षणीं ती एकदम दूर सरकून तिचें सर्व मुखमंडल पुनः पूर्ण उज्ज्वल झालें.

कृत्रिम क्रोधाच्या स्वरानें ती म्हणाली, "तुम्ही भारी वाईट–दुष्ट आहां अगदीं, भाऊजी ! स्वतःचं तोंड उघडून तुम्ही एक शब्दही बोलत नाहीं अन् माझ्या तोंडून शंभरपटीनं ऐकायची मात्र तुमची इच्छा आहे ! चला तर त्यांची बातमी मी तुम्हाला देऊं शकत नाहीं !"

असें म्हणून चेहरा किंचित् आड करून, पंजानें तोंड थोडेसें झांकून ती गालांतल्या गालांत हंसूं लागली.

परंतु तिचें तें हास्य दिवाकरच्या दृष्टीला पडलें आणि एका अज्ञात अशा अवर्णनीय आवेगानें त्याच्या हृदयाचें स्पंदन जलद गतीनें होऊं लागलें.

स्वतःला किंचित् सांवरून तो म्हणाला, "माझ्यापाशीं असं काय आहे वहिनी, कीं तोंड उघडून तें मला मोठ्या दिमाखानं तुम्हाला सांगतां येईल !"

किरणमयी मागें फिरून उभी राहिली आणि म्हणाली, "इतके दिवस तुम्हाला इतकं जें मीं शिकवलं, तें सगळं का व्यर्थच गेलं ? एक वार स्वतःच्या छातीला हात लावून सांगा बरं भाऊजी, कीं महा भयंकर असं कांहीं तरी तिथं प्रचंड उलथापालथ करीत धांवाधांव करतं आहे कीं नाहीं ? खरं मात्र सांगा हं—"

दिवाकर जणूं मंत्रमुग्ध झाला !

तो अस्पष्ट वाणीनें म्हणाला, "कोणतं तें ? काय शिकवलं मला तुम्हीं ?"

किरणमयी म्हणाली, "तुम्हीं मला अगदीं थक्कच करून सोडलंत, भाऊजी ! एवढ्याशा वयांत नाटकी अभिनयही चांगलाच करायला शिकलांत कीं ! पण तुम्ही तोंड उघडून बोलल्याशिवाय मी दिखील बोलायची नाहीं. मग त्यामुळं माझं हृदय फाटो, कीं तुमच्याही काळजाच्या चिंध्या होवोत !"

असें म्हणून एकदम खालीं वांकून तिनें दिवाकराच्या हनुवटीला हात घातला आणि ती किंचित् हलवून ती त्वरेनें खोलींतून बाहेर निघून गेली.

दिवाकर जागच्या जागीं आश्चर्यानें स्तंभित होऊन बसून राहिला !

किरणमयीनें आतांपर्यंत त्याचा किती प्रकारांनीं आणि किती वेळ परिहास केला होता ! हजार वेळ, हजार मिषांनीं त्याला तिनें स्पर्शही केला होता ! परंतु आज तिनें केलेल्या या परिहासानें, या स्पर्शानें त्याच्या दोन्ही कानांच्या द्वारांनीं त्याच्या सर्व शरीराच्या स्नायू स्नायूंतून आणि शिरा शिरांतून अत्यंत प्रखर असा

विजेचा प्रवाह सोडून त्याची कांहीं अवर्णनीय अवस्था करून सोडली ! आपल्या देहाच्या प्रत्येक रक्तबिंदुमध्यें इतका विलक्षण विस्मयजनक त्वरेचा वेग त्यानें यापूर्वी कधींही अनुभवला नव्हता !

## ८

आज पुष्कळ दिवसांनीं जरा लवकरच आसपासच्या कांहीं वयस्क बायकांबरोबर अघोरमयी पुनः एकवार कालीघाटावर कालीच्या दर्शनाला गेली होती. आईची आरती झाल्यावर, प्रहर दीड प्रहर रात्रीच्या सुमाराला घरीं परत यावें, असें त्या बायांनीं ठरविलें होतें.

रात्रीं जवळ जवळ आठ वाजले होते.

दिवाकर आपल्या बिछान्यावर निस्तब्धपणें पडला होता. त्याच्या उशाशीं मातीची एक पणती मिणमिण जळत असून, तिच्या अल्प प्रकाशांत जी ' दुर्गेशनन्दिनी ' ही कादम्बरी तो नुकताच वाचीत होता, ती तोंडावर पसरून तो मनांतल्या मनांत आयेषेचें चिंतन करीत असावा, असें दिसत होतें.

तोंच किरणमयी आंत येऊन म्हणाली, " काय भाऊजी, झोंपलां कीं काय ? "

दिवाकरानें तोंडावरचें पुस्तक न काढतांच उत्तर दिलें, " नाहीं, वहिनी ! पडलों आहें असाच. डोकं धरलं आहे. "

किरणमयी हंसून म्हणाली, " वा: ! असं असेल तर मग छानच उपचार चालला आहे रोगाला ! माथ्याशीं दिवा तेवत ठेवला म्हणजे माथं दुखायचं रहातं–नव्हे, भाऊजी ? "

दिवाकर म्हणाला, " पुस्तक उद्यांच परत द्यायचं आहे. तेव्हां वाचून आतांच तें संपवून टाकायला हवं—"

किरणमयी हंसली, आणि म्हणाली, " डोळे मिटून आयेषेचं ध्यान करीत पडून कांहीं पुस्तक वाचून संपायचं नाहीं. डोळे नीट उघडे ठेवून तें वाचायला हवं–कळलं ? "

दिवाकर कांहींच बोलला नाहीं.

किरणमयी म्हणाली, " त्यापेक्षां जेवून खाऊन मगच पुस्तक पुरं करा. चला उठा–वाढलं आहे केव्हांच. अन्न उगीच निवून जातं आहे. "

दिवाकराला उठावयाची इच्छाच नव्हती. अगदीं दमून गेल्यासारखें त्याला वाटत होतें.

किंचित् त्रस्त, परंतु अनुनयाच्या स्वरानें तो म्हणाला, " आतां राहूंद्या ना, वहिनी ! मावशींना येऊं दे-मगच मी सर्वांबरोबर जेवीन—"

किरणमयी म्हणाली, " छीः ! या बोलण्यांत काय अर्थ आहे भाऊजी ? सासूबाई अन् साऱ्या बाया केव्हां परत येतील, त्याचा कांहीं नेम का आहे ? आणखीं आज माझी प्रकृतीही जरा बरी नाहीं. तेव्हां मी म्हणत होतें, कीं सासूबाईच्या खोलींत त्यांचं ताट वाढून नेऊन ठेवून थोडंसं आधींच झोंपावं. उठा, भाऊजी, तुम्हाला वाढतें या अगोदर."

असें म्हणून जवळ येऊन तिनें दिवाकराच्या तोंडावरचें पुस्तक उचलून दूर ठेवलें.

जवळच दिवाकराची लोखंडी ट्रंक होती. परत फिरून किरणमयी तिच्यावर जाऊन बसली.

दिवाकर तसाच पडून राहिला होता.

दिवाकराला उद्देशून किरणमयी पुनः म्हणाली, " उठा ना हो भाऊजी—"

" मला उठावंसं वाटत नाहीं, वहिनी ! त्यापेक्षां तुम्ही कांहीं तरी गप्पा गोष्टी करा, मी ऐकतों ! "

किरणमयी म्हणाली, " नुसत्या गप्पागोष्टींनीं कांहीं पोट भरत नाहीं. वेळेवर खाल्लंही पाहिजे माणसांनीं. चला उठा पाहूं—"

दिवाकर तसाच पडून राहिला. न उठतांच तो म्हणाला, " बरं, वहिनी, मला सांगा-माझं स्नान, खाणं, पिणं, झोपणं यासंबंधानें तुम्ही आपलं माथं इतकं दूखवून कां हो घेतां ? "

किरणमयी हंसली, आणि म्हणाली, " कां तें तुम्हाला माहिती नाहीं, भाऊजी ? "

" तुम्ही सांगितलंच नाहीं, तर मग कसं कळेल ? "

किरणमयी त्याच्याकडे पहात म्हणाली, " हें तुम्ही अगदीं खोटं बोलतां भाऊजी ! न बोललं तरीही कळतं अन् तुम्हालाही तें चांगलं माहिती आहे. "

दिवाकराच्या चेहऱ्यावर आणि डोळ्यांत लाली पसरली. तो कांहीं वेळ न बोलतां तसाच पडून राहिला.

नंतर काय झालें कोण जाणे ! कांहींशा उदास, करुण स्वरानें तो बोलूं लागला, " बरं वहिनी एक गोष्ट विचारूं मी तुम्हाला ? "

" एक कां, भाऊजी, शंभर गोष्टी विचारा तुम्ही मला. पण अगोदर जेवून

बिवून मला मोकळी करा. त्यानंतर वाटलं तर साऱ्या रात्रभर मी तुमच्या प्रश्नांचीं उत्तरं देईन. काय पटतं का हें तुम्हाला ?"

असें म्हणून ती हंसू लागली.

वहिनीच्या या परिहासाला उलटा जबाब द्यावयाचा प्रयत्न करून कृत्रिम सहानुभूतीच्या स्वरानें दिवाकर म्हणाला, "बरं तर, वहिनी ! मग मला वाटतं, तुम्ही या दणकट ट्रंकेवर सारी रात्र बसून माझ्या प्रश्नांना उत्तरं देणार ?"

किरणमयी खुदकन् हंसली, आणि म्हणाली, "या ट्रंकेवर मी बसलें, म्हणून जर तुम्हाला वेदना होत असतील भाऊजी, तर तुमच्या मऊ बिछान्यावर हवी तर येऊन बसेन मी. काय, मग तर तुमचा सारा क्षोभ अन् राग जाईल ना ?"

तिच्या या विलक्षण विनोदानें दिवाकराचा चेहरा कानांच्या मुळांपर्यंत लाल झाला. तो कांहीं बोलला नाहीं. अतिशय शरमिंदा होऊन पाठ फिरवून तो तसाच पडून राहिला.

किरणमयी उठून जवळ आली आणि म्हणाली, "नाहीं नाहीं, अं भाऊजी ! उठा. उठाच तुम्ही. जेवून घेऊन मला अगोदर मोकळी करा. आतां उगीच या कुशीवरून त्या कुशीवर वळणं पुरे झालं !"

तोंच स्वयंपाक घराकडून मोलकरणीचा आवाज ऐकूं आला—"मला इथून दिखील ऐकूं येतं आहे, वहिनी ! अन् तुम्हाला नाहीं येत ? आई आल्या आहेत अन् खालून सारख्या हांका मारताहेत—"

किरणमयी परत येऊन पुनः त्याच ट्रंकेवर बसली.

रागानें ती मोलकरणीला उद्देशून ओरडून म्हणाली, "धाडस तर तुझं कमी नाहीं बया ! मी इथून उठून खालीं जाऊन दरवाजा उघडायचा-तुला नाहीं वाटतं जाववत तिथपर्यंत उघडायला ?"

"माझे हात आहेत गुंतलेले, म्हणून तर म्हटलं मीं, वहिनी !"

असें म्हणून बडबड करीत मोलकरीण धडाधड जिना उतरून खालीं गेली.

तिनें दरवाजा उघडतांच अघोरमयीचें रागावणें सुरू झालें—"तुमच्या सगळ्यांच्या कानांवर काय गंज बिंज चढला आहे का ग बया ? इथं अर्धा घंटा उभें राहून आम्ही कडी खडखडावतों आहों बघ !"

आतां मात्र मोलकरीण भयंकर रागावली असें दिसलें !

ती गर्जू लागली, "कानाला गंज, डोळ्यांना गंज चढल्याशिवाय का कुणी तुमच्या घरीं नोकरी करायला येतं आहे ? आतां धड कानाडोळ्यांची

चांगली मोलकरीण पाहून मगच तुम्ही तिला ठेवा, मला आतांच्या आतां रजा द्या अगोदर. सैंपाकघरांतून बाहेरच्या दरवाजांतली हांक ऐकूं येत नाहीं खरी ! ”

अघोरमयी आतां बरीच नरमून म्हणाली, “ बरं-बरं-सूनबाई कुठं आहे ?”

मोलकरीण अस्पष्ट स्वरानें म्हणाली, “ दिराबरोबर सारा दिवस लाडं लाडं काम चाललेलं असतं-मग कसं फावणार त्यांना दार उघडायला? बघा ना तुम्हीच-दरवाजा उघडायला त्यांना मीं कुठं सांगितलं, तर डोळे तांबारून त्यांनीं माझं धाडस काढलं कीं चटकन्! अगबाई ! पण हें काय ? बडे बाबू कीं हे ! ”

असें उद्गारून, अतिशय खजील होऊन, मोलकरीण वाट सोडून बाजूला जाऊन उभी राहिली.

अघोरमयी मागें वळून म्हणाली, “ उपेन ये बाबा, वर ये—”

“ चला मावशी, तुम्ही-पुढं चला. येतों मी.”

असें म्हणून उपेन्द्र अघोरमयीच्या मागून मागून जिन्यानें वर जाऊं लागला.

अघोरमयी आणि मोलकरीण यांच्या भाषणांतील सर्व गोष्टी अर्थातच त्यानें इत्थंभूत रीतीनें ऐकल्या होत्या ! वर येतांच अघोरमयीनें तीव्र स्वरानें हांक मारली, “ कुठं आहेस ग सूनबाई ? एक वार ये ना बाहेर. हा उपेन आला आहे बघ माझ्याबरोबर—”

ही ‘बातमी’ कळतांच, त्या अंधाऱ्या खोलींत बसलेल्या किरणमयीच्या छातींत प्रचंड धडधडाट सुरू होऊन तिचे हातपाय कांपूं लागले.

दिवाकर बिछान्यावर पडला होता खरा; पण त्याचेंही सर्व अंग शिथिल होऊन थंडगार पडलें !

किरणमयीनें अधीरतेनें हांका मारण्याचा सपाटा सुरू केला.

“ सूनबाई, ए सूनबाई ! कुठं गेलीस ग या भलत्याच वेळीं ? चटई बिटई आणून घाल कीं चटकन्! उपेनला इथं सकाळपर्यंत उभाच ठेवणार आहेस का काय तूं ? सूनबाई, ए सूनबाई ! काय करते आहेस ग ? ”

किरणमयी उठली आणि बाहेर येऊन तिनें व्हरांड्यांत एक चटई पसरली.

तिच्या तोंडून शब्दही फुटेना !

उपेन्द्र पुढें सरकला आणि किरणमयीला प्रणाम करून म्हणाला, “ काय, बऱ्या आहां ना, वहिनी ? ”

इतक्या अवकाशांत किरणमयीनें स्वतःला बरेंच सांवरून घेतलें होतें !

तरी क्षणभर थांबून, किंचित् मान हलवून ती म्हणाली, “ हो, तुम्ही दिसलं

बरे आहां ना, भाऊजी ? अन् वहिनीही ठीक आहेत ना ?"

तिचा कंठस्वर ऐकून उपेन्द्र आश्चर्यचकित झाला. त्या स्वरांत तिळमात्र रस किंवा ओलावा नव्हता. अतिशय शुष्क अगदीं नीरस वाटला तो त्याला.

किरणमयीनें विचारलें, " कांहीं खबर बिबर न देतांच एकदम आलांत, भाऊजी ? "

उपेन्द्र म्हणाला, " अशीलाच्या पैशानं आलों आहें, वहिनी ! पुन्हां उद्यां संध्याकाळींच परत जायला हवं आहे. कालीघाटावरचं जरूरीचं काम आटोपून मी बाहेर पडतों आहें, तों मावशीच तिथं दिसल्या मला. तेव्हांपासून त्यांच्या बरोबर बरोबरच फिरतों आहें मी. बरं, आमच्या दिवाकरची खबर काय, सांगा बघूं ? बेटा पत्रबित्र कांहीं तर पाठवीत नाहींच, पण आपणाबद्दल बातमीही कांहीं कळवीत नाहीं. बाहेर गेला आहे वाटतं ? "

किरणमयी खालीं पहात म्हणाली, " डोकं दुखतं आहे म्हणून पडले आहेत. कुणाला ठाऊक ? पण बहुतेक झोंप लागली असावी—"

अघोरमयीची मनःस्थिति आज बरी नव्हती. आधीं दोघांचें फारच सरळ ! सुनेचे दोष दाखवावयाची संधि मिळाली, कीं सासूबाई ती कधींच दवडीत नसत ! शिवाय दिवाकरासंबंधानेंही तिचें मन आज विशेष अप्रसन्न झालें होतें. सकाळीं अघोरमयीनें त्याला आपणाबरोबर कालीघाटाकडे यावयाचा आग्रह केला होता; परंतु कामाचें निमित्त सांगून त्यानें तिच्याबरोबर जाव-याचें सफाईनें टाळलें होतें. तें अघोरमयीच्या मनाला अजूनपर्यंत बोंचतच होतें. त्याचा वचपा तिनें आतां काढला.

मनांतील कटुता प्रकट करणाऱ्या तीक्ष्ण स्वरानें अघोरमयीनें विचारलें, " ही आतां तर तूं त्याच्या खोलींतून बाहेर पडलीस, सूनबाई ! अन् तो झोंपला आहे कीं नाहीं, हेंही ठाऊक नाहीं तुला ? "

" नाहीं, ठाऊक नाहीं. " असें झणकाऱ्यानें बोलून किरणमयीनें सासूकडे एक विषारी कटाक्ष फेंकला.

उपेन्द्रानें उच्च स्वरानें हांक मारली, " दिवाकर—"

परंतु त्याला साद मिळाली नाहीं.

उपेन्द्रानें पुनः हांक मारली, " दिवाकर–दिवाकर झोंप लागली आहे का रे ? "

दिवाकर जागाच होता. आतां उपेन्द्राला डावलणें शक्य नव्हतें !

" आलों—" असें म्हणून दिवाकर हळु हळू बाहेर आला.

उपेन्द्राला नमस्कार करून त्यानें विचारलें, " कधीं आलां दादा ? "

" सकाळीं. तुझं डोकं दुखतं आहे वाटतं ? "

" हो—थोडंसं. "

अघोरमयी रागानें मध्येंच म्हणाली, " डोकं दुखेल नाहीं तर काय होईल बाबा ? पहिल्या पहिल्यानं थोडं कां होईना, पण फिरून बिरून येत असस तूं. पण आतां ते सारं सोडून दिलं आहेस. घराच्या बाहेर म्हणून पडत नाहींस. सकाळीं तुला मी म्हटलं, ' दिवू, माझ्याबरोबर जरा कालीघाटाकडं ये रे बाळ !' तर म्हणालास, ' नाहीं मावशी–मला फार काम आहे. ' कसलं रे काम होतं तुला सांग बरं ? "

कांहीं उत्तर न देतां दिवाकर गप्प उभा राहिला.

उपेन्द्र त्याच्याकडे पाहून कांहींशा रागाच्या स्वरानें म्हणाला, " पत्र बित्र पाठवायचं अजिबात बंदच केलं आहेस तूं ! कां रे ? "

दिवाकरानें कांहीं जबाब दिला नाहीं.

क्षणभरानें अधिकच तीव्र स्वरानें उपेन्द्रानें विचारलें, " कोणत्या कॉलेज-मध्यें नांव घालणार आहेस ? "

दिवाकर नम्र, मृदु स्वरानें म्हणाला, कॉलेज उघडल्यावर नांव घालणार आहें. अजून घातलेलं नाहीं. "

" उघडल्यावर घालणार आहे ?—अजून घातलं नाहीं. "

असह्य क्रोधानें उपेन्द्राचे डोळे आगीप्रमाणें जळूं लागले.

तो पुनः ओरडला, " कलकत्त्यांतलीं सगळीं कॉलेजं उघडून सोळा सतरा दिवसांपेक्षां अधिक दिवस झाले आहेत हें दिखील अजून तुला ठाऊक नाहीं ? "

दिवाकराचा चेहरा कागदाप्रमाणें पांढराफेंक झाला. लांकडाच्या बाहुलीप्रमाणें तो निश्चल उभा राहिला.

अघोरमयी अतिशय असंतुष्ट, पण लागट स्वरानें म्हणाली, " त्याला तरी कशी बातमी लागणार, उपेन ? रात्रंदिवस दोघांमध्यें थट्टा मस्करी, हंशातमाशा, फुसफुस कानगोष्टी कसल्या दगडमातीच्या चाललेल्या असतात, हें त्यांचं त्यांनाच माहीत, बाबा ! मी तर नेहमीं कानीं कपाळीं ओरडत असतें, 'सूनबाई, पर-क्याचं मूल तें. शिकायला म्हणून तो आपल्या घरीं येऊन राहिला आहे त्याच्या बरोबर रात्रंदिवस अष्टौप्रहर हा कसला धुडगुस चालला आहे तुझा ? असेल तुझा

तो दीर! पण वयांत आलेल्या मुलाबरोबर वागतांना, सासुरवाशीणीला थोडी लाज शरम भीड कांहीं अगदींच नको का? पण कोण कुणाचं ऐकायला बसलं आहे?"

क्षणभर कोणीच कांहीं बोललें नाहीं.

अघोरमयी उपेन्द्राकडे पाहून लगेच कडाडली, "तूंच इथं बसला आहेस म्हणून, उपेन! नाहीं तर इतक्या अवकाशांत हिनं येऊन माझ्या केसांच्या बटा मुठींत पकडून मला फरफरां ओढीत नेलं असतं–अशी माझी सूनबाई गुणांची लक्षुमी आहे! मी वाटेल त्याची शपथ घेऊन सांगायला तयार आहें उपेन, कीं सगळा–अगदीं सगळा दोष या सटवीचा आहे!"

किरणमयी मुकाट्यानें उभी होती. तिनं एका अक्षरानें कोणत्याही आरोपाला जबाब दिला नाहीं. आस्ते आस्ते ती तेथून स्वयंपाकघराकडे निघाली.

अघोरमयीच्या रागाचा कडाका चालूच होता.

ती ओरडून म्हणाली, "अहो तुम्ही बडे बापकी बडी बेटी! माझं पोरगं सारा दिवस उपाशीं आहे–त्याच्या पोटांत कसले दोन घांस घालण्याची व्यवस्था करतां का? असं नुसतं रागवून चिडून इथून निघून गेलं म्हणजे झालं नाहीं!"

किरणमयी तोंड फिरवून एकदम उभी राहिली आणि अगदीं नैसर्गिक, अविचल स्वरानें म्हणाली, "त्यासाठींच तर जातें आहे मी, सासूबाई!"

नंतर उपेन्द्राला उद्देशून ती म्हणाली, "पण तुम्ही मात्र पळून जायचं नाहीं हं, भाऊजी! थोड्याशा पुऱ्या बिऱ्या तयार करून आणायला मला कांहीं दहा मिनिटांपेक्षां अधिक वेळ लागणार नाहीं.

बिचारा हबकून गेलेला दिवाकर जवळ जवळ मूर्च्छितच झाला होता. एक अक्षरही त्याच्या तोंडून फुटत नव्हतें. त्याला उद्देशून किरणमयी म्हणाली, "तुम्हालाही अशाच देतें—चला, तुम्ही सैंपाकघरांत येऊन बसा. तुम्ही मोल-करणीला जरा दुकानांत पाठवा बरं सासूबाई! भाऊजीसाठीं थोडी मिठाईबिठाई घेऊन येऊं दे तिला."

अघोरमयी किंवा उपेन्द्र या दोघांपैकीं कोणीही तिला कांहीं उत्तर देऊं शकला नाहीं. त्या एवढ्याशा सासुरवासी मुलीचा अमर्याद संयम आणि निःसीम अहंकार एकाच वेळीं आपल्या बुद्धीच्या आकलनाबाहेर गेलीं आहेत असें वाटून तीं उभयतां वीज पडलेल्या माणसांप्रमाणें कांहीं वेळ निःस्तब्ध बसून राहिलीं!

जवळजवळ तासभर सर्व प्रकारच्या गप्पा-गोष्टी झाल्यावर अघोरमयी आपले आन्हिक आणि जपजाप्य आटोपण्याकरतां तेथून निघून गेली.

किरणमयी जवळ येऊन उपेन्द्राला म्हणाली, " माझ्या खोलींत तुमचं पान मांडलं आहे, भाऊजी ! उठा. "

कांहीं न बोलतां उपेन्द्र हंसला आणि किरणमयीच्या खोलींत येऊन तेथें मांडलेल्या पाटावर बसला.

किरणमयी जवळच जमिनीवर बसली.

क्षणभरानें ती सहज स्वरानें त्याला म्हणाली, " आज एवढ्यावरच भागवून पोटोबाची भरती करायला हवी तुम्हाला, भाऊजी ! अधिक करायच्या भरीला पडलें असतें, तर उगीचच किती तरी रात्र झाली असती. "

उपेन्द्रानें एक वार वर नजर करून तिच्याकडे पाहिलें. तेथल्या दिव्याच्या क्षीण प्रकाशांत किरणमयीचा चेहरा दगडाप्रमाणें जड आणि कठिण दिसत होता.

समोर मांडलेलें फराळाचें ताट बाजूला सारून उपेन्द्र म्हणाला, " खायचंच झालं तर इतके पदार्थ माणसाला भरपूर आहेत; परंतु मी कांहीं इथं फराळाला आलों नाहीं. तुमच्याशीं एकीकडे दोन शब्द बोलावे म्हणून आलों आहें मी—"

किरणमयी म्हणाली, " हें माझं मोठं भाग्य आहे. पण खात कां नाहीं ? "

उपेन्द्र चार दोन क्षण तिच्याकडे स्थिर दृष्टीनें पहात राहिला. त्याचा अगोदरच कठोर दिसणारा चेहरा अधिकच कठोर आणि उग्र झाला.

तो एकदम कठिन स्वरानें म्हणाला, " तुमचा स्पर्श झालेले पदार्थ तोंडांत घालायला आज मला अतिशय तिटकारा वाटतो आहे—"

कांहीं न बोलतां किरणमयी खालीं मान घालून बसून राहिली.

कांहीं क्षण असे निःस्तब्धतेंत गेल्यावर तिनें त्याच्याकडे पाहिलें आणि ती म्हणाली, " तर मग नाहीं खाल्लं तरी चालेल—"

पुनः ती कांहीं वेळ माथें खालीं घालून बसून राहिली.

चार दोन क्षणांनीं पुनः एक वार तिनें वर पाहिलें आणि कांहींशा मोठ्यानेंच ती हंसली.

नंतर ती म्हणाली, " तिटकारा येण्यासारखीच गोष्ट आहे ! परंतु तुमच्या तोंडून असे शब्द मला ऐकावे लागतील, अशी मात्र मुळींच कल्पना नव्हती ! फक्त एकच माणूस असा होता, कीं जो तिटकाऱ्यानं ताट बाजूला सारूं शकला असता !–तो सतीश–सतीश ! तुम्ही नव्हे, भाऊजी ! "

अतिशय क्रोधानें, तिरस्कारानें, विस्मयानें उपेन्द्र स्तब्धपणें तिच्याकडे पहात राहिला. त्याच्या तोंडून शब्दही फुटेना !

किरणमयी पूर्ववत् सहज, शांत स्वरानें बोलूं लागली, " तुमचा राग म्हणा, तिरस्कार म्हणा, भाऊजी, सारा आहे तो केवळ दिवाकरासाठींच ना ! परंतु माझ्यासारख्या विधवेजवळ जसे ते, तसेच तुम्हीही, भाऊजी ! त्यांच्याशीं माझे संबंध किती दूरवर, कशा तऱ्हेनें जमले आहेत, याविषयीं तुम्हाला काय वाटत असेल तें केवळ अनुमानाचं फळ ! दुसरं कांहीं नाहीं. परंतु त्या दिवशीं मीं जेव्हां स्वतःच्या तोंडानं तुमच्यावरचं माझं प्रेम तुमच्यासमोर प्रकट केलं, त्यावेळीं तर मीं दिलेल्या पदार्थाचं ताट अशा रीतीनं तिटकाऱ्यानं तुम्ही बाजूला सारलं नाहीं ! स्वतःच्या वेळीं तेवढा कुलटेच्या हातच्या मिष्टान्नांत प्रेमाचा मध भारी मिठा लागतो, नव्हे का, भाऊजी ? "

उपेन्द्राचें अन्तःकरण पराकाष्ठेचें भडकलें होतें. तो दुर्निवार क्रोध प्राणांपलीकडच्या प्रयत्नांनीं त्यानें कसाबसा आवरला आणि तो म्हणाला, " वहिनी, अजूनही माझी सुरबाला जिवंत आहे, त्या गोष्टीचं तुम्हाला स्मरण करून देतों. ती नेहमीं म्हणते, 'कीं एकवार ज्या व्यक्तीचं प्रेम मजवर जडलं आहे, तिनं इतर कुणावर प्रेम करणं कधींही शक्य नाहीं.' केवळ त्या भरंवशावर दिवाला मीं तुमच्या हातीं सोंपवून दिला. माझी पूर्ण कल्पना होती, कीं असल्या साऱ्या बाबतींत सुरबालेची कधींही चूक व्हायची नाहीं—"

उपेन्द्र पुढें आणखींही कांहीं बोलणार होता. परंतु किरणमयीनें अगदीं अकस्मात् दोन्ही हात वर करून त्याला मध्येंच थांबविलें. तो विस्मयानें थक्कच झाला.

किरणमयी म्हणाली, " थांबा, भाऊजी ! तिची चूक झाली, तुमची कांहीं झाली नाहीं, या गोष्टीवर तुमचा तरी इतक्या निःसंदेहपणें कसा विश्वास बसला ?"

उपेन्द्र चटकन् उठून उभा राहिला.

किरणमयीनें त्याच्याकडे अतिशय विस्मयानें पाहिलें.

उपेन्द्र म्हणाला, " रात्र होत चालली आहे. मला वाद घालायला मुळींच वेळ नाहीं. मी तुम्हाला चांगला ओळखतों. परंतु एक गोष्ट तुम्ही पक्की लक्षांत ठेवा, कीं तुम्ही कुणावरही प्रेम करूं शकणार नाहीं. तें तुम्हाला कालत्रयींही शक्य नाहीं ! केवळ तुम्ही सर्वनाश मात्र इतरांचा करूं शकाल ! छीः छीः ! शेवटीं या दिव्याचा तुम्ही असा—"

निःसीम तिरस्काराच्या भावनेमुळें त्याच्या कंठांतून शेवटीं शब्दही फुटेना !

त्यानें समोर तीव्र दृष्टीनें पाहिलें. किरणमयीचा चेहरा इतका पांढरा फटफटीत पडला होता, कीं जणूं कोणी तिच्या काळजांत अकस्मात् बंदुकीची गोळी झाडली असावी !

दाराच्या बाहेर उभें राहून अघोरमयीनें विचारलें, " झाला का बाबा फराळ उपेन ? "

" नाहीं, मावशी, मीं काहीं खाल्लं नाहीं. अतिशय खराब वाटतं आहे मला–"

" खराब वाटतं आहे ? बरं नाहीं वाटत ? कां रे ? काय झालं आहे बाबा ? तर मग हवं तर इथंच का झोंपेनास आज ? आतां इथून जाऊंच नकोस तूं, उपेन ! "

" नाहीं, मावशी–जायलाच हवं मला. "

असें म्हणून उपेन्द्र तेथून बाहेर आला.

दिवाकराच्या खोलीच्या समोर येऊन त्यानें हांक मारली, " दिवा—"

दिवा मालवून दिवाकर अंथरुणावर पडला होता. त्याच्या हृदयाच्या अन्तर्भागांत काय चाललें होतें, हें केवळ एक सर्वान्तर्यामी परमेश्वरालाच माहीत!

अव्यक्त स्वरानें साद दिल्यासारखें करून तो खोलीच्या बाहेर आला. त्याचे पाय थरथर कांपत होते !

उपेन्द्र म्हणाला, " तुझी ट्रंक, बिछाना सगळं कांहीं बांधून घे. माझ्या-बरोबर निघायचं आहे तुला. "

हे शब्द ऐकून अघोरमयीला पराकाष्ठेचा विस्मय तर वाटूं लागलाच; परंतु ती अस्वस्थही झाली.

त्रस्त स्वरानें ती म्हणाली, " म्हणजे काय, उपेन ? अशा रात्रीं मूल माणूस आणखी जाणार कुठं, बाबा ? "

"माझ्याबरोबर जायचा आहे दिवा ! त्याबद्दल कसली आली आहे काळजी ? हं चल दिवा—झटपट तयारी कर सारी. मी गाडी घेऊन येतों. "

अघोरमयीनें उपेन्द्राचा हात पटकन् धरला आणि ती विनवणीच्या स्वरानें म्हणाली, " नाहीं, बाबा ! आज अमावास्येच्या रात्रीं त्याला कुठं जाऊं देणार नाहीं मी. मूल माणसाच्या हातून झाला असेल अजाणतां कांहीं अपराध ! इथं जर तुला त्याला ठेवायचं नसेल, तर उद्यां किंवा परवां कुठं तें ने त्याला; परंतु

आज रात्रीं त्याला इथून कुठं जाऊं देणार नाहीं मी. ”

हें मध्येंच विघ्न उपस्थित झालेलें पाहून उपेन्द्र हताश झाला!

कांहींशा दृढ स्वरानें तो म्हणाला, “ दिवाला इथं ठेवावा, असं आतां मला बिलकुल वाटत नाहीं, मावशी! बरं, आज अमावास्या आहे म्हणतां, तर आजची रात्र राहू दे इथं त्याला; परंतु उद्यां सकाळीं मात्र त्याला तुम्ही कांहीं हरकत करूं नका. सकाळीं दहा वाजेपर्यंत तरी ज्योतिषच्या घरीं पोंचू दे त्याला. ”

असें म्हणून चटकन् अघोरमयीला नमस्कार करून तो तेथून त्वरेनें खाली निघाला.

बाहेरच्या मोठ्या दरवाज्यापाशीं अंधारांत त्याच्या उपरण्याला कोणी मागून ओढलें.

उपेन्द्र तोंड फिरवून मागें पहातो, तोंच क्षणार्धांत किरणमयीने पुढें झुकून दोन्ही हातांनीं त्याचे पाय दाबून धरले.

करुण स्वरानें ती म्हणाली, “ माझं काळीज अगदीं फाटून जातें आहे भाऊजी! सगळं सगळं खोटं! छीः छीः! इतकी हलकट, इतकी पापी मी असेन असं तुम्हाला वाटलं तरी कसं? ”

“ चूप—गप्प बसा अगदीं! आजपर्यंत खूब खूब नाटकी अभिनय केलात तुम्ही–बस्स झाला तो! ”

असें म्हणून अगदीं पराकाष्ठेच्या तिरस्कारानें उपेद्रानें तिचें मस्तक जोरानें ढकलतांच ती एकदम त्याचे पाय सोडून जमिनीवर सपशेल आपटली!

“ नास्तिक! अपवित्र–व्हायपर! ”

असें अत्यंत त्वेषानें उद्गारून, तिच्याकडे पुनः नजरही न टाकतां उपेन्द्र तेथून झटकन् बाहेर पडला.

किरणमयी विजेच्या वेगानें एकदम उठून बसली. उपेन्द्राला उद्देशून ती कांहीं बोलावयाला गेली; परंतु तिच्या गळ्यांतून शब्दच निघणें अशक्य झालें. केवळ उघड्या दरवाजांतून ती बाहेरच्या अंधाराकडे पहात राहिली. तिच्या डोळ्यांतून जणूं आगीचे झोत बाहेर पडत होते!

पुष्कळ दिवसांपूर्वी, एक दिवस सतीशला बरोबर घेऊन उपेन्द्र पहिल्यानें येथें आला आणि परतून गेला, त्या दिवशीं, बरोबर याच ठिकाणीं ती उभी असून तिच्या डोळयांतून अशीच उन्मत्त नजर बाहेर फेंकली जात होती--

धडधडलेल्या आगीचे लोळ असेंच त्यावेळींही तेथें दिसत होते ! पुनः आज, शेवटच्या निरोपाच्या दिवशींही, उपेन्द्राला विरोधी अशी आग त्याच डोळ्यांत धगधगूं लागली.

" अगबाई ! या तर वहिनी कीं ! इथं अशा या वेळीं तुम्ही बसून कां हो ?"

" तूं घरीं निघालीस वाटतं ? "

असें बोलत धडपडत उठून उभी राहून किरणमयीनें पटकन् मोलकरणीचा हात धरला.

करुण स्वरानें ती तिला म्हणाली, " एकवार तूं माझ्या खोलींत चल मुक्ता. तुझ्याशीं दोन गोष्टी बोलायच्या आहेत मला--"

असें म्हणून जुलुमानेंच किरणमयी मोलकरणीस ओढून आपल्या खोलींत घेऊन आली.

तिथें येतांच तिनें दिवा उजळ केला आणि आपली पेटी उघडून तिनें तींतून चांदीच्या मोठ्या जोडव्यांचा एक जोड बाहेर काढून मोलकरणीच्या हातीं दिला.

मोलकरीण तिच्या या साऱ्या कृतीनें अगदीं थक्कच होऊन गेली होती.

ती कांहीं बोलणार, इतक्यांत किरणमयीच अनुनयाच्या स्वरानें तिला म्हणाली, " हीं तुझ्या मुलीला घालायला दिलीं आहेत बरं मीं ! नाहीं नाहीं– शपथ आहे माझ्या गळ्याची तुला ! तुला हीं घेतलींच पाहिजेत ! कदाचित् बहुतेक-फिरून कधीं तुझी माझी भेट जर नाहीं झाली—"

बोलतां बोलतां किरणमयीच्या डोळ्यांतून झरझरां अश्रुप्रवाह सुरू झाला.

" हा सर्व प्रकार आहे तरी काय, वहिनी ? "

असें म्हणून मोलकरीण तिच्याकडे विव्हल दृष्टीनें पहातच राहिली.

किरणमयी डोळे पुशीत पुशीत म्हणाली, " तुझ्याशिवाय माझं असं म्हणायला दुसरं कुणी नाहीं ग बाई ! वांचव-वांचव ग मला. माझं इथल्या कांचांतून आतां तूंच रक्षण कर. इथं मी राहिलें, तर माझ्या काळजाचे अगदीं तुकडे तुकडे होतील बघ ! "

मोलकरीण किरणमयीच्या पायांपासून डोळ्यापर्यंत बारीक नजरेनें एकसारखी पहात राहिली. तिच्या आश्चर्याला पारावार राहिला नाहीं.

चार दोन क्षणांनीं ती म्हणाली, " सगळं कांहीं माझ्या ध्यानांत आलं बरं, वहिनी ! मी दिखील एक बाईमाणूसच आहें ! माझे मर्द ज्या दिवशीं तळ्याच्या

काठीं रडत रडत मला म्हणाले, ‘ चाललों बरं मी मुक्ता ! पुनः कदाचित् दृष्टि-भेटही होणार नाहीं आपली ! ’ त्या वेळीं मी दिखील त्यांच्या पायांवर पडून रडत रडत म्हणालें, ‘ अहो, मला दिखील बरोबर घेऊन चला हो ! मला जर तुम्हीं मागं ठेवलंत तर काळीज माझं फाटून जाईल ! ’ तर मग उद्यां सकाळींच वाटतं छोटे बाबू इथून निघून जाताहेत वहिनी ? ”

किरणमयी म्हणाली, “ पण कलकत्त्यांत कांहीं आमचं रहाणं आतां होणार नाहीं, मुक्ता ! आम्हीं कुठं जावं असं वाटतं ग तुला ? ”

तिळमात्र विचार न करतां मोलकरीण म्हणाली, “ तर मग आराकानला जा, वहिनी ! अगदीं मनाच्या समाधानानं तिथं रहातां येईल तुम्हाला ! माझी धाकटी बहीणही आहे तिथं. माझं नांव सांगितलंत, म्हणजे तुम्हाला अगदीं डोक्यावर ठेवून दिईल पहा ती तिथं ! आज मंगळवार. उद्यां पहांटेस बोट सुटेल आराकानची. बोला, जातां तिकडे तुम्ही, वहिनी ? ”

किरणमयीनें पटकन् तिचा हात धरला आणि ती म्हणाली, “ हो, जातें—नक्की जातें. ”

मोलकरीण तिला आश्वासन देऊन म्हणाली, “ तर मग तुम्ही सगळी तयारी करून अगदीं जय्यत रहा. मी पहांटे गाडी घेऊन येतें अन् तुम्हाला घेऊन जातें. दारच्या चिमणीला दिखील दाद नाहीं लागायची तुम्ही कुठं गेलां आहां त्याची ! जा, वहिनी, अवश्य जा तुम्ही ! छोट्या बाबूजींना सोडून तुम्ही वांचणं मुळीं शक्यच नाहीं ! ”

असें म्हणून तिनें डोळ्यांना पदर लावला.

“ भाऊजी—”

रात्र सरून पहांटेचा सुमार झाला असावा. दिवाकर त्या हांकेनें एकदम चमकून उठून बसला.

समोर पहातो तों किरणमयी उभी !

दिवाकर आश्चर्यानें स्तंभित होऊन उद्गारला, “ हें काय वहिनी ? तुम्ही ? ”

“ हो. भाऊजी ! मीच ! ”

असें म्हणून किरणमयी स्तंभित झालेल्या दिवाकराच्या छातीवर एकदम उपडी पडली !

करुण वाणीनें ती म्हणाली, “ भाऊजी–भाऊजी ! मला सोडून जाणार म्हणे तुम्ही ! जा बरं कसे ते–पाहूं या. ”

उत्तरादाखल दिवाकरच्या तोंडून एक शब्दही फुटेना! त्याचे डोळे मात्र आंसवांनीं अगदीं भरून आले!

किरणमयी उठून बसली आणि आपल्या पदरानें तिनें त्याचे डोळे पुसून काढले.

मृदु वाणीनें ती म्हणाली, "छीः! असं रडावं का, भाऊजी?"

"वहिनी, माझा कांहींच इलाज चालण्यासारखा नाहीं हो! दादानं तर आज सकाळींच मला निघून यायला सांगितलं आहे."

उपेन्द्राचें नांव निघतांच किरणमयी संतापानें अगदीं आंधळी झाली. ती ओरडून म्हणाली, "कोण दादा? कोण तो? तो काय माझ्यापेक्षांही तुम्हाला अधिक जवळचा, अधिक आपला, असं वाटतं? तुम्ही दिसलां नाहीं, कीं त्यांचं काळिज फाटतं काय? नाहीं भाऊजी, आतां आम्हांला परस्परांपासून निराळं करणं जगांत कुणालाही कधीं शक्य नाहीं. बाहेर गाडी उभी आहे. चला, आपण जाऊं."

"जायचं? कुठं पण, वहिनी?"

"मी जिकडे तुम्हाला नेईन, तिकडे, भाऊजी!"

"बरं तर—चला."

असें म्हणून दिवाकर उठूं लागला. एकवार त्याला वाटलें, आपण कांहीं जागे नाहीं. झोंपेच्या भरांत स्वप्न पहात आहों!

परंतु दुसऱ्याच क्षणीं किरणमयीच्या मागोमाग तो हळुहळू दाराच्या बाहेर येऊन उभा राहिला.

## ९

असा एक प्राणी आहे, कीं तो कीट-पतंगांना आपणाकडे जोरानें आकर्षून ओढून आणतो. त्याप्रमाणें जणूं दुर्विचार जादूच्या मंत्रानें, अर्धवट शुद्धि असलेल्या, मोहान्ध झालेल्या हतभाग्य दिवाकराला जहाज–घाटावर किरणमयीनें ओढून आणलें, आणि तिकिटें विकत घेऊन आराकानला जाणाऱ्या बोटीवर तीं दोघें चढलीं.

या बोटींत फारशी गर्दी नसल्यामुळें तीं उभयतां नवराबायको असावींत अशा समजानें, बोटीच्या व्यवस्थापकांनीं दिवाकर आणि किरणमयी यांना एकाच केबिनमध्यें जागा दिली.

तेथें किरणमयीला बसवून दिवाकर डेकच्या एका निर्जन जागीं रेलिंग धरून निःस्तब्ध उभा राहिला.

हळु हळू डेकवरील उतारूंची गर्दी कमी झाल्यावर हमाल वगैरे मंडळीचा गोलमाल बराच थांबला. थोड्याच वेळांत नांगर उचलल्याचा कर्कश आवाज होऊन बोटीच्या समोरच्या भागाप्रमाणें दिवाकराच्या हृदयाचा अन्तर्भागही कांपूं लागला.

अल्पावधींतच बोट भागीरथीच्या मध्यभागीं तरंगत आली आणि अथांग समुद्रांत उडी घ्यावयाच्या उद्देशानें हळुहळू आपली गति वाढवूं लागली.

बोट आतां चांगली सुरू झाली आहे, असें जेव्हां दिवाकराच्या लक्षांत आलें, तेव्हां त्याचे डोळे आंसवांनीं अगदी भरून आले आणि आपल्या दोन्ही हातांचे पंजे चेहऱ्यावर जोरानें दाबून धरून जोरानें येणारें रडूं कसें तरी आवरून त्यानें आपली लाज राखण्याचा शिकस्तीचा प्रयत्न चालविला.

आकाशाच्या पूर्व दिशेकडील भाग त्यावेळीं नुकत्याच उगवलेल्या सूर्याच्या प्रभेनें लालसर दिसत होता. दिवाकराच्या मनांत कल्पना आली, उपेनदादाला आपणाबद्दल यत्किंचितही संशय आलेला नसल्यामुळें ज्योतिषच्या बंगल्यांत अजूनही तो बिछाना सोडून उठला नसेल !

पळून जाण्याच्या उद्देशानें घराबाहेर पडेपर्यंत जी अव्यक्त निंदेची ग्लानि दिवाकराच्या अन्तःकरणांत सारखी सांचत येत होती, तिचा अखेरचा भाग किती किळसवाणा आणि भयंकर आहे, याची स्पष्ट जाणीव देणारें चित्र आतां त्याच्या डोळ्यांसमोर दिसूं लागलें होतें. एका सभ्य गृहस्थाच्या कुल-वधूला, तिच्या घर संसारांतून बाहेर काढून कुठल्या तरी दूरच्या अनोळखी मुलखांत आपण घेऊन चाललों आहों, या अशक्यप्राय घटनेचा विचारही त्याच्या मनांत अजून आला नव्हता. त्याच्या सत्यतेची जाणीवच त्याला अजून-पर्यंत झाली नव्हती !

आपलें शिक्षण, संस्कार, चरित्र, शाळा, कॉलेज, देश, आप्त मित्र, बंधु-बांधव आणि या सर्वांपेक्षां आपल्याला वडिलांसमान असणारा उपेनदादा,— या सर्वांपासून निर्दय दैवगतीनें आपण दूर दूर जात आहों हे, बोट हळु हळू सुरू होतांच, त्याच्या अगदीं निःसंदेहपणें ध्यानांत येऊन त्याच्या जिवाची विलक्षण घालमेल होऊं लागली.

त्याच्या उपेनदादासमोर तो अजूनही खरोखर एखाद्या बालकाप्रमाणें होता.

ही किळसवाणी बातमी जेव्हां उपेनदादाच्या कानीं जाईल, तेव्हां उपेनदादाच्या मनाची स्थिति काय होऊन जाईल, हा विचार मनांत येतांच दिवाकराच्या हृदयाचें स्पंदन जणू थांबल्यासारखें होई !

तेथल्या तेथें खालीं बसून दिवाकरानें दोन्ही गुडघ्यांत मान घातली आणि क्षणार्धांत अजूनपर्यंत कशाबशा थोपवून धरलेल्या अश्रुधारा त्याच्या डोळ्यांतून वेगानें झरूं लागल्या

याच वेळीं किरणमयी येऊन त्याच्याजवळ उभी राहिली आणि त्याच्या मस्तकावर हात ठेऊन ती स्नेहार्द्र वाणीनें म्हणाली, " भाऊजी, चला, एकवार केबिनमध्यें चला—"

मोठ्या प्रयत्नांनीं, बऱ्याच वेळानें दिवाकरानें आपले अश्रु आवरले, डोळे पुसले आणि खालीं मान घालून तो मुकाट्यानें उभा राहिला.

" चला, या, भाऊजी ! "

कांहीं न बोलतां हलु हळू दिवाकर किरणमयीच्या मागून केबिनकडे निघाला. आंत येतांच किरणमयीनें दरवाजा बंद करून घेतला आणि त्याला जवळ बसवून, त्याचे दोन्ही हात आपल्या हातीं घेऊन करुण स्वरानें तिनें त्याला विचारलें, " रडत कां हो होतां, भाऊजी ? "

तो मायेचा प्रश्न ऐकतांच दिवाकराला भडभडून येऊन त्याच्या डोळ्यांतून आंसवें पुनः झिरपूं लागलीं.

साडीच्या पदरानें तीं पुसून किरणमयी म्हणाली, " मला अगदीं खरं खरं सांगा बरं, भाऊजी ? माझ्यावर तुमचं प्रेम आहे कीं नाहीं ? "

दिवाकराच्या तोंडून शब्दही फुटला नाहीं. एकाद्या लहान बालकाप्रमाणें तो स्फुंदून स्फुंदून रडूं लागला.

त्याचा आसवांनीं भिजलेला चेहरा आपल्या वक्षःस्थलाशीं ओढून घेऊन, किरणमयीनें त्याला तेथें घट्ट धरलें आणि हलुहळू त्याच्या केंसांतून करांगुलि फिरवीत ती निःशब्दपणें त्याचें सांत्वन करूं लागली.

अशा तऱ्हेनें बराच वेळ गेला.

कांहीं वेळानें दिवाकराच्या डोळ्यांतील अश्रुधारा आपोआपच थांबल्या आणि बराचसा शांत होऊन तो उठून बसला. कांहीं क्षणांनीं, किरणमयीशीं एक अक्षरही न बोलतां त्यानें दरवाजा उघडला आणि आस्ते आस्ते तो बाहेर आला.

त्या वेळीं बोट नदीच्या तीराजवळून, वांकडीं तिकडीं वळणें घेत, उथळ जागा शक्य तों टाळून, पाणी कापीत कापीत, मंद गतीनें समुद्राकडे निघाली होती आणि कोळ्यांच्या लहान-मोठ्या होड्या. आणि मालानें आणि थोड्या फार उतारूंनीं खचून भरलेले पडाव त्या जंगी बोटीला तसाच जंगी मान देत, अतिशय सावधपणें दुरून दुरून जात होते.

दिवाकरानें रेलिंगपाशीं एक खुर्ची ओढून घेतली आणि तिच्यावर तो पुनः बसून राहिला. जवळ आणि दूर, पाण्यांत आणि जमिनीवर जें जें म्हणून कांहीं त्याच्या नजरेला येई, त्याचा त्याचा अतिशय वेदनायुक्त हृदयानें कायमचा निरोप घेत घेत, आपल्या अन्तर्यामीचें असह्य दुःख अन्तर्यामी परमेश्वराला तो निवेदन करूं लागला.

कांहीं वेळानें पुनः केबिनमधून हांक ऐकूं आली.

किरणमयी म्हणाली, " बराच उशीर झाला—आतां तुम्ही आंघोळ उरकून या. तोंपर्यंत मी तुमची खाय-प्यायची नीट व्यवस्था करून ठेवतें. "

ती नुकतीच स्नान करून आली असून, तिचे भिजलेले केंस पुंजक्या पुंजक्यांनीं तिच्या पाठीवर रुळत होते. ती खालच्या पोशीवरच बसून खाद्य पदार्थ भरलेल्या मातीच्या हंडीचें तोंड खोलून आंतल्या पदार्थांची मोजगणती आणि हिशेब करीत होती. काल रात्रींच, मुक्ता मोलकरणीच्या मार्फत तिनें ही सगळी मिठाई बिठाईची व्यवस्था करून ठेवली होती.

दिवाकर उत्तरला, " तुम्हीच घ्या खाऊन. मला बिलकुल भूकच नाहीं वहिनी ! "

किरणमयीनें चेहरा उचलून त्याच्याकडे पाहिलें.

ती मान हलवून गंभीर स्वरानें म्हणाली, " तें नाहीं हं कांहीं चालायचं ? तुम्ही जर खाल्लंत नाहीं, तर मी दिखील कांहीं खाणार नाहीं. आतां तुम्हीच माझं सर्वस्व आहां, भाऊजी ! तुम्हाला खाऊं घातल्याशिवाय माझ्या घशा-खालीं कांहीं केल्या एक घांसही उतरायचा नाहीं. "

तिच्या तोंडचे हे शब्द ऐकून दिवाकराला लाजेनें अगदीं मेल्याहूनही मेल्या-सारखें झालें आणि एक शब्दही न बोलतां तो तेथून बाहेर जावयाला निघाला.

तोंच त्याला चटकन् पकडून किरणमयी म्हणाली, " हा सात महारथींचा चक्रव्यूह आहे, भाऊजी ! तुम्ही पळून पळणार कुठं ? आंत यायला या व्यूहांत रस्ता आहे; पण बाहेर पडायला रस्ता काय सर्वांनाच माहीत असतो ? जर

तशी तुमची इच्छाच होती, तर ही विद्या तुम्हीं आपल्या उपेनदादाकडून शिकून कां घेतली नाहींत ? ”

असा प्रश्न करून उत्तराच्या अपेक्षेनें किरणमयी थोडीशी थांबली.

परंतु दिवाकर कांहींच न बोलतां दुसरीकडेच पहात उभा राहिला.

चार दोन क्षण उत्तराच्या प्रतीक्षेनें गप्प राहून किरणमयी म्हणाली, “ हें कांहीं नाटक-तमाशा नव्हे भाऊजी ! बेफाम होऊन माझं सांगणं तुम्ही तुच्छ मानूं नका. आंघोळ करून येऊन अगोदर थोडंसं खाऊन घ्या अन् मग बाहेर जाऊन रेलिंग धरून जितकी इच्छा असेल तितकं खुशाल रडून घ्या. मी तुम्हाला त्यांत हरकत करणार नाहीं. पण तुम्हाला हेंही मी सांगून ठेवतें, भाऊजी, कीं याउपर डोळ्यांतल्या पाण्याची अतिशय आवश्यकता लागणार आहे. जरूर नसतांना, तें व्यर्थ खर्च करून, त्यावेळीं हाय हाय करायला लागूं नये, एवढी तूर्त काळजी घेतलेली बरी ! ”

परंतु दिवाकरानें तिला कांहींच उत्तर दिलें नाही.

भावी कालाच्या अत्यंत निष्ठुर परिणामाचें तें चिन्ह मान खालीं घालून, मस्तकावर धारण करून, स्नान करावयाला तो मुकाट्यानें बाहेर गेला.

त्या शून्य छोट्याशा खोलींत किरणमयीही स्तब्ध बसून राहिली. कारण, तिनें केलेल्या उपहासाच्या शूलानें एकट्या दिवाकरालाच जखमी केलें होतें असें नाहीं; तो हजार पटीनें तीक्ष्ण होऊन तिच्या हृदयामध्यें परत आला होता !

बाहेर येऊन दिवाकर इकडे तिकडे उगीचच भटकूं लागला. फिरतां फिरतां, बोटीच्या ज्या भागांत तिसऱ्या वर्गाचे उतारू दाटीवाटीनें कसे तरी बसून राहिले होते, तेथें तो खालीं उतरून आला आणि आपल्या मनाला भुलवून शांत ठेवण्यासाठीं, भिन्न भिन्न प्रदेशांतील निरनिराळ्या जातींच्या उतारूंमधून रस्ता काढीत भटकूं लागला.

या भारतवर्षात किती निरनिराळ्या जाति, किती भिन्न भिन्न तऱ्हेचे पोषाक परिच्छेद, किती ज्ञाती अज्ञात भाषा प्रचलित आहेत, हें दिवाकराच्या आज पहिल्यानेंच दृष्टीला पडून तो आश्चर्यानें अगदी स्तिस्मित होऊन गेला. बोटीच्या तेवढ्या त्या परिसरांतही इतक्या निरनिराळ्या जातींचे आणि प्रकारचे लोक ! आणि भिन्न भिन्न बोली भाषांच्या संमिश्रणानें जो शब्दसमुद्र उसळून राहिला होता, तो तरी किती विचित्र !

दिवाकर जिन्यानें खालीं उतरला आणि आश्चर्यानें स्तंभित होऊन निःस्तब्ध-पणें उभा राहिला.

थोडीशी जागा पटकवण्यासाठीं यापूर्वी उतारूंमध्यें जी जंगी ढकलाढकली, मारामारी आणि दमबाजी चालली होती, ती आतां बहुतेक पूर्णपणें थांबली होती. स्वतःच्या 'पराक्रमा'नें काबीज केलेल्या जागेवर उतारूंनीं आपलीं अंथरूणें पसरलीं असून, आपल्या सामानसुमानाचा कोट सभोंवतालीं उभारून, शक्य तितकें स्वास्थ्य त्यांनीं संपादन केलें होतें. आतां शेजाऱ्यापाजाऱ्यांकडे लक्ष देण्याइतकी त्यांना फुरसत मिळाली असून प्रत्येकजण दुसऱ्याचा परिचय करून घ्यावयाला संतोषानें तयार झाला होता.

त्या उतारूंच्या प्रचंड दाटींत एका ठिकाणीं दिवाकराची सहज दृष्टि वळली, तोंच एक बंगाली माणूस उठून उभा राहून चीत्कार करून त्याला हटकून म्हणाला, "बाबू महाशय या, एकवार इकडे या—इकडे या—"

त्या माणसाजवळ एक भक्कम, मजबूत बांध्याची बाई बसली असून, तिनेंही अत्यंत उत्सुक दृष्टीनें त्या माणसाच्या आग्रहाला जोराचा दुजोरा दिला.

अनेक कष्टांनीं आणि बऱ्याच लोकांची तिरस्काराची कडू भाषणें, आणि डोळे-फाड सहन करून, त्या गर्दींतून सावधपणें पावलें टाकीत टाकीत दिवाकर त्या माणसाजवळ कसाबसा येऊन पोंचला.

तो जवळ येतांच, त्या माणसानें जवळच्या ट्रंकेकडे बोट दाखविलें आणि तो किंचित् दिमाखानें म्हणाला, "हें माझं टिनचं डबडं नाहीं, बाबूजी! अस्सल लोखंडी आहे ही ट्रंक. खुशाल बसा आपण तिच्यावर–"बरं महाशय आपण?"

दिवाकर म्हणाला, "ब्राह्मण."

तत्क्षणीं दोन्ही हात उचलून त्या गृहस्थानें दिवाकराच्या बुटांवरची धूळ घेत-ल्यासारखें केलें आणि ती जिभेवर, माथ्यावर आणि गळ्यावर ठेवून तो मृदु स्वरानें म्हणाला, "वाटलं होतं महाशय, कीं प्रवासाचे हे दिवस फुकट जाणार आमचे! बरं, महाशय आहेत कुठं?"

दिवाकरानें उजव्या करांगुलीनें बोटीचा वरचा भाग दाखविला.

तो गृहस्थ उद्गारला, "केबिनमध्यें आहां? छान! कुठंही असा आपण-पण दररोज संध्याकाळीं तरी एकवार पायाची धूळ इथं झाडूं द्या, एवढीच प्रार्थना आहे. एक वेळ तरी दर्शनाचा लाभ होऊं द्या आम्हाला! बरं जाणार कुठं? रंगूनला?"

दिवाकर मस्तक हालवून म्हणाला, " नाहीं—"

" मग ? "

" आराकानला. "

" आराकानला तर आम्हीही असतों. आज तीस वर्षें मी तिथं आहें. पण महाशयांना कांहीं तिथं कधीं मी पाहिल्याचं आठवत नाहीं ! हे पहिल्यानंच जातां आहां वाटतं ? "

" हं. "

" तिथं कुणी नातेवाईक आहे वाटतं ? नाहीं ? बरं, नाहीं तर नाहीं, कांहीं चिंता करूं नका आपण. महाशयांच्या वडिल-मातोश्रींच्या आशीर्वादानें आराकानला माझं स्वतःचं घर आहे. माझ्या इमारतींत पुष्कळ खोल्या रिकाम्या पडलेल्या आहेत. खुशाल चला आपण–माझ्याबरोबरच चला. "

दिवाकर थक्क होऊन गप्प बसला होता.

जवळ बसलेल्या बाईकडे बोट करून तो गृहस्थ लगेच म्हणाला, " ही घरवाली. "

या क्षणापर्यंत ' घरवाली ' अनिमेष दृष्टीनें दिवाकरकडे पहात होती.

अतिशय जाड आणि जड वाणीनें तिनें विचारलें, " आपलं कुटुंब आहे वाटतं बरोबर ? "

दिवाकराचा चेहरा एकदम लाल झाला. नुसती मान हलवून त्यानें कसा तरी अस्पष्ट होकार दिला.

त्या बाईचे शब्दोच्चार चमत्कारिक, अस्पष्ट आणि वांकडे वांकडे होते. कपाळावर भरपूर गोंदलेलें होतें. केसांच्या भांगांत मस्त लंबाचौडा असा शेंदरी पट्टा होता; नाकांत भली थोरली घरंगळणारी नथ आणि दोन्ही कानांत पंचवीस तीस मुद्या होत्या !

तिनें माथ्यावर पदराचा जो थोडासा भाग पहिल्यानें घेतला होता, उत्साहाच्या आवेगानें तोही तेथून केव्हांच खालीं गळला होता !

ती भसाड्या आवाजानें म्हणाली, " फार छान झालं बघा. आराकान हें अगदीं खराब ठिकाण आहे, मशाय ! अगदीं रानटी मुलुख–मग लोकांचा ! पण आमच्या वाड्यांत कुणाची कांहीं टाप चालायची नाहीं–तशी मी घरवालीच नव्हे मुळीं, मशाय ! कामिनीला भीत नाहीं असा माणुसच मिळायचा नाहीं तुम्हाला त्या मुलुखांत ! तुम्ही आपले आमच्या वाड्यांत रहा—कांहीं

कसलं भय नाहीं तुम्हाला मग. खोलीचं भाडं आहे आमच्याकडे पांच रुपये—पण तुम्ही ह्या चार रुपयांप्रमाणं झालं! हो, काय हो घरवाले, तुमच्या कारखान्यांत यांना काम नाहीं का मिळायचं ? "

घरवाले जरा इकडे तिकडे करून म्हणाले, " हो मिळेल तर काय झालं ! "

दिवाकरानें विचारलें, " आपलं नांव ? "

" हरीश भट्टाचार्य. "

खालीं वांकून दिवाकर नमस्कार करणार होता, तोंच त्याला थांबवून भट्टाचार्यजी म्हणाले, " छे छे ! तसं करूं नका. मला पाप लागेल तुमचा नमस्कार घेतला तर. मी कांहीं ब्राह्मण नाहीं, मशाय—कैवर्त. थोडंसं शास्त्र बिस्त्र जाणतो, म्हणून लोक श्रद्धाभक्तीनं ' भट्टाचार्य ' म्हणून मला म्हणतात, इतकंच ! गळ्यांत त्रिकंठी माळा घालतों, मासे-मांस खाणं सोडून दिलं आहे. अधिक काय सांगूं तुम्हाला, मशाय ? खूब खूब करून तर राहिलों आहें मी. नुकताच हा जवळजवळ दोन हजार, अडीच हजार खर्च करून चारी धामांची यात्रा करून आलों बघा. आमच्या घरींही आज चार वर्षं आईला आणून उत्सव करतों आहें मोठ्या धामधुमीनं पूजेच्या नवरात्रांत ! आणखीन् काय हो करणार ? "

दिवाकर कांहींच बोलला नाहीं. त्याच्याकडे पहात राहिला.

भट्टाचार्यजी लगेच पुढें बोलूं लागले, " म्हणून तर घरवालीला मधूनमधून मी म्हणतों, कीं, घरवाली, आराकानला आपलं जें कांहीं आहे, तें विकून टाकून पैसा उभा करूं अन् कुठं तरी एखाद्या क्षेत्राच्या ठिकाणीं जाऊन राहूं चल. "

असें म्हणून त्यांनीं उदास चेहऱ्यानें वर पाहिलें आणि ते स्तब्ध बसले.

घरवालीनेंही आपल्या स्वाभाविक जड गळ्यानें उत्तर दिलें, " मी दिखील काय, तेंच म्हणतें कीं ! कच्च्या वयांत अदृष्टाच्या फेऱ्यामुळें जें कांहीं आमच्या हातून घडलं, तें तर घडलंच ! तें कांहीं आमच्या अंगावर लिहून उमटलेलं नाहीं ! म्हणून मीही म्हणतें, घरवाले, पुष्कळ झालं-पुरे आतां. आपण जाऊं या—"

असें म्हणून तिनेंही डोळे वर लावले आणि ती गप्प बसली.

दिवाकर कांहीं तसा पक्कड माणूस नव्हे ! या सगळ्या इतिहासाचें गूढ तत्त्व काय असावें, हें ध्यानांत न आल्यामुळें बिचारा गप्प बसून राहिला.

चार दोन क्षणांनीं घरवालीनेंच स्तब्धतेचा भंग केला.

तिनें विचारलें, "काय हो घरवाले, तर मग आतां पोहे घालूं का भिजत तुमच्यासाठीं ?"

घरवाल्यांचें ध्यान भंग पाहून ते धीरे धीरे म्हणाले, "हां, घाल—"

दिवाकराला जगाचा अनुभव फारसा नसला, तरी या इंगिताचा अर्थ आतां त्याच्या ताबडतोब लक्षांत आला.

तो उठला आणि म्हणाला, "बरं, मी जातों आतां. पुन्हां येईनच लवकर."

हरीशाचा निरोप घेऊन दिवाकर निघाला, तो तसाच डेकवर आला आणि तेथेंच, स्नान नाहीं, खाणं पिणं नाहीं, अशा स्थितींत एका आरामखुर्चीवर लवंडला. लगेच त्याला झोंप लागली.

बोट नदीच्या अस्वच्छ, मातमळ पाण्यांतून बाहेर पडून अथांग काळसर सागराच्या जलराशीमध्यें केव्हां तरंगत येऊन प्रवास करूं लागली, तें त्याच्या ध्यानांतही आलें नाहीं !

अस्फुट, अर्धवट गडबडीमुळें झोंप उडून तो जागा झाला, आणि समोर पहातो तों सूर्य अस्ताला जात आहे, असें त्याच्या दृष्टीला पडलें. आपसांत वादविवाद करीत पुष्कळ लोक सूर्यास्त पहात होते.

ज्या सूर्यास्ताचें वर्णन त्यानें अनेक इंग्रजी आणि बंगाली पुस्तकांत यापूर्वी वाचलें होतें, तोच हा सूर्यास्त ! हाच तो खराखुरा समुद्र !

हळुहळू चौफेर नजर टाकून दिवाकरानें एकवार तो अनंत जलराशि पोटभर पाहून घेतला. दुसऱ्याच क्षणीं अस्ताला जाणाऱ्या सूर्यनारायणाला त्यानें नमस्कार केला. तत्क्षणीं त्याच्या डोळ्यांना पाणी आलें.

सूर्य अस्ताला गेला, तें तो पहात राहिला. आकाश म्लान होत आलें, तें तो पहात राहिला. संध्याकाळचा अंधार हळुहळू पसरत येत होता, तें तो पहात राहिला. क्रमाक्रमानें आकाश आणि पाणी यांनीं घनदाट काळें कुट्ट रूप धारण केलें; तरीही खुर्चीवर तसाच पडून दिवाकर तें मुकाट्यानें पहात राहिला.

रात्रीचा थंडगार वारा हू हू करून वहात होता. वरचा डेक जवळजवळ अगदीं निर्जन होता. डोक्यावर कृष्णपक्षांतील खोलच खोल असें काळें आकाश, खालीं तसेंच खोलच खोल समुद्राचें काळें पाणी ! त्यांच्या मध्यभागीं आपल्या अन्तःकरणांतील घनदाट कालिमा ओतून, कांहीं वेळापुरतें तरी, दिवाकर शांति-समाधान मिळवूं पहात होता.

इतक्यांत अकस्मात् कोणाच्या तरी कोमल करस्पर्शानें त्याची तंद्री एकदम भंगली ! त्यानें मागें वळून पाहिलें—

किरणमयी !

किरणमयी म्हणाली, "काय, चाललं आहे तरी काय, भाऊजी ? तुम्ही आमरण उपास करायचं व्रत तर घेतलं नाहीं ?"

दिवाकरानें तिला कांहींच उत्तर दिलें नाहीं. तो तसाच गप्प पडून राहिला.

किरणमयीनें क्षणभर त्याच्या उत्तराची वाट पाहिली, परंतु तो कांहींच बोलत नाहीं, असें पाहून ती म्हणाली, "चला केबिनमध्यें चला त्या–"

असें म्हणून जवळजवळ जबरदस्ती करूनच किरणमयीनें त्याला केबिनमध्यें ओढून आणलें.

खालीं तक्तपोशीवर पसरलेल्या बिछान्यावर त्याला बसवून ती त्याला म्हणाली, "तुम्हीं दुसरा तिसरा जरी कांहीं समज घेतला नाहीं, तरी इतकं तरी तुम्हांला खात्रीनं ठाऊक आहे, कीं हजार वेळ रडलां ओरडलां, तरी बोट तुम्हांला कांहीं परत तुमच्या मुलुखांत घेऊन जाणार नाहीं. तोंडांत कांहीं न घालतां तुम्हीं जरी सुकून मेलांत, तरी नाहीं ! समुद्राच्या पाण्यांत तुम्ही उडी टाकलीत, तरीही नाहीं ! तुम्हांला आराकानला आतां गेलं हें पाहिजेच ! मग उगीचच्या उगीच स्वतः सुकून मलाही कां सुकवतां ? तुम्हांला मी हें देतें आहे, त्यापैकीं तुम्हांला खातां येईल तेवढं खा. नंतर बोट जेव्हां आराकानला पोंचेल, तेव्हां तुम्हाला तुमची मर्जी नेईल तिकडे खुशाल चला. तुमची खुशी लागेल तेव्हां तुम्ही परत या. तुमची शपथ घेऊन सांगतें, भाऊजी, मी तुम्हाला कसलीही हरकत करणार नाहीं."

बोलतां बोलतां किरणमयीचा कंठस्वर उग्र झाला आणि तहान भुकेनें कावलेले तिचे डोळे आगीप्रमाणें धगधगूं लागले.

दिवाकर वर नजर करून मंत्रमूढाप्रमाणें तिच्याकडे बघतच राहिला.

आज इतक्या दिवसांनीं, पडद्याच्या आडून सत्य वस्तूचें दर्शन आपणाला अकस्मात् झालें असें त्याला वाटूं लागलें.

किरणमयीच्या सुंदर नेत्रद्वयाच्या, वासनांनीं धगधगलेल्या, भुकेनें कावलेल्या नजरेंत दुसरें कांहीं असो वा नसो; परंतु त्या ठिकाणीं आपणावरच्या प्रेमाचा एक बिंदुही नाहीं, अशी दिवाकराची खात्री झाली.

परंतु तो कांहीं बोलला नाहीं. खालीं नजर लावून, उभारलेल्या दोन्हीं ढोंपरांत चेहरा खुपसून तो दगडाप्रमाणें गप्प बसून राहिला.

दोन चार क्षणांनीं किरणमयी तेथून उठली आणि एका मडक्यांतून थोडी मिठाई एका ताटलींत घालून तिनें ती दिवाकरासमोर ठेवली. नंतर गुडघे टेंकून ती जरा उंच होऊन बसली, आणि एका हातानें जबरदस्तीनें त्याचें तोंड वर करून ताटलींतील पदार्थांचा एक एक घांस ती त्याच्या तोंडांत घालूं लागली.

अशा रीतीनें सगळी मिठाई दिवाकराला भरवून किरणमयी मनांत विचार करीत स्तब्ध बसून राहिली आणि दुसऱ्याच क्षणीं खालीं वांकून तिनें दिवाकराच्या आर्द्र ओठांचें पटकन् चुंबन घेऊन ती खदखदां हंसूं लागली.

तें विषानें लिडबिडलेलें चुंबन आणि तें निष्ठुर हास्य दिवाकरानें आपली सर्व शक्ति एकवट करून कशीं तरी सहन केली; परंतु रात्रीं जेव्हां एकाच बिछान्यांवर झोंपावयाची योजना सुरू झाली, तेव्हां शांत स्थिर रहाणें त्याला अगदीं अशक्य झालें!

तो ताडकन् उठून उभा राहिला आणि दृढ स्वरानें म्हणाला, "हें व्हायचं नाहीं, वहिनी! कांहीं झालं तरी मला हें केवळ अशक्य आहे. मला तुम्ही सोडून द्या–बाहेर कुठंही जागा मिळेल तिथं मी रात्रभर पडून रहातों; परंतु हा हुकूम पाळण्यासाठीं कांहीं झालं तरी या खोलींत रात्र काढणं मला अगदीं अशक्य आहे. बिलकुल नाहीं–बिलकुल नाहीं! अशक्य–असंभवनीय अगदीं!"

किरणमयी त्या वेळीं बिछाना घालीत होती. तिनें चटकन् मागें वळून पाहिलें.

दिवाकर पुनः दृढ स्वरानें, आवेगानें म्हणाला, "कांहीं झालं तरी हें होणं अशक्य आहे!"

किरणमयीनें पहिल्यानें हंसण्याचा प्रयत्न केला; परंतु कांहीं केल्या तिला हंसूं म्हणून येईना!

तिनें विचारलें, "काय होणं अशक्य आहे, भाऊजी? झोंपणं?"

बाणांनीं विव्हल झालेल्या वाघिणीप्रमाणें तिचे दोन्ही डोळे आग फेंकित होते.

दांतावर दांत रोवून ती आस्ते आस्ते म्हणाली, "तुम्हाला काय वाटतं, भाऊजी, कीं सगळा अपराध माझ्या माथ्यावर चापून एकाद्या छान सज्जन माणसाप्रमाणं आपल्या देशीं परत जाऊन तुमच्या उपेनदादाच्या पायांना स्पर्श करून 'मी साधु, सज्जन आहे,' अशी आपण शपथपूर्वक द्वाही फिरवूं? मग तुमचा उपेनदादा गर्वभरानं माथं वर करून फिरेल, नाहीं? नाहीं, भाऊजी तसं व्हायचं नाहीं. माझ्या सगळ्या गोष्टी तुम्हाला कळणार नाहींत अन् तुम्हांला

समजावून सांगायचं प्रयोजनही नाहीं. तुम्ही साधु असा अगर नसा, त्याबद्दलही मला फिकीर नाहीं. परंतु अपराधाच्या भाराखालीं जेव्हां माझं माथं खालीं वाकलेलं असेल, तेव्हां तुमच्या उपेनदादाच्या मानेवरही ताठ करून चालण्यासारखं डोकंच मी राहूं देणार नाहीं, याबद्दल तुमची खात्री असूं द्या. ''

असें म्हणून ती पुनः आपलें बिछाना घालण्याचें काम करूं लागली आणि जवळच्या गादी असलेल्या बाकावर दिवाकर संकुचितपणें माथं खालीं घालून बसून राहिला.

रात्रीं दोघेंही जवळजवळच झोंपलीं.

अदृष्टाच्या प्रभावामुळें सर्वस्वाचें दान करून हरिश्चंद्रानें ज्याप्रमाणें चांडाळाच्या हातीं आपणाला समर्पण केलें, त्याप्रमाणें अतिशय तिरस्कारनें, दिवाकरानें किरणमयीच्या शय्येवर आत्म-समर्पण केलें.

परंतु त्याची ती संपूर्ण विरक्तता किरणमयीच्या अनुभवाला आल्यावांचून राहिली नाहीं.

सगळ्या रात्रभर, तंद्रामय अवस्थेंत त्याच्या दोन्ही कानांमध्यें कोठलें तरी अस्फुट क्रंदन, प्रवाहाप्रमाणें येऊन निनादूं लागलें आणि त्यांतच मधुन मधून कोणाचा तरी क्रुद्ध दीर्घ श्वास राहून राहून गर्जना करीत असल्याप्रमाणें त्याला भासूं लागलें.

पहांटेच्या सुमाराला एक जबर धक्का मिळाल्यामुळें दिवाकर एकदम जागा झाला आणि बाहेर प्रचंड वेगानें वावटळ सुटली असून बोट अतिशय डोलूं लागली आहे, असें त्याला आढळून आलें.

त्यानें डोळे उघडले आणि पहातो तों आपल्या छातीवर किरणमयीचा कोमल उजवा हात निजलेल्या काल-सर्पाप्रमाणें पडला आहे असें त्याला आढळून आलें.

मागाहून जाग आल्यावर तो आपणाला दंश केल्यावांचून रहाणार नाहीं, या आशंकेनें त्याला उठावयाचें धाडस झालें नाहीं आणि तो डोळे झांकून तसाच पडून राहिला.

वारा आणि बोटीचें डुलणें यांचा वेग अधिकाअधिक वाढूं लागला आणि त्यामुळें झोंप मोडून किरणमयी एकदम जागी झाली

दिवाकराच्या छातीवरचा सैल पडलेला आपला हात किंचित् दाबून तिनें धीरे धीरे विचारलें, " बाहेर हें काय ? वादळ वाटतं ? "

दिवाकर म्हणाला, " हो. "

" तर मग आतां उपाय ? "

दिवाकर कांहींच बोलला नाहीं.

किरणमयी म्हणाली, " बोट या वादळांत बुडावी, अशी तुम्ही देवाजवळ प्रार्थना करीत असाल, नव्हे, भाऊजी ? "

दिवाकर म्हणाला, " नाहीं. "

" एवढासा एक शब्द—' नाहीं '—बस्स! तुम्ही माणूस आहां, कीं दगडाचे बनलेले आहां, भाऊजी ? "

असें म्हणून तिनें अतिशय बलपूर्वक दिवाकराला ओढून घेऊन छातीशीं घट्ट धरिलें.

नंतर क्षणभरानें ती म्हणाली, " बोट बुडाली, तर आम्ही अश्शी मरूं या. आम्ही अशींच किनाऱ्याला लागूं. लोक पहातील, बातमी वर्तमान पत्रांत येईल अन् ती तुमचे उपेनदादा वाचतील—कसं छान होईल तें–नाहीं, भाऊजी ? "

किरणनें काढलेल्या त्या चित्राच्या तिरस्करणीय कल्पनेनें दिवाकराला विलक्षण अस्वस्थ करून सोडलें. किरणमयीच्या दृढ बाहुपाशांतून त्यानें जोरानें आपली मुक्तता करून घेतली आणि मद्यप्याप्रमाणें हलत डुलत तो तेथून बाहेर गेला.

## १०

डेकवरील एका खुर्चीवर बसून दिवाकर विमनस्कपणें एकदृष्टीनें समोर पहात राहिला. हृदयांत जी प्रचंड उलधाल चालली होती, ती केवळ अस्पष्ट-पणेंच त्याला कळून येत होती. या पलीकडे तिची बुद्धिपूर्वक जाणीव होण्या-इतकी त्याच्या मेंदूला शक्तिच राहिली नव्हती !

खळवळलेल्या समुद्राच्या उद्दाम लाटा, उन्मादग्रस्त माणसाप्रमाणें बोटीच्या अंगावर प्रचंड धडाका देत होत्या; लगेच चूर्ण-विचूर्ण होऊन कोठें तरी मिसळून नाहींशा होत होत्या; पुनः धांवत येऊन, धडक देऊन, फिरून नाहींशा होत होत्या. अशा रीतीचे त्यांचे घात-प्रतिघाताचे विस्मयजनक खेळ, स्वतः-लाही विसरून दिवाकर किती वेळ तरी पहात होता.

वरती, पूर्व दिशेकडील आकाशभागीं, दिगन्ताकडून धूसर मेघ येऊन घनदाटपणें सारखे जमा होत होते आणि त्यांच्या मागे तरुण सूर्य नुसता उदय

पावला, कीं नाहीं हें वृत्त खालच्या जगाला कळविण्यापुरता देखील, किरणाच्या एकाद्या रेषेलासुद्धां मार्ग मिळत नव्हता !

ताबडतोब डेकवर खलाशांची अतिशय गडबडीनें धांवपळ सुरू झाली आणि वरती कप्तानाच्या खोलींतून घंटेचा वारंवार आवाज येऊं लागला. वादळाचा वेग उत्तरोत्तर वाढत चालला आहे आणि लवकरच त्यापेक्षांही तें अधिक वाढेल, अशी जाणीव आकाशांतील काळेकभिन्न मेघ आणि सागराच्या पर्वतप्राय लाटा, ब्रिजवरच्या कप्तानापासून तों कामिनी घरवालीपर्यंत प्रत्येक माणसाला अत्यंत स्पष्ट भाषेनें करून देत होत्या.

इतक्यांत एक खलाशी दिवाकराजवळ आला आणि म्हणाला, " बाबू, आतां इतक्यांत पावसाला सुरुवात होईल पहा. अशा वादळांत अन् पावसांत बाहेर बसून तुम्हाला भयंकर त्रास होईल. तुम्ही केबिनमध्यें जाऊन बसा. इतक्या वेळांत तिथं काय काय झालं असेल, जाऊन पहा तरी–"

दिवाकरानें उद्विग्न होऊन विचारलें, " कां—काय झालं आहे तिथं ? "

खलाशी होता चट्टग्रामचा एक मुसलमान. किंचित् हंसून दुर्बोध असा शब्दोच्चार करीत तो म्हणाला, " कांहीं झालेलं नाहीं तसं. पण बोट भयंकर डुलते आहे ना ! म्हणून म्हणतों, बाबू, जाऊन पहा बायका तिकडे काय करताहेत तें ! इतकं डुलणं सहन होणं मोठं कठीण आहे, बाबू ! "

दिवाकर उठून उभा रहातांच त्याला कळून चुकलें, कीं खलाशी म्हणतो आहे तें अगदीं खरें आहे.

तो उळमळून पडत होता. त्याला सांवरुन खलाशी म्हणाला, " चला बाबू, तुम्हाला मी केबिनपर्यंत पोंचवून येतों. "

त्याच्या मदतीनें दिवाकर कसा तरी केबिनच्या एक दारापर्यंत येऊन पोहोंचला.

दार लोटून आंत जाऊन तो पाहतो, तों किरणमयी बिछाना सोडून जवळच्या लोखंडी बाकांवर उपडी पडली असून त्याचीच एक बाजू तिनें जोरानें घट्ट पकडून ठेवली आहे, असें त्याच्या दृष्टीला पडलें.

दिवाकर जाऊन तिच्या माथ्याशीं बसला.

क्षणभरानें त्यानें मृदु स्वरानें विचारलें, " त्रास होतो आहे, वहिनी ? "

किरणमयी कांहीं बोलली नाहीं, कीं तिनें माथेंही वर केलें नाहीं. फक्त दिवाकराच्या मांडीवर आपला उजवा हात ठेवून ती निःस्तब्ध पडून राहिली.

बोट उलटी पालटी होऊं लागली. बाहेर क्रोधानें आंधळा झालेला वारा गों गों

करीत भयंकर आरोळ्या मारूं लागला आणि उंच उंच लाटांचे वरवर जोरानें फेकलेले जलकण भयंकर प्रचंड वेगानें छोट्या खिडकीच्या जाड कांचेवर वारंवार आदळून पुनः खालीं गळूं लागले.

दिवाकराचें माथें आतां गरगरूं लागलें आणि आतां बसून रहाणें अशक्य आहे, अशी खात्री होऊन त्या छोट्या अरुंद बांकावरच किरणमयीच्या माथ्याशीं माथं ठेवून भोंवळ आलेल्या माणसाप्रमाणें तो पडून राहिला.

किरणमयीनें हात पुढें करून त्याच्या माथ्याला स्पर्श केला. नंतर केंसावरून मृदुपणें तो फिरवीत ती म्हणाली, " पडून राहिलांत, भाऊजी ? डोकं गरगरतं का आहे ? "

दिवाकर म्हणाला, " हो "

किरणमयी क्षणभर गप्प राहिली. नंतर तिनें विचारलें, " बरं, काय हो भाऊजी, वादळ तर सारखं वाढतच चाललं आहे. बोट बुडणार असं वाटतं काय तुम्हाला ? "

दिवाकर उत्तरला, " नाहीं. "

किरणमयी जरा चिडीच्या स्वरानें म्हणाली, " हो-नाहीं तर नाहीं ! तुम्ही काय कोर्टाच्या पिंजऱ्यांत उभे राहून साक्ष देतां आहां, भाऊजी ? "

असें म्हणून ती बराच वेळ अगदीं निःस्तब्धपणें पडून राहिली.

दिवाकरही गप्पच होता.

बऱ्याच वेळानें किरणमयी आस्ते आस्ते म्हणाली, " बोट बुडाली तर छान होईल ! जर नाहीं बुडाली, तर अशा तऱ्हेनं आमचं किती दिवस निभाव-णार आहे ? "

दिवाकर तरीही कांहीं उत्तर देत नाहीं, असें पाहून त्याचें माथें हातानें हल-वून किरणमयी म्हणाली, " काय, ऐकूं येतं आहे ना मीं बोलतें आहें तें—"

" येतं आहे. "

" मग ? "

" जितके दिवस चालेल तितकं चालूं दे. "

" अन् पुढं ? "

" पुढं काय ? त्यानंतरही समुद्रांत पाणी असेलच. गळ्यांत बांधायला दोरीही मिळूं शकेल. कांहीं झालं तरी त्यापैकीं कांहीं तरी एक पसंत केलं म्हणजे झालं ! "

इतक्या वेळानें दिवाकराच्या तोंडून हें कठोर वाक्य ऐकून किरणमयी स्तंभि-

तच झाली. बराच वेळपर्यंत ती गप्प पडून राहिली.

नंतर ती नैसर्गिक, सहज स्वरानें म्हणाली, " नाहीं—तसं कांहीं करूं नका तुम्ही—तुम्ही आपले घरीं परत जा. तुम्ही आहां बोलून चालून पुरुष ! जाऊन तुम्हीं कांहींही सांगितलंत, तरी तुम्ही सुटाल ! अन् बराच संभव असा आहे, कीं तसं कांहीं करायची कांहीं जरुरीही लागणार नाहीं. तुमच्या आप्तमित्रमंडळी-पैकीं कुणीही यासंबंधानं नुसती हालचालही करणार नाहीं—तशी त्यांना इच्छाही होणार नाहीं ! "

दिवाकर गप्प राहिला.

किरणमयीनें केलेला प्रस्ताव कितीही लोभनीय असला, तरी त्यासंबंधानं विचार करावयालाही तो तयार नव्हता.

बराच वेळ स्तब्ध राहून त्यानें विचारलें, " अन् तुम्ही ? "

किरणमयी पूर्ववत् शांत सहज स्वरानें म्हणाली, " मी ? जिथं मी जातें आहें, तिथंच मला शेवटपर्यंत रहायला हवं. "

दिवाकरानें विचारलें, " पण रहाणार कशा तुम्ही ? आहे कोण तिथं तुमचं ?"

किरणमयी म्हणाली, " कुणी नाहीं. "

" तर मग ? "

" तरीही मला तिथंच राहिलं पाहिजे. "

दिवाकर उत्कट उत्कंठेनें ताडकन् उठून बसला आणि म्हणाला, ' थोडंसं स्पष्ट करून सांगाना, वहिनी ! तुम्ही म्हणतां तिथं आपलं कुणी नाहीं. मग तिथं तुम्ही रहाणार कशा, हें माझ्या कांहीं लक्षांत येत नाहीं. तुम्ही काय तिथं एकट्याच रहाणार आहां काय, वहिनी ? "

किरणमयी हंसली.

परंतु तिचें तें हास्य दिवाकरनें पाहिलें नाहीं. पाहिलें असतं, तर त्याचा अर्थ त्याच्या ताबडतोब लक्षांत आला असता.

कांहीं वेळ स्तब्ध राहून किरणमयी म्हणाली, " नाहीं, भाऊजी ! एकटं रहाणं मला शक्य नाहीं. माझं तें वय नाहीं. परंतु तुमच्याजवळ ही सारी चर्चा करायचं प्रयोजन नाहीं. "

असें म्हणून दिवाकराचा उजवा हात ओढून तिनें आपल्या तोंडावर ठेवला.

क्षणभरानें ती उद्विग्न, त्रस्त स्वरानें म्हणाली, " पण तुम्हाला मीं उगीचच्या उगीच भारी कष्ट दिले. त्याबद्दल तुमची मी क्षमा मागतें, भाऊजी ! "

दिवाकर पुनः अगदीं श्रान्त झालेल्या माणसाप्रमाणें पडून राहिला. सर्व गोष्टी त्याच्या कांहीं लक्षांत आल्या नाहींत. परंतु एवढें मात्र त्याला चांगलें कळून चुकलें, कीं घरीं परत फिरण्याच्या अंधाऱ्या रस्त्यावर ज्या आशेच्या दिव्याची ज्योत थोड्याच क्षणांपूर्वी आपण मूर्खाप्रमाणें उजळून धरली होती, ती पुनः मालवून टाकावयाची वेळ आतां आली आहे !

दिवा विझला खरा; परंतु त्याची दुर्गंधमय वाफ दिवाकराच्या काळजाच्या अन्तर्भागीं एकदम पसरून तें विलक्षण भाराक्रान्त होऊन राहिलें होतें. त्याचा श्वासोच्छ्वास कोणीं अवरोधून धरल्यामुळें त्याला वेदना होऊं लागल्या.

तीव्र स्वरानें त्यानें विचारलें, " तुम्हीं काय तमाशा चालवला होता काय इतका वेळ ? "

ज्याच्या तोंडून शब्द फुटण्याचीही मारामारी, अशा लज्जा–नम्र दिवाकरानें अकस्मात् धारण केलेली ही उग्रता पाहून किरणमयी एकदम चमकली.

तिनें विचारलें, " कसला तमाशा, भाऊजी ? "

" आमच्या घरीं परत जायची गोष्ट ! या उपहासाची तिळमात्र तरी जरूर होती काय ? "

किरणमयी म्हणाली, " थट्टा- उपहास तर मीं कांहीं दिखील केला नाहीं. "

" तर मग काय तें खरं ? "

" खरं, तर दुसरं काय, भाऊजी ? "

" तुम्ही एकट्याच तिथं रहाणार, हें दिखील अगदीं खरं काय ? "

" होय, तेंही खरं. "

" ओः ! म्हणूनच वाटतं तुम्ही आराकानला जातां आहां ? परंतु कुणापाशीं कशा रीतीनं तुम्ही रहाणार आहां तें तरी सांगाल ? "

उत्तरादाखल किरणमयीनें केवळ एक मोठा उसासा सोडला ! आपलें हें पलायन दिवाकराच्या बाबतींत किती भयंकर ठरेल, त्याचे परिणाम किती लज्जास्पद होतील, हें सर्व तिला पूर्णपणें ठाऊक होतें. आणि या दारुण संकटाच्या अवस्थेंत पडल्यामुळें त्याचें मन किती विव्हल होऊन गेलें आहे, याची देखील किरणमयीला कल्पना नव्हती असें नाहीं.

दिवाकरवर तिचें प्रेम नव्हतें आणि त्याच्यावर प्रेम करणेंही तिला अशक्य होतें. तरीसुद्धां आश्चर्याची गोष्ट अशी, कीं त्याच्याही संपूर्ण उदासीनतेमुळें किरण-मयीला मनांतल्या मनांत इतका वेळ अतिशय यातनाच होत होत्या !

परंतु ज्या क्षणीं दिवाकरानें आपल्या रुक्ष स्वरानें आणि अत्यंत तीव्र प्रश्नानें आपल्या अन्तःकरणांतील मत्सराची ज्वाला संपूर्णपणें प्रकट केली, त्याच क्षणीं किरणमयीच्या अन्तर्यामींच्या गुप्त वेदना थांबून तेथें हर्षाच्या लाटा उसळल्या !

या आनंदाला आणखींही एक मोठें कारण होतें. यापूर्वी जेव्हां हा कच्च्या बुद्धीचा तरुण आपल्या नवयौवनाच्या सौंदर्याच्या तृष्णेमुळें या आश्चर्यमय तरुणीच्या अलौकिक सौंदर्याकडे तिळातिळानें आकृष्ट होत होता, त्या वेळींही हें किरणमयीच्या लक्षांत येऊनही तिनें त्याच्याकडे पाहिलें नाहीं. वस्तुस्थितीचें ज्ञान असूनही तिनें त्याकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं. कोणत्या रीतीनें मधाचें पोळें तयार होत आहे, त्यांतील मध कोणत्या ठिकाणीं सांठवला जात आहे, याकडे अतिशय तुच्छतेच्या बुद्धीनें तिनें दृष्टीक्षेपही केला नाहीं. परंतु आज तीव्र खोंच पडून जेव्हां मध गळून जाऊं लागला, त्या वेळीं, या हद्दपारींत जो माणुस तिच्या अवलंबनाचें एकमात्र आश्रयस्थान, त्याच्याच पोळ्यांतील अतिशय कष्टप्रयत्नांनीं सांठविलेल्या मधाच्या भांडाराकडे किरणमयी आपली नजर आतां अतिशय सावधपणानें लावून राहिली.

हंसत हंसत ती म्हणाली, "कुणापाशीं मी कशी रहाणार आहें, हें ऐकून तुम्हाला काय फायदा, भाऊजी ? ज्याअर्थी तुम्ही घरीं परत जाणार आहां, त्याअर्थी या अनावश्यक कुतूहलांत कांहीं अर्थ नाहीं !"

दिवाकर कांहीं वेळ निःस्तब्ध राहिला.

नंतर तो म्हणाला, "मी घरीं परत जाणार आहें, हे शब्द एकवारही माझ्या तोंडून निघालेले नाहींत; तुमच्याच तोंडून निघालेली गोष्ट आहे ही ! माझ्या नव्हे."

किरणमयी म्हणाली, "खरं आहे. परंतु तुमच्या मनांतली गोष्टच माझ्या तोंडून बाहेर पडली ही !"

असें म्हणून, दिवाकर आपल्या या बोलण्याचा तीव्र प्रतिवाद करील या आशेनें ती वाट पहात राहिली.

परंतु प्रतिवाद झाला नाहीं !

विचार करावयाला दिवाकराला वेळ देण्याइतका धीर तिनें धरला. पुष्कळ वेळ अशा रीतीनें शांततेंत निघून गेला. बाहेर वादळाच्या आणि वृष्टीच्या अविराम हच्यामुळें बोटीचें अंतर्बाह्यांग एकसारखें भयंकर कांपत होतें; खला-

शांचा अस्पष्ट कोलाहल मधून मधून चांगला स्पष्टपणें ऐकूं येऊन एकंदर प्रलयध्वनींत विलक्षण भर पडत होती !

किरणमयीच्या धैर्याचा बांधही फुटण्याचा प्रसंग उपस्थित झाला. परंतु या क्षुद्र लांकडी घरट्यांतील निःस्तब्धता जशीच्या तशी कायमच राहिली.

दिवाकर आपल्या बोलण्याचा प्रतिवाद करणार नाहीं, याविषयीं जेव्हां किरणमयीला तिळप्राय संदेह राहिला नाहीं, त्या वेळीं एक मोठा उसासा टाकून ती हळूहळू म्हणाली, " तर मग काय तुम्हीं परत जायचं निश्चित ठरविलंत ? "

दिवाकर म्हणाला, " नाहीं. "

किरणमयीनें मग त्याला अधिक कांहीं विचारलें नाहीं.

## ११

त्या रात्रींच वादळ आणि पाऊस दोन्हीं बरींच ओसरलीं. दिवसभर अविश्रान्तपणें भयंकर दंगा केल्यानंतर उन्मत्त सागर पहांटेच्या सुमाराला शान्त होऊं लागला. परंतु वरचें आकाश मात्र प्रसन्न झालें नाहीं—चेहरा भाराक्रान्त करून तें तसेंच राहिलें !

सकाळीं क्षणभर सूर्योदय झाल्यासारखें दिसलें खरें; परंतु सूर्यनारायण त्या बोटींतील भयव्याकुल, मृतप्राय उतारू मंडळीचें खरोखर सांत्वन करून गेला, कीं डोळे लालबुंद करून रागानें अन्तर्धान पावला, हें निश्चितपणें कोणालाच कळलें नाहीं !

अशा वेळीं दिवाकर केबिनमधून बाहेर आला आणि किंतीनाच्या एका आरामखुर्चीवर हातपाय लांबवून पडला. कोण जाणे कां तें, परंतु आत्मग्लानीचा तुषानल आज त्याला पूर्वीप्रमाणें दधग्ही करीत नव्हता ! लज्जेचा समुद्रही आज त्याला पोहून जावयाला कठीण असा वाटत नव्हता ! कुठें तरी निळ्या झाड-पाल्यानें घेरलेला अस्पष्ट किनारा त्याला दिसूं लागला होता.

याप्रमाणे हृदयावरचा असह्य भार जेव्हां बराच हलका होत आला, तेव्हां बसून स्थिर होऊन दिवाकर पुनः एकवार किरणमयीच्या तर्कयुक्तीवर स्वतःच्या प्रवृत्तीचा निकष घांसून पहावयाला प्रवृत्त झाला.

काल रात्रीं बोलतांना किरणमयी असें म्हणाली होती, कीं " कोणालाही त्याच्या न्याय्य अधिकारापासून जेव्हां आपण दूर करतों, तेव्हांच आपण

खरोखर अन्याय करतों, असं म्हणतां येईल. म्हणून कोणाच्याही खऱ्याखुऱ्या अधिकारावर आपण हात टाकतों आहों कीं काय, हें, कोणत्याही कार्याला प्रवृत्त होण्यापूर्वी माणसानं अवश्य पहाणें जरूर आहे. पुन्हां बाहेरच्या बाजूनं जसा हा अधिकार असतो, तसाच आंतल्या बाजूनंही असतो. स्वतःवरही स्वतःचा एक प्रकारचा खराखुरा अधिकार असतोच! स्वतःचा म्हणून तो कोणापेक्षांही तुच्छ नाहीं! त्या अधिकारावरही बाहेरच्या कोणाचा हस्तक्षेप झालेला सहन करणं म्हणजे स्वतःवर अन्याय करण्यासारखंच आहे, असं माझं अगदीं स्पष्ट मत आहे!"

क्षणभर गप्प राहून ती आणखींही म्हणाली होती, "आम्ही चोरी, डाकू-गिरी वगैरे करून ज्याप्रमाणं दुसऱ्याच्या अधिकारांत हात घालून अन्याय करतों, त्याप्रमाणंच दारुड्याला पैसे देऊनही आपण तसाच अन्याय करतों, कारण, या ठिकाणीं, चांगलं, सुस्थ रहाण्याच्या त्याच्या अधिकारांत आपण हस्तक्षेप करतों."

कांहीं न बोलतां दिवाकर आपलें भाषण ऐकत आहे, असें पाहून किरण-मयी पुढें म्हणाली होती, "आतां जरी समाजाचा हा अधिकार अत्यन्त व्यापक आहे अन् याची मर्यादेची रेषा कुठं आहे, कुठं पाय दिला असतां अनधिकार प्रवेश होणार नाहीं, यासंबंधानं जगांत अनेक द्वंद्वं, अनेक मतभेद असले, तरी मर्यादा ही कुठं तरी आहेच आहे, याविषयीं कुणालाही संदेह नाहीं. या सीमारेखेच्या पलीकडे जायचं सामर्थ्य कुणालाही नाहीं—समाजालाही नाहीं. या मर्यादेचं अतिक्रमण करून, समाज इतरांनाच नष्ट करतो असं नाहीं—तर स्वतःलाही दुर्बल करतो. स्वतःचा विध्वंस करतो! मला घराच्या बाहेर काढून आणल्यामुळं कुणाच्या खऱ्याखुऱ्या अधिकारावर तुम्हीं पाय दिला आहे कीं काय, हें जर तुम्हीं मनाशीं नीट विचार करून पाहिलं असतंत, तर मन इतकं अप्रसन्न अन् भाराक्रान्त करून रहायचं तुम्हाला प्रयोजनच नव्हतं, भाऊजी! मी आहें विधवा—माझे पति नाहींत. माझ्यावर कुणाचा न्यायसंगत अधिकार नाहीं. तुमचंही लग्न झालेलं नाहीं. तुमच्या हृदयावरही कुणाचा अधिकार नाहीं. म्हणून, माझ्यावर प्रेम करण्यांत तुम्ही कांहीं अन्याय्य कृत्य केलेलं नाहीं, ही गोष्ट कुणालाही सहज कळण्यासारखी आहे."

बिचारा दिवाकर हतबुद्धच झाला! तिचें भाषण त्याला निर्दोष वाटेना आणि खोडतांही येईना, त्यामुळें तो गोंधळांत पडला.

तो म्हणाला होता, " असं कसं, वहिनी ? अनैतिक प्रेम हें जर अन्याय्य नाहीं, तर जगांत दुसरा अन्याय तरी कोणता आहे ? "

किरणमयी म्हणाली होती, " पण अनैतिकपणा आला कुठून ? जें अनैतिक असं तुम्हाला वाटतं आहे, तो केवळ तुमचा संस्कार आहे. शास्त्रशुद्ध युक्तिवाद नव्हे. बरं, तुमची ही ' अनैतिक ' वस्तु तरी काय आहे, सांगा बरं ? "

दिवाकरानें क्षुब्ध होऊन जबाब दिला होता, " जें विवाहाच्या मार्गानं सुपवित्र झालं नाहीं, ज्याचा समाज स्वीकार करीत नाहीं, ज्याकडे आप्तमित्र, बंधुबांधव तिरस्काराच्या दृष्टीनं पहातील, तें अनैतिक–ही तर सरळ आहे गोष्ट ! "

किरणमयी हंसून म्हणाली होती, " कुठं आहे सरळ ? थोडासा जर विचार केला, तर सरळ गोष्टही इतकी वांकडी होऊन रहाते कीं, दुनयेंतल्या अनेक वांकड्या वस्तूंना तिच्यापुढं हार मानावी लागते ! तुम्हाला तर मीं कितीतरी वेळ सांगितलं आहे, भाऊजी, कीं तुमचं हें सुपवित्र अपवित्र ज्ञान हा नुसता संस्कार आहे—युक्ति नव्हे. या जगांत स्त्री-पुरुषांचीं अशीं अनेक मीलनं होऊन गेलीं आहेत, कीं त्यांना कांहीं झालं तरी पवित्र म्हणतां येणार नाहीं. मी उदाहरणं देऊन आणखीं बोलणं वाढवीत नाहीं, भाऊजी ! तुम्हाला इच्छा असली, तर तुम्ही इतिहास अन् पुराणं वाचा. अन् या सर्व मीलनांचा समाजानं स्वीकार केला आहे अन् शेवटीं विवाहाच्या मंत्रानंही त्यांना सुपवित्र करून घेतलं आहे. भाऊजी, आमच्या पाथुरेघाटाच्या घराजवळ जर कण्व-मुनींचा आश्रम असता, तर शकुन्तलेनं जें प्रकरण घडवून आणलं, त्यामुळं केवळ मुनिमहाराजांच्याच जातकुळाला नव्हे,–तर सगळ्या पाथुरेघाटाच्या लोकांना वाळींत पडावं लागलं असतं ! काय हो, भाऊजी ! ती प्रेम–कहाणी वाचतांना तर कोणत्याही सतीसाध्वीचा चेहरामोहरा शरमेनं लालबुंद पडत नाहीं ? "

दिवाकर अत्यंत अस्वस्थ झाला.

किरणमयी किंचित् स्मित करून लगेच म्हणाली होती, " नाहीं नाहीं—इतकं गडबडून जायचं कारण नाहीं तुम्हाला, भाऊजी ! सती साध्वी स्त्रियांवर कांहीं आरोप करण्याचा माझा बिलकुल हेतु नाहीं किंवा भूतकाल अन् वर्तमानकाल यांची मला तुलनाही करायची नाहीं. वर्तमानकालाला वर्तमानकालच होऊन राहूं दे अन् ती मंडळी जिथं जी असतील, तिथं ती सुस्थितींत राहो बिचारी ! माझी त्याला कसलीही हरकत नाहीं. परंतु त्या जुन्या काळच्या

शकुन्तलेला आधुनिक काळची कुणीही स्त्री-पुरुष मंडळी मनांतल्यामनांत नांवं ठेवून तिचा तिरस्कार कसा करीत नाहींत, हेंच मोठं विचित्र वाटतं!"

किरणमयी किंचित् थांबून नंतर म्हणाली होती, "तिरस्कार कां करूं शकत नाहींत, माहीत आहे तुम्हाला, भाऊजी? तिरस्कार ती मंडळी करीत नाहींत, याचं कारण एवढंच, कीं तिचं मीलन कसंही झालेलं असो, परंतु मीलनाचा आदर्श तिनं अखेरपर्यंत निर्मळ ठेवला होता. ज्या बंधनांत एका क्षणांत तिनं स्वतःला अगदीं चिरकालचं कायम बांधून घेतलं, तें बंधन पक्कं नाहीं, असा तिनं मनांत कसलाही संशय घेतला नाहीं किंवा त्याबद्दल संकोचही मानला नाहीं. तसा संशय किंवा संकोच जर शकुंतलेनं बाळगला असता, तर कालिदासानं कितीही कौशल्यानं अन् कितीही माधुर्य ओतून आपलं नाटक लिहिलं असतं, तरी कोणत्याही माणसाचं हृदय अशा रीतीनं त्याला ओढून घेतां आलं नसतं! अस्सल गोष्ट कोणत्या ठिकाणीं आहे, हें नीट विचार करून एकवार पहा बरं भाऊजी!"

दिवाकराला तिच्या भाषणापैकीं एक शब्दही रुचला नाहीं.

तो अगदीं असहिष्णुतेनें म्हणाला, "आदर्श वाटेल तो असो, आजकालचा समाज त्याचा स्वीकार करणार नाहीं अन् समाज ज्याचा स्वीकार करणार नाहीं, तं नैतिक असो वा अनैतिक असो, त्यामुळं समाजावर आघात केल्यासारखंच होणार आहे. समाजांत राहून समाजावर आघात करणं अन् आत्महत्या करणं या दोन्ही गोष्टी एकच!"

किरणमयी यावर म्हणाली होती, "भाऊजी, समाजावर आघात करणं अन् समाजाच्या अविचारावर आघात करणं या दोन गोष्टी एक नाहींत! तुम्हाला पूर्वी तर मीं सांगितलंच, कीं सर्व वस्तूंना खरोखरचा एक अधिकार असतो. समाज उद्धत होऊन आपल्या खरोखरच्या सीमेचं जेव्हां उल्लंघन करतो, त्या वेळीं त्याच्यावर आघात करणंच योग्य असतं. त्या आघातानं समाज मरत नाहीं. त्याला उलट चैतन्य येतं, त्याचा मोह नाहींसा होतो. विद्या संपादन करण्याकरतां असो, देशाकरतां असो, विलायतेला जाणं समाज कबूल करीत नव्हता. त्यासाठीं त्याला वारंवार फटके खावे लागले. तरी पण एवढी त्याची कठिण प्रतिज्ञा, कीं आजही त्यानं अहंकार सोडून दिलेला नाहीं. यांत समाजाची उत्तम विवेचकशक्ति आढळून येते, अशी तुम्ही प्रशंसा करतां काय, भाऊजी?"

दिवाकर म्हणाला होता, “ नाहीं–करीत नाहीं–चांगली असं मानायला कांहीं कारण नाहीं म्हणून.”

किरणमयी म्हणाली होती, “ बरोबर–असंच. परंतु हें निःसंशय स्पष्ट उत्तर तुम्हाला मिळालं कुठं? स्वतःच्या बुद्धिविवेचकशक्तिकडूनच ना? समाजा-जवळून तर नाहीं?”

या प्रश्नानें दिवाकर अतिशय क्षुब्ध झाला होता.

उत्तेजित स्वरानें तो म्हणाला होता, “ परंतु एकूण एक कामांत सगळेचजण जर आपली बुद्धि चालवायला जातील, तर समाज टिकणंच मुळीं शक्य नाहीं ! ”

यावर किरणमयी म्हणाली होती, “ मी तर आतांपर्यंत तुम्हाला ही गोष्ट सांगायचाच प्रयत्न करीत होतें. सर्व कामांत स्वतःचीच बुद्धि चालवायला गेल्यामुळं जसा समाज टिकणार नाहीं, त्याप्रमाणंच समाजही जर सगळ्या गोष्टींत अन् सर्वकाळीं आपलंच मत चालवायला गेला, तर मनुष्यही टिकणार नाहीं. माणुस तेवढा चूक-भूल करतो, अन्याय करतो, अन् समाज करीत नाहीं, असं थोडंच आहे, भाऊजी ! दोघांचीही मर्यादा ठरलेली आहे. मूर्खपणामुळं असो, प्रवृत्तीच्या लहरीमुळं असो, अन्यायी हट्टामुळं असो, किंवा इतर कोण-त्याही प्रकारामुळं असो, त्या मर्यादेचं उल्लंघन झालं, कीं अमंगल ठेवलेलं ! तें अमंगल टाळूं शकेल, असं तुमच्या देवाला दिखील सामर्थ्य नाहीं ! ”

किरणमयीच्या या मुद्द्याला कांहीं उत्तर न देतां दिवाकर गप्प बसून राहिला होता.

किरणमयीही चार दोन क्षण गप्प राहून मग म्हणाली होती, “ अन् गम्मत अशी, कीं ही सीमा कोणत्याही समाजांत चिरकाल एकाच ठिकाणीं रहात नाहीं. आवश्यकतेप्रमाणं ती इकडे तिकडे सरकून फिरत असते. ”

दिवाकरनें यावर तिला प्रश्न केला होता, “ कोण सरकवतं तिला ? ”

किरणमयी म्हणाली होती, “ कुणी सरकवीत नाहीं. ज्या नियमानं विश्वब्रह्मांड फिरतं, त्याच नियमानं हीही आपोआपच सरकते ! जेव्हां कुणी समाजावर आघात करतो, त्याचवेळीं, ती सरकली आहे कीं नाहीं, हें कळून येतं. ”

इतका वेळपर्यंत, किरणमयीचा सर्व युक्तिवाद उभयतांच्या पलायनाला अनुकूल आहे, या दृष्टीनें दिवाकर त्याकडे पहात असल्यामुळें तो मनांत अत्यंत अस्वस्थच झाला होता. एक तर, हें कार्य पराकाष्ठेचें निंद्य असल्याबद्दल त्याच्या

मनांत यत्किंचित्‌ही संशय नव्हता आणि सर्वच दोष सविनयपणें आपल्या मस्तकावर घ्यावयाला तो स्वतःच्या मनाची तयारी करीत होता. परंतु जेव्हां त्याला स्पष्टपणें कळून आलें, कीं ही गर्विष्ठ स्त्री इतक्या मोठ्या, प्रचंड अपराधाची अपराध म्हणून गणना करावयालाच तयार नाहीं; उलट, समाजालाच ती दोषी ठरवूं पहात आहे, तेव्हां तो सर्वच प्रकार त्याला अगदीं असह्य वाटूं लागला. पण त्यासंबंधानें कडकपणें बोलणें ही गोष्टही त्याला जवळ जवळ अशक्यच होती !

म्हणून दिवाकर थोडीशी उपहासाची फोडणी देऊन म्हणाला होता, " उदाहरणार्थ, आपण ज्याप्रमाणं समाजावर आघात केला आहे तसा ! आतां समाजाचा कितीसा अभिमान अन् कितीसा मोह गळून जातो, तें आपणाला दिसेलच. काय वाटतं तुम्हाला, वहिनी ? "

दोन्ही कोंपरांवर भार देऊन, आपली देहलता थोडीशी उंचावून दिवाकराकडे एकदृष्टीनें पहात किरणमयी म्हणाली होती, " पण आपण आघात केलाच कुठं मुळीं, भाऊजी ? भयानं पळून जाणं अन् धिटाईनं उभं राहून आघात करणं काय एकच, म्हणून यानं समाजाच्या अहंकाराचा चुरा होईल ? उलट, यामुळं त्याचा गर्व वाढेल मात्र ! पण काय हो भाऊजी, तुम्ही बी. ए. पर्यंत शिकलां आहां ना ? "

असें विचारून माथ्यापर्यंत चादर ओढून ती स्वस्थ पडून राहिली होती.

बाहेर बऱ्याच कमी झालेल्या वादळाच्या दबलेल्या आक्रोशाचा भेद करून वरती बोटीच्या घंटेचे बारा टोले पडले, ते आतां चांगले ऐकूं आले.

डेकवरच्या एका खूर्चीवर दिवाकर उद्विग्नतेनें दीर्घ उसासे टाकीत निःस्तब्ध-पणें पडून राहिला होता.

इतक्यांत आर्द्र कंठाची हांक त्याला ऐकूं आली, " भाऊजी ! "

दिवाकर चमकून उठला. गडबडीनें त्यानें साद दिली, " काय, वहिनी ? "

किरणमयी म्हणाली, " तुम्ही परतच जा. "

दिवाकर दृढ स्वरानें म्हणाला, " कांहीं झालं तरी नाहीं. "

किरणमयी म्हणाली, " नाहीं कां पण ? अजाणतां तुमच्या हातून अपराध घडला. तें कळून आल्यावर दिखील त्याचा कांही प्रतिकार न करतां पापाचा बोजा माथ्यावर घेऊन तुम्हीं हिंडावं, याचं प्रयोजन काय, तें माझ्या लक्षांत येत नाहीं, भाऊजी ! "

दिवाकर म्हणाला, “ तुमच्या नाहीं लक्षांत येत, पण माझ्या येतं. शिवाय, मी परत गेलों समजा, तर त्यामुळं काय पापाचा बोजा माथ्यावरून उतरणार आहे थोडाच ? ”

किरणमयी म्हणाली, “ आजच उतरेल, असं मी म्हणत नाहीं. पण दोन दिवसांनीं तरी उतरेल खास ! ”

दिवाकरानें मृदु स्वरानें विचारलें, “ परंतु मी जाऊं कुठं ? ”

किरणमयी म्हणाली, “ कां बरं ? तुमच्या घरीं तुमचीं इतकीं निकटचीं माणसं आहेत त्यांच्याकडे ! तुमच्या उपेनदादाकडे. हीं सर्व माणसं तुमचींच आहेत कीं ! ”

दिवाकर कांहीं वेळ गप्प राहिला. त्याच्या मनांत विचारांचा कल्लोल चालला असावा !

चार दोन क्षणांनीं तो म्हणाला, “ जें कांहीं माझं आहे असं तुम्ही म्हणतां, वहिनी, तें माझं नाहीं, हें तुम्हाला चांगलं माहीत आहे. आहे एक काय तो उपेनदादा ! पण त्याला तुम्हीं काय अजून ओळखलं नाहीं ? त्याच्याकडे परत जा, असं मला तुम्ही सांगतां, वहिनी ? ”

“ होय. त्यांच्याकडेच तुम्ही परत जा असं मी तुम्हाला सांगतें. ”

दिवाकर थोडा गप्प बसला. नंतर तो हळुहळू म्हणाला, “ माझी कल्पना होती, कीं उपेनदादाला तुम्हीं ओळखलं आहे. परंतु ओळखलं नाहींत ! मीं देखील त्याला ओळखलं आहे असं नाहीं. कदाचित् त्याला चांगलं ओळखणं शक्यही नसेल ! परंतु मी लहानपणापासून उपेनदादाच्याच नजरेखालीं वाढलों असल्यामुळं, मला एवढं मात्र पक्कं कळतं आहे, कीं यानंतर त्याच्यापुढं जाऊन उभं रहाण्यापेक्षां आगींत उडी टाकणं मला सोपं आहे ! ”

त्याच्या या भाषणानें किरणमयी थक्कच झाली !

दिवाकराच्या चेहऱ्याकडे नजर लावून ती म्हणाली, “ कां बरं ? ते काय इतके कठोर, इतके निष्ठुर आहेत ? अपराध कांहीं तुमचा नव्हता, ही गोष्ट त्यांना नीट समजावून सांगितल्यावरही तुम्हाला ते शिक्षाच करतील ? हें बिलकुल शक्य दिसत नाहीं, भाऊजी ! ”

किरणमयीच्या भाषणांत–किंबहुना एकंदर प्रकृतींतच उत्पन्न झालेला उत्साह दिवाकराच्या लक्षांतच आला नाहीं. भिंतीवर जो दिवा तेवत होता, त्याकडे नजर लावून, एकाद्या अन्यमनस्क माणसाप्रमाणें तो

आस्ते आस्ते बोलूं लागला, " उपेनदादाला कोणतीही गोष्ट समजावून सांगावी लागत नाहीं. कसं कोण जाणे, परंतु त्याला आपोआप सर्व कांहीं कळून येतं. माझा कांहीं अपराध नाहीं, असं तुमच्याप्रमाणं मला वाटत नाहीं. परंतु जर तुम्ही म्हणतां तें खरं असलं, जर खरोखरच मी निर्दोष असलों, तर ज्या दिवशीं मी त्याच्यासमोर जाऊन उभा राहीन, त्याच दिवशीं त्याला तसं नक्की कळून येईल. पण मी त्याच्या समोर उभाच राहूं शकणार नाहीं. तुम्ही शिक्षेची गोष्ट बोललां. परंतु उपेनदादा मला कोणती शिक्षा देईल, हें मला कसं कळणार, वहिनी ? कारण, आजपर्यंत एक दिवसही त्यानं कधीं मला शिक्षा केली नाहीं. "

शेवटीं शेवटीं दिवाकराचा गळा दाटून येऊन त्याच्या तोंडून शब्द फुटेना ! दोन्ही हातांचे तळवे डोळ्यांवर चापून धरून तो गप्प बसून राहिला.

किरणमयीही कांहीं बोलली नाहीं. दोन्ही डोळे विस्फारित करून ती दिवाकराच्या चेहऱ्याकडे पहात राहिली. तिच्या अंतर्यामीं जी प्रचंड खळबळ उठली होती, ती केवळ अंतर्यामी परमेश्वरालाच ठाऊक होती.

चार दोन क्षणांनीं आपला आवेग आवरून दिवाकरच आस्ते आस्ते बोलूं लागला.

अतिशय वेदनापूर्ण वाणीनें तो म्हणाला, " काल तुम्ही म्हणालां, वहिनी, कीं उपेनदादाचं माथं आपण खालीं वांकवूं ! रात्रीं तुमचं काय काय भाषण झालं, कोणत्या कसल्या रागामुळं तुम्ही असं म्हणालां, तें अजूनही माझ्या ध्यानांत येत नाहीं. तुमचा त्यांत कदाचित् कांहीं हेतु असेलही. तें तुमचं कारण कांहीही असो, परंतु तें मस्तक खालीं वांकवतांना किती प्रचंड दुःख होईल, याची जर तुम्हाला कल्पना असती, तर असे शब्द तुम्हीं तोंडानं उच्चारलेच नसते ! शिवाय, असलीं सर्व मस्तकं जर खालीं वांकलीच, तर कोणाकडे पाहून आपण आपलीं माथीं ताठ्यानं वर करूं, तें सांगा. वहिनी, तो प्रयत्न तुम्ही करूं नका. जोंपर्यंत स्वतः होऊन उपेनदादा तो खालीं वांकून आपणाकडे पहाणार नाहीं, तोंपर्यंत त्याचं माथं खालीं वांकवायचं सामर्थ्य जगांत कुणालाही नाहीं, हें तुम्ही पक्कं समजा, वहिनी ! मी जें हें सांगतों तें सत्य समजून त्यावर तुम्ही खुशाल विश्वास ठेवा. "

रात्र बरीच झाली होती. त्या शांत प्रसंगीं या दोन समोरासमोरच्या विपरीत प्रकृति, उपेन्द्राविषयींच्या श्रद्धा-भक्ति-प्रेम या भावनांच्या तटाशीं एकाएकीं

एकाच काळीं येऊन मिसळल्या आणि एकजीव झाल्या! त्या ठिकाणीं त्या वेळीं बोलण्यापेक्षां ऐकण्याची, समजावून देण्यापेक्षां समजून घेण्याची आकांक्षाच अतिशय प्रबल होऊन राहिली होती!

सकाळींच बिछाना सोडून दिवाकर बाहेर कधीं गेला, तें गाढ झोंपलेल्या किरणमयीच्या ध्यानांतही आलें नाहीं. त्यामुळें झोपेंतून जागी होतांच ती दिवाकरासंबंधीं मोठ्या काळजींत पडली.

काल रात्रींच्या संभाषणांत किरणमयीला पुष्कळच गोष्टी कळून आल्या होत्या. दिवाकर खरोखरच किती निःसहाय होता आणि आपल्या उपेनदादापासून दुरावणं ही त्याच्या बाबतींत केवढी दारुण मर्मान्तिक दुर्घटना होती, हें अगदीं निःसंदेह रीतीनें ध्यानांत आल्यापासून तिच्या स्त्रीहृदयाच्या गुप्त अन्तर्भागीं किरणमयीला तिळभर देखील स्वस्थता लाभत नव्हती. या सरल, नम्र, सत्यवादी, सच्चरित्र तरुणाला त्याच्या जीवनाच्या प्रारंभींच, विनाकारण स्थानभ्रष्ट करण्याचा जो अपराध तिच्या हातून झाला होता, त्यामुळें झोंपेत देखील तिला अतिशय यातना होत होत्या.

यामुळें, झोंप उडतांच, अवर्णनीय वेदनायुक्त अभिनव स्नेहभावनेनें, त्या निरपराध हतभागी तरुणाकडे किरणमयीनें मोठ्या उत्सुकतेनें तोंड फिरविलें.

पण दिवाकर तेथें नव्हता!

चटकन् तशीच ती उठली आणि बाहेर आली. चहुंकडे तिनें शोधक नजरेनं पाहिलें. परंतु दिवाकर तिला कोठेंही आढळला नाहीं.

आपल्या 'बॉय'ला हांक मारून बोलावून तिनें दिवाकरचा शोध करावयाला त्याला सांगितलें. परंतु त्यालाही तो कोठें आढळला नाहीं!

तेव्हांपासून किरणमयी अतिशय उत्कंठेनें दिवाकराची वाट पहात होती. परंतु आज त्या उत्कंठेमध्येंही दूर अन्तरावरून येणाऱ्या सुगंधाप्रमाणें एकप्रकारच्या आनंदाच्या आभासाचा अनुभव येऊन तिचें हृदय अगदीं पुलकित होऊन गेलें होतें.

हा अत्यंत तुच्छ, क्षुद्र दिवाकर! त्याच्यावर आपण कधीं एक क्षणही प्रेम केलें नाहीं, पुढें कधींही त्याच्यावर आपलें प्रेम जडणें शक्य नाहीं; बुद्धीच्या दुर्विचारामुळें त्याच्याशींच आपणाला घरसंसार करावा लागणार असून, प्रेमाचा अभिनयही करावा लागणार आहे! बोटीवर चढेपर्यंत याविषयीं ती स्वतःचाच धिक्कार करीत होती—त्यामुळें आंतल्याआंत ती जणूं पागल बनत चालली होती!

पुनः या प्रकरणाचा येथेंच शेवट होणार होता, असेंही नाहीं. या दिखाऊ प्रेमाची ओढाओढ एक दिवस तुटणारच तुटणार, ही खोटी प्रणयलीला कांहीं केलें तरी एक दिवस तिरस्कारणीय वाटल्याशिवाय रहाणार नाहीं, हा धडा डॉक्टर अनंगमोहननें तिला उत्तम तऱ्हेनें शिकविला होता. त्या दुष्ट दिवशीं ज्या प्राणान्तक तिरस्काराचा फांस आपल्या गळ्याभोंवतीं घट्ट बसेल, त्याची जबर-दस्त बळकट दोरी कोणत्या शस्त्रानें आपणाला कापून टाकतां येईल, या भयंकर चिंतेचा अन्त तिला कोठेंच दिसेना!

परंतु कालच्या उत्तर रात्रीं, उपेन्द्राच्या राजसिंहासनाच्या तळाशीं बसून उभयतांमधील तहनाम्यावर सह्या झाल्या असल्यामुळें, झोंपेंतून जाग येतांच, त्या गरीब बिचाऱ्या तरुणासाठीं करुणेच्या व्यथेनें किरणमयीला एका बाजूनें जसा त्रास होऊं लागला, तसाच दुसऱ्या बाजूनें अवश्यमेव उत्पन्न होणाऱ्या तिरस्काराच्या भयजनक दृश्यापासून मुक्त झाल्याचा अत्यानंदही तिला होत होता!

केबिनमध्यें एकटीच बसून, सुटकेचा निःश्वास टाकून किरणमयी स्वतःशीं वारंवार एकच वाक्य उच्चारूं लागली—'मला आतां भय नाहीं—मला आतां कसलंही भय नाहीं!'

तिला वाटूं लागलें, ज्यावर आपण प्रेम करूं शकत नाहीं, त्याला निदान स्नेह अर्पण करून त्याच्या मनावरचा भार पुष्कळसा आपण हलका करूं. तरीसुद्धां एक प्रकारची भीति तिच्या मनांत वारंवार डोकावूं लागली, ज्वालेचें प्रलोभन आवरतां न आल्यामुळें एके दिवशीं दिवाकर पतंगाप्रमाणें जळून मरावयाला अतिशय आतुर होऊन जाईल! आपल्या सौंदर्याच्या आकर्षणाची केवढी अनिवार शक्ति आहे, हें किरणमयीला उत्तम माहीत होतें!

आपल्या स्वर्गस्थ पतीची तिला आतां आठवण झाली. तो शुष्क, कठोर, विद्येचा मूर्तिमान् अभिमान! विज्ञानाचें बळकट कुंपण सभोंवतीं उभारून डोळ्यांत तेल घालून रात्रंदिवस जे आपल्या स्वातंत्र्याचें रक्षण अतिशय सावध-पणें करीत होते, तें आपले पतिराज!

त्यांच्या जवळ तर आपणाला कधीं एक दिवसही जातां आलें नाहीं; तरी सुद्धां आपले दिवस हे गेलेच! लिहिणें वाचणें करून, स्वयंपाक रांधून, सासूची कडूजहर बोलणीं खाऊन, घरच्या सगळ्या कामांचे लबेदे उपसून दिवस कसा तरी जात असे. रात्रीं परकालाविरुद्ध, आत्म्याच्याविरुद्ध लढाई करून, तक्रारी फिर्यादी करून, निंदा करून, उपहास व्यंग करून, खोलीच्या भिंतीपर्यंत सर्व

कांहीं दूषित, विषमय करून टाकून, भयंकर श्रमून दमून गेल्यावर आपणाला कधीं तरी झोंप लागे; पुनः दिवस उगवे, मावळे, पुनः रात्र येई. अशा रीतीनें महिन्यामागून महिने, वर्षामागून वर्षे निघून गेलीं. ' भिक्षा वाढा हो, माई!' अशी करुणवाणी उच्चारीत आपल्या घरीं कधीं भिकारी आला नाहीं; ' कसं काय आहे ? ' असं विचारून शेजाऱ्यांनीं आपला कधीं समाचार घेतला नाहीं. एक दिवसही सूर्याच्या किरणांनीं घरांत कधीं उजेड पाडला नाहीं. रस्ता चुकून वारा कधीं एक क्षणही घरांत शिरला नाहीं. तरीही लांबलचक दहा वर्षे निघून गेलीं !

आईबापांची किरणमयीला आठवणही येणें शक्य नव्हतें. तिला फक्त आठवे तें एवढेंच, कीं आपण लहान असतां कालनाजवळच्या एका छोट्याशा खेड्यांतील एका आनंदशून्य, उदास अशा मामांच्या घरसंसारांतून बाहेर पडून एक दिवस वधूवेषानें कलकत्त्याला येऊन या अंधाऱ्या घरांत प्रवेश केला. पतिराजांनीं छोटा शिष्य म्हणून आपला स्वीकार केला. त्या क्षणापासून त्या दिवसापर्यंत आपला गुरु-शिष्येचा कठोर संबंध कधींही शिथिल झाला नाहीं. पतींनीं एक दिवसही कधीं आपले लाड केले नाहींत–आपल्यावर ते प्रेम तरी करीत होते कीं नाहीं, याविषयीं एका शब्दानेंही कधीं आपणाला जाणीव देऊन ते गेले नाहींत.

बंगाली, संस्कृत, इंग्रजी भाषांचे ते धडे आपणाला देत; स्वतःही घेत! दिलेले धडे जर आपणाला तोंडपाठ झाले नाहींत, तर आपणावर ते रागवत, तिरस्कार करीत, प्रहारही करीत नसत असें नाहीं. राग, तिरस्कार, प्रहार यांच्या ऐवजीं त्यांनीं कधीं आपली मनधरणी केली नाहीं; रडतां रडतां आपणाला झोंप लागली असतां, कधीं जागें करून प्रेमानें एकादा आणलेला खाद्य पदार्थ आपल्या तोंडीं घातला नाहीं—हा तर आपल्या सासुरवासी आयुष्याचा इतिहास !

सासूची जाचणी तर याहूनही किती तरी कठोर होती ! त्या ठिकाणीं अगदीं क्षुल्लक, लहानशा चुकीचीही क्षमा नव्हती. अघोरमयीनें आपल्या स्वयंपाकघरांतील पोळपाट, लाटणें, उलथा, पळी इत्यादींपासून तों जळक्या लांकडापर्यंत सर्व वस्तूंच्या खुणा आपल्या लहानग्या सुनेच्या अंगावर कायम करून ठेवल्या होत्या ! एके दिवशीं तर कोणत्याशा एका अपराधाची शिक्षा म्हणून तिनें बालिकेचे सर्व केंसच कापून टाकले ! दुःखानें, रागानें, अभिमानानें सून

स्वयंपाकघराच्या एका कोपऱ्यांत बसून स्फुंदत स्फुंदत रडूं लागली, तेव्हां चुलींतील जळक्या लांकडाचा तिच्या पाठीवर टोंचा देऊन अघोरमयीनें तिला चूप रहावयाचा हुकूम केला ! जाळपोळीची ती जखम बरी व्हावयाला किरणमयीला एक महिना लागला !

एकाएकीं जणूं ती जखमच भयंकर जळजळूं लागली ! किरणमयी क्षणभर अत्यंत अस्थिर झाली—परंतु पुनः ती निश्चलपणें बसून राहिली.

त्या कैशोरावस्थेंतून बाहेर पडून आपण तारुण्यांत कधीं पाऊल टाकलें, त्याची आठवण तिला होऊं शकलीच नाहीं. त्याचें स्मरण तिला व्हावें, अशी एकही स्मृति तिच्या आयुष्यांत नव्हती ! उषेचें जसें निःशब्द रीतीनें प्रभातकालच्या उज्ज्वल प्रकाशांत रूपान्तर होतें, तसेंच तिच्याही बाबतींत झालें असावें !

तारुण्यांत, तिच्या नकळतच, अहंकाराच्या जाणिवेशिवाय, तिच्या देहाच्या अंगप्रत्यंगांतून सौंदर्य भरून निथळूं लागलें, तेव्हां ती पतीशीं तर्कयुक्तींचा सूक्ष्म बारीक कीस काढण्यांत अगदीं व्यग्र होऊन राहिली होती. आपल्या देहाची छळणूक कां आणि कशी बंद झाली, आपलें गृहिणीच्या, कर्त्रीच्या रूपांत कसें परिवर्तन झालें, याबद्दल विचार करावयाला तिला अवकाशच मिळत नसे.

तिचे पतिराज म्हणत, " सुख हेंच जीवाचं एकमात्र लक्ष्य अन् दुसरं सर्व कांहीं उपलक्ष्य ! दया, धर्म, पुण्य या सगळ्यांची त्या उपलक्ष्यांतच जमा ! जमलं तर इहकालीं, नाहींतर परकालीं, अगोदर स्वतःचं, नाहीं तर पांचजणांचं; तसंच प्रथम स्वदेशाचं, नच जमेल तर परदेशाचं-सुख-म्हणजे सुखाची समष्टि कशी वाढवतां येईल, हें पहाणें हेंच जीवाचं कर्म ! आणि जाणतां असो किंवा अजाणतां असो, या प्रयत्नांनींच जीवाचं सर्व जीवन परिपूर्ण होऊन रहातं. ज्याच्या साधनानं चांगलं वाईट वजन करून देतां येईल, असा एक हाच अन् हाच ताजवा आहे. स्वतःचं कीं दुसऱ्याचं, या दिशेकडं तूं बिलकुल पाहूं नकोस. किरण, कोणत्याही गोष्टीकडे तूं याच एका दृष्टीनं पहाण्याचा प्रयत्न केला पाहिजेस, कीं यामुळं सुखाचं परिमाण वाढेल कीं नाहीं ! "

किरण म्हणे, " बर तसं ! परंतु माझ्या कामांत, संसारांत सुखाची समष्टि वाढते आहे, हें मला कळायचं कसं ? सगळ्यांच्या दृष्टीला सुखाचा चेहरा कांहीं सारखा अन् एकच दिसत नाहीं."

आपल्या ज्योतिःशून्य नेत्रांची दृष्टि कोळिष्टकांनीं माखलेल्या अंधाऱ्या

बहाल—बरग्यांकडे क्षणभर लावून हाराण म्हणे, " तुकडे तुकडे करून पाहिलं, म्हणजे एक नाहीं, हें खरं; परंतु समग्रभावानं पाहिलं म्हणजे एकच आहे. तुला त्या दृष्टीनंच विचार करायला पाहिजे."

किरणमयीला सुखाचें कोणतेंही रूप सुस्पष्ट दिसत नसे. ती एकदम चिडून म्हणे, " ' तुकडे तुकडे करून, ' ' समग्र भावानं ' हे नुसते तोंडानं बोलायचे शब्द आहेत! कशानं आपणाला सुख होईल, एवढंच काय तें अगदीं शिकस्त करून माणसाला समजून घेतां येईल. अन् तें दिखील पुन्हां सर्व कालीं, सर्व स्थितींत बरोबर कळेलच असं नाहीं. ज्याअर्थी स्वतःसंबंधीं दिखील माणुस चुका करणं शक्य आहे, त्याअर्थी, सगळ्या जगाची जबाबदारी माथीं घ्यायचं धाडस ज्याला होईल तें होवो, मला कांहीं तें होणं शक्य नाहीं. हेंच पहाना, पलीकडच्या तागाच्या गिरणींतल्या कार्जीना कदाचित् वाटत असेल, कीं काशींतली सर्व देवळं पाडून तिथं तागाच्या गिरण्या उभारतां आल्या म्हणजेच मनुष्याच्या सुखाचं परिमाण वाढेल. परंतु सर्वांना असं वाटणं शक्य आहे काय ? सुख ही वस्तु काय आहे, हें जोपर्यंत तुम्ही मला समजावून देऊं शकत नाहीं, तोंपर्यंत मी तुमची कोणतीही गोष्ट ऐकायला तयार नाहीं."

असं म्हणून किरणमयी तेथून उठून जाऊं लागे.

तोंच तिचा हात धरून हाराण म्हणे, " बस, किरण, जरा बस. इतकं शिक्षण मिळाल्यानंतर दिखील, एवढ्या क्षुद्र कारणामुळं तुला राग येऊं लागला, तर सगळ्यावरच पाणी पडल्यासारखं होणार आहे ! हें पहा किरण ! मी तुला खरं तेंच सांगतों, सुख ही वस्तु काय आहे, हें मलाही नक्की ठाऊक नाहीं. कोणत्याही देशांत, कधीं कुणाला त्याचं स्वरूप पूर्ण माहीत झालं आहे कीं नाहीं, हेंहि मला माहीत नाहीं. अन् मला वाटतं, तें कधीं कोणाला माहीत होणारही नाहीं ! आमच्या देशांत फार दूरच्या काळीं तीन प्रकारचे दुःखनिवारणाचे प्रयत्न होऊन गेले आहेत. ते तीन वगळून जी वस्तु उभी रहाते—ती म्हणजे सुखच, असंही म्हणतां येण्यासारखं नाहीं !"

किरणमयी पतीच्या अशा भाषणानें अतिशय चिडून जाई आणि म्हणे, " ज्याअर्थी कांहींही व्याख्या करतां येत नाहीं, त्याअर्थी कुणाच्याही सुखाच्या कल्पनेचा परिहास करणं हें जसं असंगत, त्याप्रमाणंच, जगांत सामान्यपणं जगांत सुखाचं परिमाण वाढवण्याचा प्रयत्न करणं हा दिखील वेडेपणाच ! चांगलं वाईट तोलून देण्यापूर्वी तुमच्या तागडीचा दांडा अगदीं ठीक, बिनचूक असला पाहिजे.

कोणता आदर्श पुढं ठेवून तुम्ही तो बिनचूक करणार आहां, याची मला कल्पना होत नाहीं."

हाराण चार दोन क्षण गप्प राहून हताश होऊन म्हणे, "किरण, तुझ्या मनाची गति कोणत्या दिशेकडे झुकली आहे, हें मला कळतं आहे. परंतु जोंपर्यंत तूं परकालाची कल्पना, आत्म्यासंबंधाची कल्पना, ईश्वराविषयींची कल्पना, इत्यादि केरकचरा मनाच्या अन्तर्भागांतून झाडून झटकून टाकून तें स्वच्छ करीत नाहींस, तोंपर्यंत तुझा संशय कायमच राहील. सुख हेंच जीवनाचं अगदीं अखेरचं ध्येय अन् सुखी होणं हेंच जीवनाचं परम सार्थक, हा सिद्धान्त कळूनही तुला कळायचा नाहीं. कुणाला ठाऊक, आणखींही कदाचित् कांहीं असेल, असंच तुझ्या मनाला नेहमीं वाटत रहाणार! अन् त्या 'आणखीन् कांहीं'चा थांगपत्ता कधींही तुला शोधूनही सांपडणार नाहीं. हें तुला सदोदित अस्वस्थ करीत राहील; परंतु त्यापासून तुला कधींही गति मिळणार नाहीं. तुझ्या आकांक्षा जागृत करील; परंतु परितृप्तता तुला कधींही लाभूं देणार नाहीं. रस्त्याची कहाणी सांगेल; परंतु कधींही तें तुला रस्ता दाखवूं शकणार नाहीं!"

अशा प्रकारचा संसार आणि अशा प्रकारचें शिक्षण यांमधून किरणमयी गृहिणी आणि संसारस्वामिनी झाली होती.

आज तिला अशा एक एक गोष्टी आठवूं लागल्या.

अशा रीतीनें, तूर्तच्या दुःखाला खूब मागें सारून, गेलेल्या दिवसांतील अगाध, अथांग दुःखाच्या सागरांत जेव्हां किरणमयीचें मन चिंतन करीत डुबक्या घेत मरत होतें, अशा एका क्षणीं कोठून दिवाकर केबिनमध्यें शिरला.

त्याचा चेहरा अगदीं शुष्क, म्लान झाला होता.

तो दृष्टीला पडतांच, किरणमयीच्या दुष्ट स्वप्नांची तंद्रा एका क्षणांत उडाली!

स्नेहमधुर हास्यानें चेहरा उजळीत ती तिरस्काराच्या स्वरानें दिवाकराला म्हणाली, "एकंदर प्रकार आहे तरी काय, भाऊजी? करतां आहां काय, भटकतां आहां कुठं, कांहीं कळत नाहीं! खायचं प्यायचं नाहीं वाटतं कांहीं? वाः! छान आहेत पण एकंदरींत बाबूजी!"

इतक्या दिवसांनंतर तिचा तो कंठस्वर ऐकून दिवाकर एकदम चकितच झाला. जणूं किती लक्ष लक्ष वर्षें उलटून गेलीं असतील–वहिनींचा हा कंठस्वर आपणाला ऐकावयाला मिळाला नव्हता, असें त्याला एकाएकीं वाटूं लागलें. ज्या स्वरांत विद्वेष, उपहास यांची आग नाहीं, जो खरोखरीच स्नेहाच्या

वेदनांनीं कोमल, जेथें माणसाच्या कानांची चूक होणेंच शक्य नाहीं, असा तो कंठस्वर त्याला तत्क्षणीं प्रतीत झाला !

दिवाकर झपाटलेल्या माणसाप्रमाणें किरणमयीकडे पहात गप्प बसला.

किरणमयी पुनः मृदु हास्य करून म्हणाली, "सकाळपासून आतांपर्यंत तुम्ही होतां तरी कुठं, भाऊजी ?"

दिवाकर क्षणभर गप्प बसला. नंतर आस्ते आस्ते तो म्हणाला, "खालीं."

किरणमयी अत्यंत आश्चर्यानें उद्गारली, "खालीं ? इतका वेळपर्यंत खालीं बसून करीत होतां तरी काय तुम्ही, भाऊजी ? एकवार वर येऊन, कांहीं तोंडांत टाकून जायला दिखील फुरसत झाली नाहीं तुम्हाला ?"

उत्तरादाखल दिवाकर तिच्याकडे नुसता पहात राहिला. त्याच्या डोळ्यांचीं पातीं देखील हलत नव्हतीं. त्याच्या तोंडांतून शब्दही फुटेना !

किरणमयीनें पुनः विचारलें, "करीत होतां तरी काय खालीं आतांपर्यंत, भाऊजी ?"

तिच्या मुखमंडलावर वडील बहिणीचें तेंच निर्मल स्नेहाचें हास्य, कंठस्वरांत मायेची तीच तक्रार ! कलकत्त्यांत पहिल्यानें आल्यावर किरणमयीकडून यांचाच लाभ होऊन दिवाकर कृतार्थ झाला होता !

आनंदातिशयामुळें त्याच्या डोळ्यांतून अश्रूबिंदु टिपकणार होते. ते कसेबसे आवरून तो म्हणाला, "वहिनी, खालीं एक बंगाली गृहस्थ आपल्या कुटुंबासह आराकानला चालला आहे. तिथं त्याचं घर देखील आहे—"

किरणमयी उत्सुकतेनें उद्गारली, "म्हणतां काय, भाऊजी ?"

दिवाकर म्हणाला, "खरंच, वहिनी ! फार चांगलीं आहेत तीं माणसं—"

त्याला पुरतें बोलूंही न देतां किरणमयी मध्येंच म्हणाली, "तर मग आपणाला तिथं त्यांच्या घरांतच उतरतां येईल कीं ! त्यांच्या मंडळीशीं माझी ओळख करून नाहीं का देतां यायची तुम्हाला ?"

दिवाकर अतिशय खूष होऊन म्हणाला, "कां नाहीं देतां येणार ? घरवाली तर म्हणाली, तुमच्याबरोबर एकदां—"

किरणमयी विस्मयानें म्हणाली, "ही घरवाली कोण आणखीन्, भाऊजी ?"

दिवाकरानें कामिनीची संक्षेपानें तिला माहिती सांगितली, आणि तो म्हणाला, "हरीशबाबू आपल्या बायकोला याच नांवानं हांका मारतात. एक वाडा आहे ना त्यांचा आराकानला—"

किरणमयी हें ऐकून गप्प बसली. कारण, ‘ घरवाली ’ हा शब्द ज्या सगळ्या घर-संसाराच्या कर्त्या स्त्रियांना उद्देशून दासी-मोलकरणींनीं वापरलेला कलकत्त्याला तिनें यापूर्वी अनेक वेळ ऐकला होता, त्यांपैकीं कोणीही गृहस्थ–घरच्या नव्हत्या.

यामुळें हरीशबाबूंच्या ‘ घरवाली ’ ला बरोबर आणून तिच्याशीं परिचय करून देण्याचा प्रस्ताव दिवाकरानें जेव्हां केला, तेव्हां किरणमयी किंचित् हंसली, आणि स्निग्ध स्वरानें तिनें विचारलें, “ पण ती बाई बऱ्यापैकीं आहे का, भाऊजी ? ”

दिवाकर ताबडतोब मान हालवून आवेशानें म्हणाला, “ वा–म्हणजे ! अतिशय छाम आहेत ती, वहिनी ! एक वेळ त्यांची ओळख झाली म्हणजे—”

किरणमयी मध्येंच मान हालवीत म्हणाली, “ नाहीं तर आज राहूं दे तें, भाऊजी ! फिरून कधीं तरी—”

दिवाकर मान हलवीत म्हणाला, “ नाहीं, वहिनी ! फिरून नको. तुमच्या मी पायां पडतों–‘ घरवाली’ची तर आतांच येऊन तुम्हाला भेटायची इच्छा आहे. त्यांच्या घरींच जाऊन जर आपणाला उतरायचं आहे, तर मग—जाऊं मी तिला बोलावून घेऊन यायला, वहिनी ? ”

बोलतां बोलतां दिवाकर अतिशय अधीर होऊन उठून उभा राहिला.

या वेळीं त्याचे डोळे आणि कंठस्वर यांमधून धाकट्या भावाच्या प्रेमळ स्नेहाचा जो आग्रह व्यक्त होत होता, त्यामुळें किरणमयीच्या हातून घडलेला प्रमाद जणूं तापलेल्या शूलाप्रमाणें तिच्या हृदयाला वेदना देऊं लागला.

अकस्मात् तिला जो आवेगाचा हुंदका आला, त्यामुळें तिच्या कंठापर्यंतचा अन्तर्भाग जणूं फेंसाळून निघाला !

डोळ्यांतून टिपकणारे अश्रु कसे तरी लपवीत, तोंड फिरवून किरणमयी म्हणाली, “ बरं तर–जा.”

एकाद्या अज्ञात, अजिबात बिनओळखीच्या नव्याच ठिकाणीं जात असतां रस्त्यांत जर एकादी ओळख होऊन तिचें स्नेहांत रूपान्तर झालें, तर ती मोठ्या भाग्याची गोष्ट होय, यांत शंका नाहीं. शेवटीं, हाच विचार मनांत आणून किरणमयीनें दिवाकराच्या आतुरतेच्या आग्रहाला कबुली दिली असावी. परंतु तो जेव्हां तिला बोलावून घेऊन येण्याकरतां खरोखरच घाईघाईनें तेथून निघून गेला, तेव्हां स्वतःची स्थिति मनांत येऊन तिला एका प्रकारची अतिशय लज्जा वाटूं लागली.

जी बाई आतां दिवाकराबरोबर येणार होती, ती असणार बंगाली गृहस्था-घरची; त्यांतून वयानें ती आहे प्रौढ–कांहीं पोरसवदा, चंचल नव्हे. तिच्या अनुभवी नजरेंत धूळ टाकणें आपणाला शक्य होईल कीं नाहीं कोण जाणे! दिवाकराशीं तुलना करतां, आपलें स्वतःचें वय, केवळ पती-पत्नी या नात्याच्या हिशेबानें बंगाली समाजाच्या दृष्टीला इतकें विपरीत आणि चमत्कारिक वाटणार आहे, कीं तें कोणालाच पटणें जवळजवळ अशक्य आहे!

हा एकच विचार मनांत येतांच किरणमयीचें मन विलक्षण कुंठित होऊन गेलें, आणि तिला अतोनात संकोच वाटूं लागला.

थोड्याच वेळांत, दिवाकराच्या मागोमाग 'घरवाली' ही येऊन हजर झाली.

तिच्याकडे नजर जातांच किरणमयीची चटकन् खात्री झाली, कीं ही गृहस्था-घरची बाई नव्हे! कलकत्ताशहरांत ज्या बाया दासी मोलकरणींचा व्यवसाय करीत हिंडत असतात, त्यांपैकींच ही एक आहे!

हें कळून येतांच किरणमयीच्या छातीवरचा एक प्रचंड बोजाच जणूं उतरला!

हंसतहंसत ती तिला म्हणाली, " ये–बस. "

किरणमयीचें अपूर्व सौंदर्य पाहून घरवाली स्तंभित होऊन जागच्या जागीं उभीच राहिली!

नंतर पदर गळ्यांत घेऊन, खाली वांकून नमस्कार करून दरवाज्याजवळच तिनें फतकल मारली.

क्षणभरानें ती म्हणाली, " बाबूजींच्या तोंडून हकीगत ऐकून घरवाले मला म्हणाले, 'जा घरवाली, ब्राह्मणांना एकवार नमस्कार करून ये'. आतां तुम्ही रानटी, मगांच्या मुलखांत जातां आहां खरीं, सूनबाई! पण या कामिनी घरवालीच्या घरांत टूं शब्द करून जाईल, असा बेटा-बेटी एकहि कुठं नाहीं. झाडून टाकून एकेकाला नाहींसा करीन–ठाऊक नाहीं?"

असें म्हणून झाडूच्या अभावीं घरवालीनें नुसता हातच उंच करून तो जोगनें झाडूप्रमाणें हलवला.

किरणमयी खूप होऊन म्हणाली, " अगदीं सुटल्यासारखं झालं बाई मोठ्या काळजींतून! नव्याच जागीं आम्ही जातों आहों, म्हणून किती कित्ती भय वाटत होतं—दोघंजणं अगदीं चूर होऊन गेलों होतों!"

घरवाली म्हणाली, " भय कसलं त्यांत बेटा? आराकानमधली मी एक जबरदस्त घरवाली आहें बघ. माझं नांव घेतांच यम दिखील वाट सोडतो. चल

बेटा, खुशाल या तुम्ही आराकानला. आमच्या वाड्यांत तुम्हांला कांहीं त्रास व्हायचा नाहीं. भाडं पांच पांच रुपये ठरलेला दर आहे-तर तुम्ही चार रुपये-प्रमाणंच द्या. पुढं बाबूंना कामकाज लागलं म्हणजे मग काय तें बघतां येईल. अन् नोकरीबिकरीसंबंधानं दिखील तुम्हाला मुळींच काळजी करायचं कांहीं कारण नाहीं. आमचे घरवाले आहेत कींनई, त्यांनीं कुणाही साहेबाला धरलं, कीं त्याची नाहीं म्हणायची काय छाती आहे ? तुझ्या आईबापांच्या आशीर्वादानं आम्हांला तसं कांहीं दिखील कमी नाहीं बरं बेटा ! ”

असें म्हणून कामिनीनें अधरोष्ठ पसरला, आणि दोनचार वेळ उजव्या डाव्या बाजूला मान झुकवली.

इतक्यांत किरणमयीच्या चेहऱ्याकडे घरवालीनें तीव्र दृष्टिपात केला, आणि ती एकदम चमकली !

विस्मयानें ती उद्गारली, “ हें ग काय विलक्षण, सूनबाई ! माथं काय इतकं जोरानं घांसायचं, कीं शेंदराचा एक ठिपकाही भांगांत राहूं नये ? पहा बरं, आहे का तिथं शेंदराचा डाग तरी ? आण बघूं चटकन् करंडा-शेंदूर लावतें, नी जातें. ”

या ‘ संकटा ’साठीं किरणमयी आगाऊच तयार होऊन राहिली होती.

डावा हात पुढें करून ती म्हणाली, “ नाहीं बाई, माथं घांसण्यामुळं नाहीं झालेलं हें ! एक वरीस झालं, माझा वाळा अन् सिंदूर कालीमातेच्या पायांशीं गहाण ठेवलाय् मीं. त्या वर्षी बाबूजींना भारी मोटं दुखणं आलं होतं, अन् त्यांतून ते निभावतील अशी आशाच नव्हती. तेव्हां आईला नवस करून सिंदूर नी वाळा तिच्या पायांशीं गहाण ठेवून कसं तरी सौभाग्य कायम राखलं मीं माझं ! ”

असें म्हणून तिनें मोठा थोरला एक उसासा टाकला, आणि वांकड्या डोळ्यानें दिवाकरकडे पाहिलें.

बिचाऱ्याचा चेहरा लज्जेनें आणि संकोचानें पांढरा फटफटीत पडला होता.

“ अस्सं ! तरी म्हटलं-”

किरणमयी कांहींच बोलली नाहीं. दिवाकरही गप्प होता.

क्षणभरानें घरवाली सहानुभूतीनें म्हणाली, “ कांहीं हरकत नाहीं. आमच्या आराकानमध्यें दिखील कालीमातेचं देऊळ आहे कीं ! तिथं गेलीस, कीं आईची पूजाअर्चा कांहीं तरी करून आपला वाळा अन् कुंकू तिच्यापासून सोडवून घे, सूनबाई ! नाहीं तर पांचजणं पांच तऱ्हांनीं उगीच कांहीं तरी नांवं ठेवीत

रहातात बघ! आराकानसारखी हरामी जागा उभ्या त्रिभुवनांत एक दिखील नसेल, अशी खात्री आहे माझी! फक्त आमच्या भीतीमुळंच थोडीबहुत काय व्यवस्था रहात असेल तेवढीच! नाहीं तर—हूं :—"

किरणमयी हंसली, आणि म्हणाली, "याच गोष्टी तर बाबूजींबरोबर आज दोन दिवस सारख्या माझ्या चालल्या आहेत. तुमची किती अन् कशी प्रशंसा बाबूजी सारखी करताहेत, हें त्यांच्या तोंडावर मी कसं सांगूं? बोटीवर चढल्यापासून आम्ही दोघं तापानं कशीं अगदीं अर्धमेलीं होऊन गेलों आहों—काय अन् कसं होणार आमचं! अरे देवारे —"

परंतु किरणचें भाषण कांहीं पुरें झालें नाहीं.

"अग, भय कसलं आलं आहे! मी आहें ना!"

असें म्हणून, किरणमयीला अभय देऊन घरवालीनें आत्मस्तुतीचें भरपेट पुराण पांच मुखांनीं बकावयाला सुरवात केली.

पहातांपहातां उभयतांमध्यें, घरसंसार, कामउद्योग, सुखदुःखें यांबद्दलच्या गप्पागोष्टी इतक्या कांहीं रंगाला आल्या, कीं केवळ दहा मिनिटांपूर्वी या दोघी बायांची तिळमात्र ओळखसुद्धां नव्हती, असें म्हणावयाची कोणाची छाती होती?

आल्यापासून दिवाकर जवळच्या एका खुर्चीवर जो हेलावून पडला, तो आतांपर्यंत उठलाच नाहीं. किती विलक्षण निःसंकोचपणें आणि अगदीं सहज रीतीनें किरणमयी जेलाशाक खोटें बोलूं शकते, तें ऐकत असतां जणूं चैतन्य हरपल्याप्रमाणें तो अगदीं निश्चल, निःस्तब्ध पडून राहिला होता!

परंतु इतक्या अवकाशानंतर एकाएकीं त्याचें चैतन्य जणूं परत येऊन तो खुर्चीवरून उठला, आणि बाहेर जाऊं लागला.

तोंच किरणमयी त्याला उद्देशून म्हणाली, "साऱ्या दिवसांत तुम्हीं कांहीं तोंडांत घातलं नाहीं, अन् फिरून आतां बाहेर निघालां?"

उत्तरादाखल दिवाकर जें पुटपुटला, तें कांहीं ऐकूं आलं नाहीं; परंतु तें कळलं मात्र फार उत्तम रीतीनें!

किरणमयी गडबडीनें म्हणाली, "नाहीं नाहीं हं.–तें कांहीं चालायचं नाहीं. तुमचा पाय एकवार बाहेर पडला, कीं तुम्ही कांहीं लवकर परत येणार नाहीं, हें चांगलं माहीत आहे मला!"

बिचारा दिवाकर!

नंतर घरवालीच्या तोंडाकडे पाहून किरणमयी हंसत हंसत म्हणाली, "सासूसासरे कुणी नाहींत. लगीन झाल्यापासून माझ्यामागं हा सारखा कांच आहे! यांच्या पोटांत दोन घांस जावे म्हणून मला सारख्या मारामाऱ्या कराव्या लागतात अशा बाई!"

घरवाली कांहीं बोलणार होती; इतक्यांत पुनः एकवार मोठ्यानें हंसून किरणमयी म्हणाली, "मी ही अशी आहें, म्हणूनच जोरजबरदस्ती करून कसंबसं खायला घालतें यांना! माझ्या जागीं जर दुसरी एकादी पोर असती, तर डोळ्यांतून पाणी काढीत उपासानं जीव द्यावा लागला असता तिला!"

भयंकर शरमेनें दिवाकराचें माथें एकदम खालीं झुकलें. घरवाली त्याच्याकडे पाहून हंसत हंसत म्हणाली, "आं, बाबू? परदेशांत जाऊन असाच तुम्ही दोघं घर-संसार करणार वाटतं? पण माझ्या घरीं मात्र असं कांहीं चालायचं नाहीं हं! सूनबाईला तिळमात्र त्रास होईल, असं तुम्हाला मी कांहीं करूं देणार नाहीं, हें आपलं तुम्हाला मी अगोदरच स्वच्छ सांगून ठेवतें."

नंतर किरणमयीच्या चेहऱ्याकडे नजर लावून तिनें एकदम प्रश्न केला, "अं—काय ग सूनबाई, बाबू कांहीं तुझ्यापेक्षां फारसे मोठे नाहीं दिसत! जणूं काय एकाच वयाचीं दिसतां दोघं तुम्ही—नव्हे?"

किरणमयी या 'संकटा'लाही सिद्धच होती.

तत्क्षणीं मान हलवून ती हंसून म्हणाली, "कुलीन घराणं, दुसरं काय? माझंच यापेक्षां मोठं वय झालं नाहीं, हेंच माझं भाग्य! हो, जवळजवळ एकाच वयाचीं आहों म्हणायचं कीं आम्ही! यांचा जन्म वैशाखांतला अन् माझा आषाढांतला—एकंदरींत काय असेल ती दोन महिन्यांचीच वडिलकी कीं नाहीं! पुष्कळजण तर जोडप्यापैकीं मलाच वयानं वडील समजतात. अगाई ग! छीः! किती शरमेची गोष्ट!"

असें म्हणून तोंडावर पंजा ठेवून किरणमयी मोठमोठ्यानें हंसूं लागली.

परंतु घरवाली त्या हंशांत सामील झाली नाहीं.

उलट गंभीर चेहऱ्यानें ती म्हणाली, "कुलीन घराणं बोलून चालून!—मग त्यांत लज्जा शरम कसली? दहा वर्षांच्या नवऱ्याबरोबर पन्नास वर्षांच्या बुड्ढीचंही लगीन होतं, असं मी ऐकलं आहे. तें असो म्हणा. त्यासाठीं कांहीं मोठंसं नाहीं. पण आराकानला गेल्यावर पूजा करून आपला वाळा अन् शेंदूर सोडवून घेऊन तीं अगोदर घाल अंगावर. अग, त्याशिवाय का अहेवपणीं बाईला

शोभा आहे ? बरं, आतां मी उठतें तर. तुम्ही आतां आपला फराळबिराळ आटोपा—पुन्हां आलें तर संध्याकाळ झाल्यावर येईन मी. ”

असें म्हणून घरवालीनें किरणमयीच्या पायांची धूळ मस्तकाला लावली आणि आपलें बूड उचललें.

## १२

सतीशच्या अरण्यवासाची व्यवस्था अजूनही जशीच्या तशीच असली, तरी त्याची ती वैराग्यसाधनाची लहर इतक्या अवधींत कशी भलत्याच मार्गाकडे झुकली होती, हें, ज्यानें त्याला दोन महिन्यांपूर्वी पाहिलें असेल, त्याच्याच ध्यानांत येईल.

जो माणुस अगदीं स्वतःच्या इच्छेनें हद्दपारीची शिक्षा आपणावर लादून घेऊन, या निर्जन, आप्त-मित्र-शून्य स्थलीं एकटाच रहावयाला आला होता, त्याच्या ठिकाणीं एकाएकीं वेषभूषेसंबंधीं असा अनुराग उत्पन्न व्हावा, यांत त्याचा हेतु काय असावा ? त्याप्रमाणेंच पक्ष्यांच्या गायनाच्या बदलीं, त्याच्या स्वतःच्या गाण्याच्या सारीगमची बांधीव लठ्ठ चोपडी पुनः त्याच्या ट्रंकेच्या बंदिवासांतून सुटून बाहेर कां पडली ? व्हाओलिन, सतार, बांसरी वगैरे त्याच्या वाद्यांनीं आपलें आतांपर्यंतचें कुणीं ढुंकूनही न पाहिलेलें स्थान सोडून पूर्वी-प्रमाणें टेबलावर येऊन गर्दी कां करावी ? खुद्द त्याच्या चेहऱ्यावरील आणि डोळ्यांतील कृष्ण, मलिन छाया एकाएकीं नाहींशी कां आणि कशी झाली ? हे सारे प्रकार अगदीं विचार करण्यासारखे आहेत, यांत शंका नाहीं.

तसें म्हटलें तर दोन तीन महिन्यांपूर्वीचा सतीश आतां ओळखला जाणेंच अशक्य झालें आहे !

या एवढ्या प्रचंड अद्भुत परिवर्तनाचें कारण कदाचित् येथें मोकळेपणीं खोलून सांगितलें नसतें तरी चाललें असतें. परंतु संताल परगण्याच्या हवा-पाण्याचा हा गुण होय, अशी खूणगांठ मनांत बांधून कदाचित् कांहीं खुळ्या माणसांचें टोळकें जर या ठिकाणीं धांवून आलें तर काय करतां ?

म्हणून थोडासा आभास देण्याकरतां इतकें सांगण्याची आवश्यकता आहे, कीं कोणत्याहि पक्षाकडून विवाहाचा प्रस्ताव जरी अजूनही स्पष्टपणें करण्यांत आला नसला, तरी आप्त-मित्र बंधु-बांधवमंडळींत सतीश–सरोजिनीच्या मनांतील भावना चांगली स्पष्टपणें प्रकट व्हावयाला कांहींसुद्धां बाकी राहिलें नव्हतें !

सरोजिनीची आई जगत्तारिणी हिचाच आग्रह या बाबतींत सर्वांपेक्षां अधिक होता, ही गोष्ट जवळजवळ एक वर्षापूर्वी कलकत्त्यांत जाहीर झाली होती. परंतु सर्वांपेक्षां तिचा आग्रह आणि व्याकुलता अधिक, म्हणूनच, मला वाटतें, सर्व आप्तमित्रमंडळीमध्यें केवळ तिच्याच मनांत एका संशयाची छाया विशेष पडली होती. तो संशय हा कीं, आपली सुशिक्षित आणि शिक्षणाभिमानी कन्या, आपले पुष्कळ दिवसांचे संस्कार आणि आपला समाज यांची परवा न करतां सतीशाचा स्वीकार करावयाला तयार होईल कीं नाहीं ?

तूर्त जगत्तारिणी शांतिपुराला आपल्या माहेरीं गेली होती. तिकडून परत येतांच, विवाहाचा प्रश्न आपण निश्चित करून टाकूं, असें थोडेंसें इंगित तिनेंच जातांना प्रकट केलें होतें.

सकाळीं सतीश व्हायओलिनवर नवी तार चढवीत होता. इतक्यांत बिहारी-बरोबर एक गृहस्थ तेथें येऊन ठेपला.

ज्योतिषबाबूंच्या घरचा हा दिवाणजी. जगत्तारिणीबरोबर हा शांतिपूराला गेला होता, आणि तिच्याबरोबरच परत आला होता.

दिवाणजींनीं येतांच सतीशला नमस्कार ठोकला, व ते म्हणाले, " आईनीं आपणाला आज भोजनाचें निमंत्रण द्यायला मला पाठवलं आहे. "

'बातमी' ऐकतांच, सतीशच्या काळजांतील रक्तांत एक गोड चमक निघाली!

त्यानें विचारलें, " आई परत कधीं आल्या ? "

दिवाणजी म्हणाले, " आज तीन दिवस झाले. "

जवळजवळ सहा सात दिवसांत सतीश त्या बाजूला फिरकला नव्हता. त्या मंडळीचा ' संबंध ' अत्यंत स्पष्ट झाल्यावर ज्योतिषबाबूंच्याकडे जेव्हां तेव्हां जाऱ्ये करावयाला सतीशला अर्थातच लाज वाटे.

दिवाणजींना तो म्हणाला, " ठीक आहे. दहा-अकरांच्या दरम्यान मी येतों, म्हणून आईना सांगा. "

" जी." असें म्हणून दिवाणजी नमस्कार करून निघून गेले.

सतीशला निमंत्रण करण्यासाठीं दिवाणजींना पाठवल्यानंतरही जगत्तारिणी स्वयंपाकाच्या व्यवस्थेला न लागतां निश्चित होती. कारण, सतीश संध्याकाळपूर्वी येणार नाहीं अशीच तिची कल्पना होती.

परंतु दिवाणजींनीं सांगितलेली बातमी ऐकून ती एकदम अस्वस्थ झाली, आणि तिला रागही आला.

आज होती एकादशी. जगत्तारिणीसाठीं विशेष अशी कांहींच व्यवस्था करावयाची नव्हती. शिवाय, जी विधवा ब्राह्मण बाई त्यांच्या घरचें रांधप वाढप करीत असे, ती आज दोन दिवसांपासून शांतिपुरच्या प्रभावानें मलेरियातापानें अंथरुणावर पडून होती.

अतिशय त्रासून जगत्तारिणी दिवाणजींना म्हणाली, " पण तुम्हीं सकाळीं जेवायला यायला त्यांना सांगितलं कशाला हो, दिवाणजी ? तुम्हाला कांहीं अक्कल म्हणून कांहीं आहे कीं नाहीं ? "

दिवाणजी भयानें खालीं पहात म्हणाले, " मीं त्यांना कांहींच सांगितलं नाहीं. त्यांनीं स्वतः होऊनच सकाळीं येईन म्हणून सांगितलं. "

तरीही जगत्तारिणीचा राग ओसरला नाहींच. तिनें रागानेंच हुकूम केला, " तर मग तुम्हालाच जायला हवं बघा आतां. मासेबिसे कुठं मिळतात तिथून लवकर या घेऊन—"

आज सकाळपासून जगत्तारिणीचें मन बिघडलें होतें, आणि त्याला तसेंच कारणही होतें !

सतीशला निमंत्रण पाठविल्यानंतर, काल रात्रीं एकाएकीं शशांकमोहन पुनः येऊन हजर झाल्याची बातमी तिला कळली होती.

या आदमीच्या उग्र साहेबीपणामुळें तो जगत्तारिणीला मनांतून बिल-कुल आवडत नसे. आणि विशेषेंकरून हा गृहस्थ सरोजिनीचें पाणीग्रहण करूं इच्छितो आहे, असें ज्या दिवशीं तिनें ऐकलें, त्या दिवसापासून तर तो तिच्या अगदीं दृष्टीला देखील नकोसा झाला होता.

सुमारें बीस एक दिवसांपूर्वी कांहीं तरी कारण उभें करून अनंगमोहन कलकत्त्याहून या ठिकाणीं आला, त्या वेळीं जगत्तारिणीनें त्याला एक प्रकारें स्पष्टपणेंच इशारा दिला, कीं सरोजिनीशीं त्याचा विवाह होणें अशक्य आहे ! तरीही बोलणं नाहीं, आमंत्रण नाहीं, निमंत्रण नाहीं, असें असतां, हा बेवकुब माणूस पुनः आल्याचें ऐकून तिचें मन संशयानें अगदीं कावून गेलें.

शिवाय, ही बातमी जगत्तारिणीला जर थोडी अगोदर कळली असती, तर कदाचित् तिनें सतीशला निमंत्रण करावयाला दिवाणजीची रवानगी केलीही नसती. ही बातमी आपणाला वेळेवर कळविण्यांत आली नाहीं, म्हणून जगत्तारिणी ज्योतिषपासून तों तहत घरच्या गड्यांपर्यंत प्रत्येक माणसावर अगदीं चिडून गेली होती !

बाहेरच्या दिवाणखान्यांतून बाहेर पडून आईच्या दृष्टीला न पडण्याचा प्रयत्न करीत सरोजिनी वर जावयाला निघाली होती.—शशांक-मोहन आल्याची खबर तिलाही नव्हती. परंतु ती जगत्तारिणीच्या शेवटीं नजरेला पडलीच.

जगत्तारिणी मागें वळून, क्षणभर मुलीचें आपादमस्तक निरीक्षण करीत मुकाट्यानें उभी राहिली.

नंतर उफाळलेला राग दाबून टाकण्याचा प्रयत्न करीत ती त्याच स्वरानें मुलीला म्हणाली, " झालं का बाईसाहेबांचं हिंडणं ? आतां मोजे-बूट घटकाभर तरी काढ बेटा ! सतीश आज इथं जेवायला येणार आहेत. मीं स्वतः जर सैंपाक आज केला नाहीं, तर तुमच्या या किरिस्ताव घरीं ते पाणी दिखील घेणार नाहींत. जा, बाई, जा. घागराबिगरा सोडून माझ्या सैंपाकघरांत ये जरा. म्हाताऱ्या आईला थोडीशी मदतबिदत केलीस, तर तुमचा येशू ख्रिस्त तुझ्यावर खास रागावणार नाहीं बरं बाळ ! जा—"

आई रागावली म्हणजे कशी अग्निमूर्ति धारण करते, आणि खरें-खोटें याचा बिलकुल कसला विचार न करतां, तोंडाला येईल तें कसें बोलते, याची प्रत्येकाला चांगली माहिती होती.

सरोजिनी बऱ्याच संकोचानें म्हणाली, " मी ही आतांच तर येतें आहें, आई ! "

परंतु आईचा राग या उत्तरानें तिळभरही शांत झाला नाहीं. ती एकदम गरजली, " आलीस, म्हणून माझ्यावर मोठे उपकार का केलेस बाई ? सतरा अठरा वर्षांची घोडी झालीस, पण अजून मूठभर तांदळांचा भात दिखील करायला शिकली नाहींस. आम्ही दिखील कांहीं गरिब घरच्या पोरी नव्हतों बाई ! पण तेव्हांपासून या वयापर्यंत संसार करीत आलोंच आम्हीं ना ! सैंपाकीणबाई जर आज निघून गेली, तर खायलाप्यायला न मिळाल्यामुळं आम्हां सर्वांना सुकून मरावं लागेल ! खरंच ! ज्या घरसंसारांत धर्म-कर्म नाहीं. त्या घरांत मुलां-मुलींना जन्म देणं अगदीं फुकट आहे ! "

हें मत शक्य तितक्या कठोर भाषेंत, शक्य तितक्या कठोर रीतीनें व्यक्त करून, तोंडाची हांडी करीत जगत्तारिणी स्वतःच स्वयंपाकघराकडे निघून गेली.

परंतु आपलीं स्वतःचीं सोन्यासारखीं मुलें, स्वतःचा संपन्न संसार आणि त्यांतला आचारव्यवहार त्यांच्यावर जगत्तारिणीचा इतका मर्मांतिक संताप

आणि आक्रोश कां, हें समजून घ्यावयाला तिच्या पूर्वइतिहासाकडे आपणाला वळावयाला पाहिजे.

जगत्तारिणीचे पति परलोकवासी परेशनाथ हे कलकत्त्यांतील एक नामांकित वकील होते. धंद्यांत विलक्षण पैसा मिळत असूनही, उत्तरवयांत अधिक पैसा मिळविण्याच्या आशेनें विलायतेला जाऊन बॅरिस्टर होऊन यावयाचा जेव्हां त्यांनीं संकल्प केला, तेव्हां त्यांच्या पत्नीनें रडून आक्रंदून, उपास करून, पाय आपटून घेऊन, अनंत प्रकारांनीं त्यांना त्या संकल्पापासून निवृत्त करण्याचा खूब प्रयत्न केला; परंतु त्यांत तिला यश आलें नाहीं. परेशनाथांनीं तिचें कांहीं देखील ऐकलें नाहीं. पत्नी जगत्तारिणी, बारा वर्षें वयाचा पुत्र ज्योतिष आणि सहा वर्षांची कन्या सरोजिनी, यांना आपल्या मुलुखांतील घरांत ठेवून ते विलायतेला निघून गेले.

पहिल्यानें कांहीं दिवस जगत्तारिणीनें संसाराचें सुकाणूं आजिबात सोडल्यासारखें केलें; परंतु पुढें कांहीं दिवसांनीं ताळ्यावर येऊन दिवाणजी-मुनीम वगैरेंच्या मदतीनें ती सगळा कारभारही पाहूं लागली. परंतु पतीसंबंधानें तिचें मन विटलें तें कायमचें विटलें!

कांहीं दिवसांनीं परेशनाथ बॅरिस्टर होऊन परत आले, आणि त्यांनीं धंदा सुरू केला. व्यवसायांत आतां त्यांना कल्पनेच्या बाहेर पैसा मिळूं लागला. कलकत्त्याला नवीन टोलेजंग बंगला त्यांनीं बांधला, आणि नवीन धर्तीनें घर आणि संसार श्रृंगारावयाला सुरूवात केली. घरांत बॉय्, बवर्जींची स्थापना झाली.

परंतु जगत्तारिणीला हा साहेबीपणा सहन झाला नाहीं. ती निराळी राहूं लागली. पतीच्या गृहकार्यांत तिनें लवमात्र साहाय्य केलें नाहीं.

अशा प्रकारें दिवसेंदिवस पति आणि पत्नी यांमधील अन्तर अधिकाधिक विस्तृत होऊं लागलें. नवरा-बायकोंत बोलीभाषण तर किती दिवस बंदच होतें—आतां परस्परांचा समाचारसुद्धां घेणें अजिबात थांबलें!

एके दिवशीं ज्योतिष येऊन म्हणाला, "आई, मला विलायतेला पाठवावं, अशी बाबांची इच्छा आहे."

आज बरेच दिवस ही शंका आईलाही होतीच!

अतिशय कठोर स्वरानें तिनें विचारलें, "कधीं?"

ज्योतिष म्हणाला, "दोन एक महिन्यांच्या आंतच."

" ठीक आहे. "

असें म्हणून, चेहरा काळवंडून आई तेथून दुसरीकडे निघून गेली.

ज्योतिष ज्या दिवशीं विलायतेला जावयाला निघणार होता, त्या दिवशीं जगत्तारिणी दरवाजा बंद करून आपल्या खोलींत पडून राहिली.

बंद दरवाज्यासमोर येऊन ज्योतिषनें आईला नमस्कार केला, आणि तिचा ' निरोप ' घेऊन तो निघून गेला. सरोजिनीला बरोबर घेऊन परेशनाथ मुलाला पोंचवावयाला मुंबईपर्यंत गेले.

ते कलकत्त्याला परत येऊन पहातात, तों जगत्तारिणी शांतिपुराला माहेरीं गेली असल्याचें त्यांना आढळून आलें. कारणांची चौकशी करतां, परेशनाथांना कळलें, कीं आपले चुलतसासरे गोविंदबाबू आपणाला भेटावयाला आले होते; परंतु या घरांत त्यांनीं खाद्यपदार्थांना स्पर्शही केला नाहीं. अर्थात् आपली पत्नी घर सोडून कां गेली, त्याचें कारण लक्षांत यावयाला परेशनाथांना विलंब लागला नाहीं.

जगत्तारिणीला परत आणावयाला त्यांनीं शांतिपुरला माणुस पाठविला. परंतु ती आली नाहीं.

परेशनाथांनीं सरोजिनीला बोर्डिंगमध्यें ठेवलें. आणि प्रॅक्टिस जवळजवळ सोडून सुंदर नामांकित कार्यक्रम सुरू केला !

वडिलांच्या घरीं राहिलेल्या जगत्तारिणीला पतिराजांच्या अधःपाताच्या समग्र लीला ऐकूं येऊं लागल्या. परंतु त्या थांबविण्याचा तिनें लेशमात्र प्रयत्न केला नाहीं. ज्या पतीनें तिला आप्तेष्टांच्या समाजाबाहेर ओढून फेंकून दिलें, त्याच्यावर अभिमानानें तिनें इतका राग धरला, कीं त्याला मर्यादाच राहिली नाहीं !

अशा रीतीनें पांच वर्षांचा दीर्घ काल उलटला.

ज्योतिष विलायतेहून परत आला, आणि आईला घेऊन यावयाला तो आजोळीं गेला. परंतु आई आपल्या निश्चयानं अगदीं निश्चल राहिली. घरीं परत आली नाहीं.

रडत रडत जगत्तारिणी त्याला म्हणाली, " सगळं कांहीं तुझ्या कानांवर आलं आहे, ज्योतिष ! आतां तुम्हां सर्वांना सुख होईल अशा रीतीनंच तूं वाग, बाळ ! पण त्या नरकांत मला ओढून नको नेऊं बाबा ! मला तें सहन व्हायचं नाहीं. "

ज्योतिष म्हणाला, " आम्ही सारीं निराळं घर करून राहूं आई ! त्या

घराच्या छायेला दिखील वाटलं तर तूं येऊं नको. मी जें कांहीं मिळवीन त्यांत कसं तरी दुःखकष्टानं आमचं चालून जाईल. तूं आपली ये, आई ! "

शेवटीं, ज्योतिषला यश आलं. मोठ्या कष्टानें जगत्तारिणी घरीं यावयाला तयार झाली. कलकत्त्याला मुलाला निराळा संसार मांडावयाला सांगून ती तीर्थ-यात्रेच्या उद्योगाला लागली.

एका आठवड्यानें पुनः येऊन आईला घेऊन जावयाचें ठरवून ज्योतिष तिचा निरोप घेऊन निघून गेला.

परंतु इतक्या कालावधीचेंही कारण राहिलें नाहीं !

पांचच दिवसांनीं ज्योतिष परत आला. परंतु त्याच्या पायांत कांहीं नसून तो अनवाणी होता; अंगांत कांहीं नसून फक्त तेथें एक शाल लपटलेली होती.

मुलाचा तो शोकवेष पाहून जगत्तारिणीनें किंचाळून मोठमोठ्यानें आक्रोश सुरू केला.

ज्योतिष ज्या दिवशीं कलकत्त्याला परत आला, त्याच्या तिसऱ्या दिवशीं रात्रीं, हृद्रोगानें परेशनाथांचा अकस्मात् अन्त झाला.

दारुण अभिमानानें एक दिवस जगत्तारिणी घर सोडून निघून गेली होती. सुदीर्घ पांच वर्षांच्या कालावधीनंतर पुनः एक दिवस रडत रडत ती त्याच घरीं परत आली. परंतु इहलोकीं पतीची तिची पुनः भेट झाली नाहीं !

मुलीला शाळेच्या बोर्डिंगमधून काढून तिनें घरीं आणलें. तिचें पुनः पुनः आपादमस्तक निरीक्षण करून जगत्तारिणी भयविस्मयानें स्तंभितच झाली !

ज्योतिषला एकीकडे बोलावून नेऊन ती म्हणाली, " बहिणीचं लग्न तूं कसं करणार, सांग बघूं ? "

आईच्या मनांतील भावना लक्षांत येऊन ज्योतिष हंसत हंसत म्हणाला, " सरोजपेक्षांही मोठमोठ्या मुलींचीं लग्नं होतात, आई ! त्याबद्दल तूं अगदीं काळजी करूं नकोस. "

जगत्तारिणीनें डोळे वर करून विस्मयानें मुलाकडे पाहिलें.

क्षणभरानें ती म्हणाली, " काळजी करूं नको म्हणतोस. पण तें कसं होणार, बाबा ? तुझे वडील जें कांहीं करून गेले, तें कांहीं आतां परत येत नाहीं, हें मला ठाऊक आहे. परंतु मी जिवंत असतां पोटच्या, ब्राह्मण जातीच्या मुलाला कांहीं मुसलमान किरिस्तांवाच्या हातीं मी देऊं शकत नाहीं ! मग मुलीचं लगीन होवो अगर न होवो ! तुझ्याविषयीं मला काळजी नाहीं.

प्रायश्चित्त केलं, कीं सगळं कांहीं ठीकठीक होईल बघ. ती व्यवस्था काकांकडून समजावून घेऊनच आलें आहें मी. परंतु हजार प्रायश्चित्तं करून दिखील पोरीचं वय कांहीं कमी करतां येत नाहीं ना ? त्याला कांहीं उपाय आहे का ? ”

ज्योतिष म्हणाला, “ तुला सरोजचं वय कमी करायची जरूर नाहीं, आई ! फक्त दोन दिवस थोडी सबुरी केली पाहिजे. अगदीं उत्तम कुळचा उत्तम ब्राह्मण जांवई तुला मी आणून देईन. मुसलमानकिरिस्तांवांचीं घरं शोधीत तुला हिंडावं लागायचं नाहीं. ”

जगत्तारिणी एकदम रागानें त्याच्याकडे पाहूं लागली.

ज्योतिषही चकित होऊन गप्प बसला.

जगत्तारिणी चिडून म्हणाली, “ अजूनही सबूर करायला तूं मला सांगतोस, ज्योतिष ? ”

ज्योतिष आतां थोडासा गंभीर झाला.

तो म्हणाला, “ मी तुला सबूर करायला सांगतों, हा दोष खरोखर माझा नव्हे, आई ! ”

तिनें त्याच्याकडे प्रश्नमुद्रेनें पाहिलें.

“ दोष तुझा अन् बाबांचा. मी तर होतों लांब परदेशांत ! ”

मुलगा म्हणतो यांत असत्य कांहीं नाहीं, हें मनांतल्या मनांत जगत्तारिणीलाही कबूल करावें लागलें. परंतु ज्योतिष आश्वासन देतो, त्याप्रमाणें सत्कुलीन ब्राह्मण कुमार कसा काय आपणाला मिळणार, हें कांहीं तिच्या लक्षांत येईना !

शेवटीं कांहींशा निराशेनेंच ती म्हणाली, “ मनाला बरं वाटेल तें कर बाबा ! पण मी आपली कश्शांत नाहीं, हें मी तुला अगोदरपासूनच सांगून ठेवतें आहें. ”

असें म्हणून भाराक्रान्त हृदयानें ती तेथून कामाला निघून गेली.

प्रायश्चित्त घेऊन ज्योतिषनें वडिलांचें और्ध्वदेहिक केलें.

यानंतर थोड्याच काळांत एक विलायतेहून जाऊन आलेला बंगाली साहेब नावी मेहुणा म्हणून ज्योतिषच्या दृष्टिक्षेपांत आला. बॅरिस्टर होऊन दोन एक वर्षांपूर्वी तो कलकत्त्याला आला होता.

या शशांकमोहनचा रंग होता नेटिव्ह आणि मिजास होती ब्रिटिश ! तो बंगाली बोले अशुद्ध आणि इंग्रजी बोले चुकीचें ! थोड्याच दिवसांत त्याचें नियमित जाणें येणें अनियमित आणि सरोजिनीसंबंधींचा त्याचा मनोभाव अस्पष्टतेपासून अधिकाधिक सुस्पष्ट होऊं लागला.

जगत्तारिणीनें पडद्याच्या आडून जांवईबुवांचें आपादमस्तक निरीक्षण केलें, आणि क्रोधानें तिच्या पायांची आग मस्तकाला गेली !

आणि तो सर्व राग तिनें काढला मुलीवर !

सरोजिनीला तिनें एकीकडे बोलावून आणलें आणि तिची निर्भर्त्सना करीत ती झंकारली. " एकाद्या निर्लज्ज पोरीप्रमाणं तूं ज्याच्या त्याच्या समोर बाहेर पडतेस कां, तें मला सांग बघूं आधीं ! "

लज्जेमुळें, संकोचानें एवढीशी होऊन बिचारी सरोजिनी तिच्यापुढें मुकाट्यानें उभी राहिली.

परंतु एक शब्दही नंतर तोंडांतून न काढतां जगत्तारिणी रागानें गजगजत त्वरित गतीनें तेथून निघून गेली.

यानंतर अनंगमोहन ज्योतिषच्या बंगल्यावर पुष्कळ वेळ आला आणि गेला; परंतु ज्या व्यक्तीसाठीं जाण्यायेण्याची त्याची ही सारी धडपड, ती त्याच्या कधीं दृष्टीलाही पडली नाहीं !

आईचें करडें अनुशासन ध्यानांत ठेवून सरोजिनी अतिशय सावधपणें त्याच्या दृष्टीच्या आडआडच राहूं लागली.

ज्योतिषच्या हें ध्यानांत आलें.

एक दिवस तो बहिणीला म्हणाला, " सरोज, आजकाल तूं अशी पळून दूरदूर कां ग रहातेस ? "

सरोजिनीनें चटकन् मान खालीं घातली, आणि अस्पष्ट स्वरानें ती उद्गारली. " आई–"

अधिक कांहीं तिला बोलावें लागलेंच नाहीं !

निःस्तब्धपणें ज्योतिषही निघून गेला. एवढा एकच शब्द त्या घरांत पुरेसा होता !

यानंतर दोन महिने गेले.

एके दिवशीं सकाळीं या ' स्थळा 'संबंधाचें वकीलपत्र घेऊन ज्योतिष आई-कडे आला, आणि आपल्या अशीलासंबंधानें त्यानें बोलणें काढतांच तिच्याकडून त्याला रीतसर बोलणीं खावीं लागलीं !

मुलाला गप्प बसलेला पाहून आई थोडीशी नरम होऊन म्हणाली, " बरं, काय रे ज्योतिष, तुम्हीही विलायतेंत होतां, नाहीं असं नाहीं. पण अशा तऱ्हेचे उंडगे झालां होतां कायरे तुम्ही ? "

ज्योतिष धीरे धीरे म्हणाला, " सर्वच कांहीं एकसारखे होत नाहींत, आई !

कुणी कुणी थोडेबहुत बदलतही जातात. पण तसं असलं म्हणून असं स्थळ काय हातचं दवडणं ठीक होईल? शशांक बॅरिस्टर होऊन आला आहे, इतक्या अवकाशांत थोडी प्रॅक्टीसही त्याची जमली आहे! लग्न झाल्यावर सरोजिनी खराब हातो पडेल असं मला बिलकुल वाटत नाहीं. चाल-चलणुकींत थोडीशी तफावत पडली असेल; त्याची जर माफी करशील, आई, तर मला वाटतं, पुढं तो सुधारेलही!"

जगत्तारिणी म्हणाली, "मी तुला सांगून ठेवतें, ज्योतिष, कीं पुढं दिखील तो कधीं बरा व्हायचा नाहीं. दुसरं असं, कीं परदेशीं गेल्यामुळंच जो परदेशी होऊं शकतो, त्याच्यावर तर मी कधींही विश्वास ठेवणार नाहीं. अन् तूं सांग, ज्योतिष! हें तरी काय? हिंदुस्थानांत गेला, हिंदुस्थानी झाला, काबुलांत गेला, काबुली झाला, कटकला गेला, ओरिसी झाला!—नाहीं नाहीं-ज्योतिष, तूं आपला निरोप देऊन त्या पोराला घालवून लाव बाबा! अरे, तो काय माणुस आहे? वांदर आहे वांदर! माथं आपटून मीं मेलें तरी वानराच्या हातीं पोरीला मी देणार नाहीं!"

कोणासंबंधींही मत प्रकट करावयाला जगत्तारिणीला जसा बिलकुल अवकाश लागत नसे, तसाच, प्रकट केलेल्या तिच्या त्या मतांमध्येंही संशयाला किंवा द्विधाभावनेलाही यत्किंचित् थारा नसे! शिवाय, ज्या अपराधासाठीं तिनें प्रत्यक्ष पतीचाही त्याग करावयाला मागेंपुढें पाहिलें नाहीं, त्या अपराधाची कोणत्याही प्रलोभनामुळें ती क्षमा करणार नाहीं, हें ज्योतिषला निश्चितपणें माहीत होतें.

म्हणून तो मुकाट्यानें तेथून निघून गेला.

परंतु थोड्याच क्षणांनीं तो परत आला, आणि म्हणाला, "एक गोष्ट जरा विचार करण्यासारखी आहे. आई!"

आईनें विचारलें, "कोणती गोष्ट, रे?"

ज्योतिष म्हणाला, "सरोजिनीला तुम्ही ज्या तऱ्हेचं शिक्षण देत आलां आहां, त्यामुळं, तिच्या संमतीशिवाय हें काम होण्यासारखं नाहीं, आई! तसं झालं तर सगळ्यांत वाईट गोष्ट ती होईल! लहानपणापासून तिचा भार तुम्हीं बिलकुल घेतला नाहीं, दिलात परदेशी मेमच्या माथ्यावर! आतां मोठी झाल्यावर, तिच्या मनाचा ओढा कोणत्या बाजूला झुकला असेल, हें समजणं कांहीं फारसं कठिण नाहीं, आई!"

जगत्तारिणी यावर कांहीं न बोलतां गप्प राहिली.

ज्योतिष म्हणत होता, तें मनांतल्या मनांतही तिला नाकबूल करतां येत नव्हतें, आणि उघडपणीं तें कबूल करणेंही तिला अशक्य होतें!

कांहीं वेळ गप्प राहून जगत्तारिणी म्हणाली, " ठीक आहे तर मग, ज्योतिष! तुमची सर्वांचीच जर साहेब-मेम व्हायची इच्छा असेल, तर खुशाल व्हा. मात्र त्याच्या आधीं मला काशीला पाठवून द्या. मला जर हें सगळं सहन होऊं शकतं आहे, तर काशीवासही मला सहज सहन होईल. "

ज्योतिष चटकन् खालीं वांकला आणि आईच्या पायाची धूळ घेऊन त्यानें मस्तकाला लावली.

नंतर तो हंसत हंसत म्हणाला, " तर मग आई, मला दिखील काशीलाच येऊन राहिलं पाहिजे. आईला सोडून दुसऱ्या कुठंही राहून आमचं चालायचं नाहीं, हें तर मी विलायतेहून परत आलों तेव्हांपासूनच ठरून गेलं आहे, आई!"

जगत्तारिणीनें तोंड वर करून पाहिलें. तिच्या अन्तर्यामीं जी आग धगधगत होती, ती एका क्षणांत पार विझून तिचें अगदीं पाणी पाणी होऊन गेलें!

क्षणभर गाढ स्नेहभरानें मुलाच्या मुखाचें निरिक्षण करून तिनें एक उसासा टाकला, आणि ती फिरून गप्प बसली.

नंतर ती म्हणाली, " नाहीं बाळ! तूं आपला काशींतलं आपलं घर मोकळं करून ठेवायला पत्र लिहून टाक. नेहमीं आपली तुमच्या राशीला बसून माझीं मतं तुमच्यावर लादीत तुम्हाला मीं सारखा त्रास देत रहाणं योग्य नाहीं, अन् त्याची बिलकुल जरूरीहि नाहीं. "

ज्योतिष हंसला आणि म्हणाला, " हें तर फार उत्तम आहे, आई! चल, सगळीं मिळून आपण काशीलाच जाऊन राहूं या. "

कलकत्त्याच्या बंगल्यांत ज्या दिवशीं आई आणि मुलगा यांमध्यें हें संभाषण झालें, त्यानंतर थोड्याच दिवसांनीं सतीशला घेऊन उपेन्द्र ज्योतिषच्या बंगल्यांत येऊन उतरला होता. त्यानंतरच्या घटना वाचकांना सर्व माहीतच आहेत.

जगत्तारिणीनें सतीशला पाहिलें. त्याच्या गळ्यांतलें तें दोन कोसांवरून दिसणारें भरभक्कम जानवें तिच्या दृष्टीला पडलें. तो संध्या आन्हिक नियमित करतो, मुसलमान-किरिस्तावांचा स्पर्श झालेलीं पाव-बिस्किटेंही खात नाहीं, या गोष्टी तिला कळून आल्या. सतीश श्रीमान् असून निष्ठेनें धर्माचरण आचरणारा आहे, त्याच्या बापाजवळ गडगंज पैसा आहे, याचीही तिला उत्तम कल्पना आली.

सतीशच्या या प्रचंड गुणवत्तेमुळें जगत्तारिणी अगदीं मुग्ध होऊन गेली, तर त्यांत कांहीं नवल नव्हतें!

यानंतर, सतीश विलायतेला जाऊन पास होऊन जरी आला नसला तरी, फार काय पण इतके त्याचे कुसंस्कार असतांही, मुलीच्या मनांत त्याच्याविषयीं अश्रद्धेची, तिटकाऱ्याची भावना नाहीं—कोणाला ठाऊक, कदाचित् मनांतल्या मनांत ती त्याच्यावर प्रेमही करीत असेल, हें क्रमाक्रमानें आभासांनीं, इंगितांनीं तिच्या अनुभवाला येऊं लागलें. तेव्हांपासून जगत्तारिणीच्या दृष्टींतल्या संशयाचें स्वरूप पुनः पालटलें, आणि इतक्या कालावधींत सांचलेल्या वेदनाही शान्त होण्याच्या मार्गाला लागल्या.

शिवाय सतीशच्या तोंडच्या 'आई' या मधुर संबोधनाचाही तिला लाभ झाला.

परंतु त्यानंतर किती तरी दिवस सतीश तिला दिसलाही नाहीं. या कालावधींतील प्रत्येक दिवस जगत्तारिणीच्या मनाला विंधून अस्ताला जात होता. परंतु स्वतः उपक्रम करून यासंबंधाचा कांहीं उपाय शोधून काढावयाचा प्रयत्न तिनें कधीं केला नाहीं. कारण, तसा प्रयत्न केला, तर कदाचित् अतिशय वाईट बातमी आपणाला ऐकावी लागेल, अशी तिला अतोनात भीति वाटत होती.

आपल्या कन्येच्या मतामतावरच हा विवाह सर्वतोपरी अवलंबून नाहीं, याचीही जगत्तारिणीला यथार्थ जाणीव होती. कारण, सतीशचे वृद्ध वडील अजूनही हयात होते. कोणाला ठाऊक, ते या बाबतींत काय म्हणतील तें! याशिवाय, या विलायतची यात्रा केलेल्यांच्या घरच्या मुलीशीं लग्न करावयाला स्वतः सतीशलाही भय वाटून तो माघार घेणार नाहीं, याबद्दलही कांहीं स्थिरता होती असें नाहीं.

याप्रमाणें मोठ्या दुःखांत आणि दुश्चिंतेंत अनेक दिवस काढल्यानंतर, त्या दिवशीं वैद्यनाथला आल्यावर, सतीश बसून गप्पागोष्टी करीत आहे, असें जेव्हां एकाएकीं जगत्तारिणीच्या दृष्टीला पडलें, तेव्हां आनंदातिशयामुळें तिच्या डोळ्यांना पाणी आलें.

सतीशनें जवळ येऊन खालीं वांकून तिच्या पायांची धूळ मस्तकाला लावली.

तो कलकत्त्याहून पळून येऊन अज्ञातवासांत दिवस घालवीत असतां, सरोजिनीनेंच त्याला शोधून काढलें, ही हकीगत गप्पांमध्यें ज्योतिषनें आईला सांगितली.

आपली मुलगी मोठ्या संकटांत सांपडली होती, त्याची हकिगत ऐकल्यावर जगत्तारिणीनें सतीशच्या मस्तकावर हात ठेवून त्याला अनंत आशीर्वाद दिले.

आणि तीच संधि साधून इंग्रजी शिकून, इंग्रजांची भ्रष्ट नक्कल करणाऱ्यांना शिव्यांची लाखोली वाहून ती म्हणाली, " बाबा सतीश, तूं पोरीला मोठ्या बिडतींतून सोडवलंस. या गोष्टीचा त्यांना कधींही विसर न पडो म्हणजे झालें! पण बाबा, जंगलांत एकटंच रहायची तुला जरूर काय, सतीश ? तूं आमच्या घरचं मूल—जोंपर्यंत आम्ही इथं आहों, तोंपर्यंत इथं येऊन आमच्याजवळ रहायला तुला काय हरकत आहे ? "

सतीश हंसून म्हणाला, " छान आहें तिथं मी, आई! तिथं मला कसलाही त्रास नाहीं ! "

जगत्तारिणी म्हणाली, " त्रासाबिसाबद्दल नाहीं रे कांहीं ! पण एकटं रहाण्यांत बऱ्याच अडचणी अन् संकटं येण्याचा संभव असतो. आमच्या या बंगल्यांत पुष्कळ खोल्या रिकाम्या आहेत. तूं अगदीं बेलाशक निघून ये. इथलं हवापाणी अगदीं तिथल्यासारखंच आहे. मग कां उगीच अडचणी सोसायच्या माणसांनीं ? "

सरोजिनीनें सतीशकडे पाहिलें, आणि ती गालांतल्या गालांत हंसून म्हणाली, " तुला नाहीं कल्पना आई, त्यांच्या हरकतीची इथं येण्याबद्दलच्या—"

सर्वच श्रोते तिच्याकडे पाहूं लागले.

क्षणभरानें पूर्ववत् हंसत ती म्हणाली, " इथं ते आले, तर त्यांची जात जाईल ना, आई ! "

जगत्तारिणीला तोंपर्यंत आंतल्या गोष्टी कांहीं माहीत नव्हत्या. मनांतल्या मनांत अतिशय असंतुष्ट होऊन ती म्हणाली, " तूं तरी खूपच आहेस कीं, सरे ! आम्ही अशा आहों तरी कोण, कीं आमच्या इथं येतांच लोकांची जात जाईल ? "

सरोजिनी कांहीं न बोलतां सतीशकडे एकवार पाहून गालांतल्या गालांत हंसूं लागली.

जगत्तारिणी क्षणभरानें सतीशला उद्देशून म्हणाली, " नाहीं बाबा सतीश ! पोरीच्या बोलण्यावर तूं कांहीं दिखील विश्वास ठेवूं नकोस ! तसं जर कांहीं असतं, तर उपेन आपल्या बायकोला घेऊन आमच्या घरीं येऊन इतके दिवस कसा राहिला असता ? त्याची कुठं नाहीं गेली जात ती ?

तूं अशी उगीच याला खोटंनाटं कांहीं तरी बोलून भीति दाखवूं नकोस, सरे! सांगून ठेवतें तुला."

सरोजिनी तोंड फिरवून हंसूं लागली.

सतीश म्हणाला, "नाहीं, आई! जात कशानं जाणार आहे? मी तर बहुतकरून दररोज येतोंच आहें कीं इथं. रात्रीचं जेवण तर माझं याच घरीं होतं आहे अलीकडे."

त्याच्या तोंडचे हे शब्द ऐकून जगत्तारिणीला अतोनात आनंद झाला.

पुलकित चित्तानें ती म्हणाली, "ये हो, असाच नेहमीं येत जा, बाबा! निदान, मी जोंपर्यंत आहें, तोंपर्यंत माझ्याकडेच दररोज येऊन तुला जेवून जायला हवं हं, सतीश!"

असें म्हणून ती फराळाची व्यवस्था करण्याकरितां झटकन् तेथून निघून गेली.

सरोजिनीनें विचारलें, "तुम्ही तर मला गाणं शिकवायचं कबूल केलं होतं?"

सतीश म्हणाला, "मी तर बहुतेक रोज इथं येतों आहें. शिकलांत तर शिकतांही येईल."

सरोजिनी मान उडवून म्हणाली, "तें कसं जमणार?"

"कां बरं?"

सरोजिनी म्हणाली, "तुम्ही आलां म्हणजे सर्व मंडळी तुमचं गाणं ऐकायला येतात. त्यामध्येंच मी शिकायचं वाटतं?"

सतीश हंसून म्हणाला, "मग असं करा ना? 'नो ॲडमिशन' असं ओरडणारा एक दरवान तुम्ही दरवाज्यावर बसवूनच ठेवा, अन् कुणाला आंत येऊंच देऊं नका."

सरोजिनी म्हणाली, "त्यापेक्षां आई म्हणते असंच करा ना! त्या जंगलांत उगीच एकटे पडून नका राहूं."

परंतु जंगलांत पडून रहावयाच्या प्रयोजनाविषयीं इतरांजवळ कांहींही सांगून चालण्यासारखें असलें, तरी सरोजिनीजवळ बोलून जाण्यासारखें नव्हतें. तेव्हां, सतीश गप्पच बसून राहिला.

सरोजिनी पुनः म्हणाली, "बरं, दादा म्हणाला, कीं पांचसहा दिवसांनीं आपण कलकत्त्याला जाणार आहों म्हणून. तर मग आमचं इकडे पहाणार सवरणार कोण?"

सतीशनें विचारलें, "किती दिवसांकरतां जाणार आहेत ज्योतिषबाबू?"

सरोजिनी म्हणाली, "कमींत कमी सात आठ दिवस तरी त्याला तिथं रहावंच लागेल."

सतीश म्हणाला, "तर मग ती व्यवस्थाही तेच करून जातील. अन् मी म्हणतों, एवढं भय तरी कसलं आलं आहे? तुम्ही मंडळी कांहीं आम्हा हिंदूंच्या घरच्या असूर्यंपश्या नव्हत, कीं पुरुषमाणुस कुणी घरांत नसलं, तर अगदीं मुष्किल पडेल तुम्हांला! तुम्हीच तर किती पुरुषांना—"

क्षणार्धांत सरोजिनीचं मुखमंडल आरक्त झालें.

ती जरा चिरडीच्या स्वरानें म्हणाली, "आम्ही काय करतों, तें ऐकू द्या तरी! पुरुषांचे कान कापून नेतों, कीं करतों काय? कीं हिंदूंच्या घरच्या बायकाच नव्हे आम्ही?"

तिच्या या उद्गारांनीं आतां मात्र सतीश चांगलाच खजील झाला.

स्वतःला सावरून कांहीं तरी बोलावें म्हणून तो जरा वर मान करून पहातो, तों बॅरिस्टर शशांकमोहनला घेऊन ज्योतिष खोलींत येत आहे असें त्याच्या दृष्टीला पडलें.

नेहमीं ज्योतिष जात असे त्याप्रमाणें आजही तो फिरावयाला स्टेशनकडे गेला असतां, बॅरिस्टरसाहेब फर्स्ट क्लासच्या डब्यांतून खालीं उतरत आहेत, असें त्याला आढळून आलें.

खोलींत पाऊल टाकतांच, शशांकमोहन हात पुढें करून त्वरेनें सरोजिनी-समोर जाऊन उभा राहिला. आणि तिच्याशीं करमर्दन करून तिला त्यानें कुशल विचारलें.

आपल्या अशा अकस्मात् आगमनाची कैफियत देतांना तो म्हणाला, "कोण जाणे बुवा कां तें, पण कलकत्त्यांत रहाणं मला अगदीं असह्य झालं पहा. मग कसलाही तिळमात्र विचार न करतां मी स्टेशनवर आलों, अन् देवघरचं फर्स्ट क्लासचं तिकिट घेऊन गाडींत जाऊन बसलों. पण हें सगळं माझ्या हातून कां झालं, त्याचं कारण अजून दिखील माझ्या ध्यानांत येत नाहीं."

नंतर बॅरिस्टरसाहेबांनीं स्वतःच जवळची एक खुर्ची ओढून घेतली, आणि तिच्यावर विराजमान होऊन ते सारखं अनिर्गलपणें बोलत राहिले.

त्यांना आलेले पाहून सरोजिनीचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता. एकाददुसऱ्या शब्दाखेरीज मग तिच्या तोंडून कांहीं बाहेर पडलें नाहीं!

दहा एक मिनिटें अशा स्थितींत गेलीं.

सतीश गप्पच बसला होता. तो उठून जाऊं लागला.

त्याच्याकडे नजर जातांच मान जरा अधिकच ताठ करून शशांकमोहननें विस्मयस्वरानें सरोजिनीला विचारलें, "यांना कुठं तरी पाहिल्यासारखं वाटतं, नाहीं ?"

सरोजिनीच्या फटफटीत चेहऱ्यावर एकदम क्षोभाची लाली चढली.

ती मान फिरवून संक्षेपानें म्हणाली, "कुठं पाहिलं असावंत, तें मला नाहीं सांगतां यायचें—"

थोड्याच वेळानें फराळाला येण्यासाठीं जगत्तारिणीनें जेव्हां सतीशला निरोप पाठविला, तेव्हां, कोणाशीं कांहीं न बोलतां सतीश केव्हांच तेथून सटकला होता, असें आढळून आलें.

यानंतर तीन दिवसपर्यंत सतीश तिकडे फिरकलाही नाहीं.

तो न दिसल्यामुळें जगत्तारिणी आंतल्या आंत खूब संतापली, आणि अत्यंत उद्विग्नही झाली.

मुलाला एकीकडे बोलावून आणून तिनें कटु वाणीनें त्याला विचारलें, "आणखी किती दिवस ही ब्याद इथं रहायची आहे रे ? मी म्हणते कीं, उलट तूंच त्या बेवकूब माणसाला स्पष्ट सांग, कीं इथं रहायची तुला आतां कांहीं जरूर नाहीं !"

ज्योतिषनें या मात्राज्ञेचें कसें काय पालन केलें, हें कांहीं मला सांगतां याव-याचें नाहीं. परंतु ज्या हेतूनें आपण येथें येतों, तो हेतु साधण्याची आशा आतां आपणाला तिळमात्र नाहीं, अशी जाण्यापूर्वी शशांकमोहनची खात्री झाली होती. आणि तो हेतु साधण्यासारखी भाग्यवान् व्यक्ति म्हणजे सतीशच होय, हेंही त्याला उत्तम कळून चुकलें होतें.

साहेबांचा चेहरा काळाठिक्कर पडला. परंतु झालेला आघात त्यानें सभ्यपणेंच सहन केला. इतकेंच नव्हे, तर जातांना सरोजिनीला भेटून तिचा निरोप घ्याव-याचाही त्यानें प्रयत्न केला नाहीं.

गाडींत बसल्यानंतर, शेवटच्या निरोप घेण्यापूर्वीच्या क्षणीं अगदीं अकस्मात् शशांकमोहननें ज्योतिषला प्रश्न केला, "सतीशबाबूंनीं कुठंसा डॉक्टरी शिकण्याचा प्रयत्न केला होता, त्याचं काय झालं ?"

ज्योतिष मस्तक हलवून म्हणाला, "मला वाटतं, कांहीं झालं नाहीं. होमिओपॅथिक स्कूलमध्यें कांहीं दिवस तो शिकत होता इतकंच !"

"ओ : ! होमिओपॅथिक स्कूल !"

असें उद्गारून शशांकनें दुसरी गोष्ट काढली.

## १३

भाऊ फार आजारी असल्याचा टेलिग्राम आल्यामुळें जगत्तारिणीला घाईघाईनें शांतिपुरला जावें लागलें होतें. त्यामुळें, सतीशकडे विवाहाची गोष्ट काढावयाला त्या वेळीं तिला चांगलीशी संधिच मिळाली नव्हती.

म्हणून आज त्याला भोजनानिमित्त बोलावून, त्याला सुंदर सुंदर खाद्यपदार्थांनीं परितृप्त करून, त्याच्यापाशीं तो प्रस्ताव करावा, असा मनाशीं तिनें संकल्प केला, आणि सकाळीं उठतांच, सतीशला निमंत्रण करण्यासाठीं तिनें दिवाणजीला पाठविलें.

ज्याचें येणें सर्वतोपरी अनिष्ट आणि मनाला क्लेशदायक, तोच शशांकमोहन अकस्मात् आल्याचें ऐकून जगत्तारिणीच्या असंतुष्टतेला आणि रागाला आज सीमाच राहिली नाहीं.

मनुष्याला जी अतिशय प्रिय किंवा इष्ट गोष्ट, तींत एकाएकीं विघ्न आलें म्हणजे त्याच्या संदेहाला कांहीं हिशेबच रहात नाहीं ! याच सुमाराला सरोजिनी बाहेरून आलेली जगत्तारिणी दृष्टीला पडली. तत्क्षणीं, शशांकच्या या आकस्मिक पुनरागमनामध्यें कदाचित् या हतभागी पोरीचा हात असण्याचा पुष्कळ संभव आहे, अशी कल्पना मनांत येऊन तिच्या अंगाचा भडका होऊन त्यांतून जणूं विषाच्या ज्वाला निघूं लागल्या !

आपल्या बॅरिस्टर मुलावर तर तिचा कधींही संपूर्ण विश्वास नव्हता. वस्तुतः तिच्याकडे यांत फारसा दोष येण्यासारखा नव्हता. हिंदु आचारांपासून 'भ्रष्ट' झालेलीं तिचीं मुलें सतीशच्या एकनिष्ठ आचारपरायणतेकडे प्रीतीच्या दृष्टीनें पहातील, ही गोष्ट तिला मनांत कधींही पटली नसली, तर त्यांत कांहीं नवल नाहीं.

मुलीवर कटूक्तींचा वर्षाव करून जगत्तारिणी स्वयंपाकघरांत आली, आणि स्वयंपाकाच्या तयारीसंबंधानें मोलकरणीला जरूर त्या सूचना देऊन ती स्नान करावयाला गेली.

तासभरानें जगत्तारिणी परत येऊन मुलीकडे पहाते, तों तिचे डोळे जणूं अगदीं झळाळूनच निघाले !

मधल्या अवकाशांत घाईघाईनें स्नान उरकून घेऊन रेशमी वस्त्रें परिधान करून सरोजिनी आईच्या स्वयंपाकघरांत येऊन दाखल झाली असून आपल्या अनभ्यस्त हातांनीं विळीवर भाजी चिरीत आहे, आणि मोलकरीण जवळ बसून तिला त्यासंबंधानें सूचना देत आहे, असें विलक्षण दृश्य तिच्या दृष्टीला पडलें.

जगत्तारिणी चार दोन क्षण लेकीकडे कौतुकानें पहात स्तब्ध उभी राहिली!

किंचित् स्मित करून ती संतोषानें मान डोलवून म्हणाली, "हिंदु मुलींना दुसरा कोणताहि पोषाक इतका शोभत नाहीं, याची तुला आज या पोषाखांत पाहून माझी पुरी खात्रीच झाली, पोरी! तुझ्याकडे पाहून आजच्याइतका आनंद मला जन्मांत कधीं झाला नव्हता!"

सरोजिनी लज्जासंकोचानें मान खालीं घालून काम करूं लागली.

आई तिला जरा खोंचून म्हणाली, "मला सगळं ठाऊक आहे, पोरी! अगदीं सगळं ठाऊक आहे! तो हव्या तेवढ्या परीक्षा पास होऊन आला असूं दे. त्याला 'वांदरा'शिवाय दुसरं कांहीं दिखील मी म्हणणार नाहीं, अन् कुणाचाही इषारा मिळून तो बेशरम वानर पुन्हां इथं आलेला असेना कां, मी जिवंत असतां, तें कांहीं जमण्यासारखं नाहीं, हें मी अगदीं शपथेवर सांगतें तुला, सरे!"

सरोजिनी खालीं पहात होती; तिनें मान वर केलीच नाहीं.

थोडा वेळ गप्प राहून जगत्तारिणी पुनः म्हणाली, "ज्योतिष म्हणतो, लहानपणीं ज्याला जसं शिक्षण मिळालं असतं, तसा त्याच्या मनाचा कल पुढं झुकत असतो. पण तें खरं होणार कसं? रात्रंदिवस हॅट-कोट पेहरून राहिल्याशिवाय पसंत पडणारच नाहीं, हें तरी कोठल्या शास्त्रांत लिहिलं आहे गा पोरी?"

सगळी तयारी पुरी करून घेऊन जगत्तारिणी स्वयंपाक करावयाला बसली.

मध्येंच ती लेकीला म्हणाली, "माझ्या मनांतील वासना देवानं जर पुरी केली तर तुझं कल्याण झाल्याशिवाय रहाणार नाहीं, असाच तुला अनुभव येईल बरं, बाळ!"

आईच्या मनांतली वासना काय आहे, हें स्पष्ट ऐकण्याच्या आशेनें सरोजिनी खालीं मान घालून, पण कान खडे करून सज्ज राहिली. परंतु जगत्तारिणी पुढें त्याबद्दल कांहीं बोलली नाहीं. पदार्थ रांधण्यांत ती व्यग्र होऊन गेली.

गप्प बसल्या बसल्या, मनांतल्यामनांत आई कसला विचार करते आहे, हें सरोजिनीला चांगलें कळत होतें, आणि हॅट-कोटधारी व्यक्तीसंबंधाच्या तिच्या

टोमण्यांनीं तिला ज्या एकसारख्या पराण्या लागत होत्या, त्यांचाहि प्रतिवाद करणें कांहीं कठीण नव्हतें. परंतु जगत्तारिणीचा स्वभाव पराकाष्ठेचा असहिष्णु असल्यामुळें कोणतीही गोष्ट तिला शेवटपर्यंत ऐकविणें शक्य नाहीं, हें जाणून ती गप्प बसून राहिली.

दहा वाजावयाला आले. तोंच एक घोटाळा झाला !

दिवाणजींना बाजार करावयाला जगत्तारिणीनें पाठविलें होतें. त्यांनीं बारकाईनें शोध करून कोठून तरी एक जबर मोठा रुईमासा मिळवून आणून हजर केला.

स्वयंपाकघरांतून बाहेर डोकावून जगत्तारिणीनें तो पाहिला. अतिशय संतुष्ट होऊन ती उद्गारली, " वाः ! फारच छान आहे मासा !—पण—"

सरोजिनी म्हणाली, " सतीशबाबूंना यायला अजून अवकाश आहे, आई ! अजून कांहीं दहा वाजले नाहींत. "

जगत्तारिणी म्हणाली, " वाजाबिजायची गोष्ट नाहीं ग पोरी ! आज आहे माझी एकादशी. मला तर कांहीं आज माशाला शिवायचं दिखील नाहीं. मनांत विचार करतें आहें मी, कीं तुमचा ठाकूर माशाचं रांधप करूं शकेल कीं नाहीं ? बरं, पहा ग जाऊन, एलोकेशी ! त्या खोलींतलं रांधप कुठपर्यंत आलं आहे–"

मोलकरीण बाहेर पडतांच सरोजिनी लाजेनें खालीं पहात हळुहळू म्हणाली, " तूं सांगितलं संवरलंस, तर मला नाहीं का हें करतां येणार ? "

जगत्तारिणीनें विस्मयानें विचारलें, " येईल तुला ? "

" येईल-येईल, आई ! तूं मला सांग म्हणजे झालं. "

मोलकरीण जागच्या जागीं उभी राहिली. असा सुंदर दिसणारा भला मोठा रोहित मासा एका अडाणी व्यक्तीच्या हातीं पडून अगदीं नासधूस होऊन जाईल, या आशंकेनें ती फार भ्याली.

ती आंत डोकावून म्हणाली, " तें काय जमणार आहे, आई ? बाहेरचीं माणसं यायचीं आहेत जेवायला ! "

जगत्तारिणी मनाशीं विचार करीत चार दोन क्षण उभी राहिली.

नंतर ती म्हणाली, " असूं दे ! सतीश आमचा कांहीं बाहेरचा माणूस नाहीं. आमच्या घरचंच मूल तें ! तूं अशी हां करून तिथं उभी नको राहूं, एलोकेशी ! पलीकडली चूल चांगली सारवूनसुरवून मासा छान चिरून आण

वघूं. अन् तूं एक काम कर अगोदर, बाळ! त्या रेशमी साडीनं भागायचं नाहीं ग! पण बरं–राहूं दे ती आतां. पण तिचा पदर असा फलकूं देऊं नको. नीट कमरेला चांगला घट्ट बांध तो!"

सरोजिनीनें तिच्याकडे एकवार पाहिलें, आणि लगेच तिच्या हुकुमाची तामिली केली.

जगत्तारिणी हंसून म्हणाली, "आज आमिष रांधपाचा पहिला धडा गिरवायला सुरूवात होऊं दे तुझी! माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे, सरे! आजचा दिवस तुझ्या आमिष हाताचा–म्हणजे तुझ्या चिरसौभाग्याचा प्रारंभ ठरो!"

मातेच्या या आशीर्वादामुळें सरोजिनीचा चेहरा आणखींही थोडा खालीं वांकला.

सुमारें तासाभरानें आईला कांहीं विचारण्याकरतां म्हणून ज्योतिष स्वयंपाक-घराकडे आला.

दरवाज्याशीं उभा राहून तो पहातो, तों बिचारा विस्मयानें अगदीं स्तिमितच होऊन गेला!

त्यानें पुनः एकवार लक्षपूर्वक आंतलें दृश्य पाहिलें, आणि तो म्हणाला, "कोण रांधतं आहे ग तिथं, आई? सरोज तर नव्हे?"

आई किंचित् हंसून म्हणाली, "पहा बरं नीट—ओळख पटते कीं नाहीं, पाहूं तरी—"

"ओळख न पटण्याचा संभवच अधिक, आई! पण काय ग, सरी खरो-खरच रांधते आहे, कीं तुलाच आणखी हातानं केलेलं बरं असं वाटायला लागण्याइतका जादा त्रास देते आहे?"

जगत्तारिणीनें हळूच त्याला कसलीशी खूण केली, आणि ती म्हणाली, "रांधपावाढपाचं काम काय हिंदूघरच्या मुलींना निराळं शिकावं लागतं, ज्योतिष? आम्हांला जन्मापासूनच तें शिक्षण मिळत असतं! पण—"

"काय, आई!"

मुलाला जरा आड नेऊन जगत्तारिणी म्हणाली, "पण ज्योतिष, मला आतां भीति वाटायला लागली आहे, कीं सतीशला जर कळलं, तर पोरीच्या हातच्या सैंपाकाला तो शिवेल कीं नाहीं, कोण जाणे!"

आईची ही शंका ऐकून ज्योतिष खो खो करून हंसूं लागला.

सरोजिनीही त्या हंशानें चमकून त्याच्याकडे पाहूं लागली.

ज्योतिष म्हणाला, " आई, सतीशला तूं मनु, पराशर यांच्या पठडींतला एकादा मस्त मुनि ऋषि कां मानते आहेस, मला कळत नाहीं ! "

आई म्हणाली, " तुमच्यापेक्षां तर बरा तो ? "

ज्योतिष म्हणाला, " तसा तरी बरा कसा, तें ऐकूं दे तरी ! याच सरोजनं जाऊन त्यांचा डाळ-भात पकवला, म्हणून तर त्या रात्रीं स्वारीला पोटभर खायला मिळालं—नाहीं तर चक्क उपास पडला असता बेट्याला !—माहीत आहे ? "

ही बातमी ऐकून जगत्तारिणीला विस्मय तर वाटलाच; पण फार आनंदही झाला.

तिनें विचारलें, " कधीं रे ? "

ज्योतिषनें त्या रात्रीं घडलेला ' इतिहास ' आईला सरळपणें निवेदन केला.

ती हकीगत ऐकून जगत्तारिणी आनंदानें बेहोषच होऊन गेली !

परंतु चार दोन क्षणांनीं दुखावलेल्या अभिमानाच्या स्वरानें ती लेकीला म्हणाली, " धन्य आहे तुझी तरी, पोरी ! मी तेव्हांपासून काळजीनं चूर झालें आहें, अन् तूं खुशाल चूप बसून माझी मजा बघते आहेस होय ? "

ज्योतिष हंसून म्हणाला, " अग, पण सरीला तरी काय माहीत, आई, कीं मनांत काळजी करून तूं अगदीं हैराण होऊन गेली आहेस ? त्या दिवशीं कांहीं मला हिचा स्वयंपाक चाखायला मिळाला नाहीं. पण आज खाऊन पाहूं या पोटांतून पडतांच पोरगी रांधायला कसं काय शिकली आहे ती ! "

असें म्हणून तो हंसत हंसत निघून गेला.

सरोजिनी लाजेनें खालीं पहात काम करीत होती, तिच्याकडे जगत्तारिणी कांहीं वेळ अगदीं टक लावून पहात राहिली.

नंतर अतिशय स्नेहपूर्ण स्वरानें ती म्हणाली, " त्यांत लाज कसली, बाळ ? आपल्या माणसाला रांधून वाढून पोटभर खाऊं घालण्यापेक्षां अधिक भाग्याची गोष्ट हिंदु मुलीला नाहीं बरं, सरे ! मी माझं आह्निक तोंपर्यंत थोडंसं आटोपून घेतें–"

असें म्हणून जगत्तारिणी थोडा वेळ बाहेर गेली.

परंतु सगळा दिवस गेला तरी सतीशचें नखही तेथें कोणाच्या दृष्टीला पडलें नाहीं ! तो न येण्याचें कारणही कोणी सांगून गेला नाहीं !

हा विलक्षण प्रकार पाहून जगत्तारिणी अत्यंत अस्वस्थ होऊन स्वतःशीं चडफडत होती !

संध्याकाळ उलटल्यानंतर तिनें ज्योतिषला बोलावून आणलें, आणि त्याला ती म्हणाली, " ज्योतिप, त्याला खात्रीनं कांहीं तरी झालं आहे ! कुणाला तरी पाठवून त्याचा समाचार तरी कां नाहीं रे आणलास आतांपर्यंत ? "

ज्योतिष अत्यंत तुच्छभावानें म्हणाला, " इतक्या दूर आणखीन् कुणाला ग पाठवूं मी, आई ? "

जगत्तारिणीला या भाषणाचें आणि त्यापेक्षांही त्याच्या भाषणपद्धतीचें आश्चर्य वाटलें.

तिनें ताबडतोब विचारलें, " कां रे ? दरवान नसता का जाऊन आला ? "

" जरूर काय पण त्याची, आई ? "

जगत्तारिणी भृकुटी वक्र करून मुलाकडे पहातच राहिली.

तिनें विचारलें, " तूं हें काय बोलतो आहेस, ज्योतिष ? सतीश आजारीबिजारी आहे कीं काय, हें बघून त्याचा समाचार घेऊन यायची दिखील जरूर नाहीं म्हणतोस ? "

" काय आहे जरूर ? तो कांहीं आमचा आप्त नाहीं, मित्रही नाहीं. त्याच्यासाठीं काळजी करीत मरण्याचं मला कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. "

असें म्हणून ज्योतिष तेथून निघून गेला.

सतीशबद्दल मुलाच्या तोंडचे उद्गार ऐकून जगत्तारिणी अगदीं हतबुद्धच होऊन गेली !

फक्त मध्यें हें थोडेसे तास गेले होते ! एवढ्या अवकाशांत सतीश या मंडळीचा कोणीच नव्हे, असें झालें तरी काय ? आपल्या तोंडावर मुलानें असें बेफाट उत्तर दिलेलें पाहून, आपणाला हें एकादें वाईट स्वप्न तर पडत नाहीं ना, असा जगत्तारिणीला भास झाला. तेथें कांहीं वेळ भ्रमिष्टाप्रमाणें ती उभी राहिली. उपवासानें क्षीण झालेल्या आपल्या मेंदूंत अगदीं अल्प क्षणांत कसली काय प्रचंड उलथापालथ होत आहे, हें तिच्या कांहीं लक्षांतच येई ना !

ती हळुहळू तेथून वर आपल्या खोलींत जाऊन बिछान्यावर पडली.

तिनें सरोजिनीला बोलावून आणलें. तिच्या चेहऱ्याकडे नजर जातांच जगत्तारिणीला आतां अधिकच भय वाटूं लागलें.

थोडा वेळ गप्प राहून तिनें मृदु स्वरानें मुलीला विचारलें, " सतीश कां

आला नाहीं, हें ठाऊक आहे तुला, सरे ? ”

सरोजिनी म्हणाली, “ नाहीं. ”

मुलीच्या तोंडचें हें अत्यंत संक्षिप्त उत्तर ऐकून जगत्तारिणी एकदम उठून बसली.

लेकीकडे तीक्ष्णपणें पहात तीव्र स्वरानें ती उद्गारली, “ नाहीं ! अर ठाऊक नव्हतं, तर कुणी माणूस पाठवून तुला बातमी आणायला काय झालं होतं ? हें दिखील मी तुला सांगायला हवं काय, पोरी ? ”

सरोजिनी मृदु वाणीनें उत्तरली, “ दादा म्हणाला, माणूस पाठवायचीं कांहीं जरूरी नाहीं. ”

“ कां नाहीं, तेंच मला कळलं पाहिजे. जा, सरे, अशीच्याअशी जाऊन दरवानला तिकडे पाठवून दे. सतीशचा समाचार घेऊन लवकर येऊं दे त्याला. ”

“ दरवान तर इथं नाहीं, आई ! उपेनबाबूंना तार करायला दादानं त्याला पाठवला आहे. ”

जगत्तारिणीला आश्चर्य वाटलें.

“ उपेनबाबूंना ? एकदम त्याला टेलिग्राम करायचं कारण काय ? ”

“ मला कांहीं सर्व हकीगत माहीत नाहीं, आई ! तूं आपली दादालाच विचार. ”

असें म्हणून आईची एक प्रकारें उपेक्षाच करून सरोजिनी तेथून निघून गेली.

आतां मात्र जगत्तारिणीच्या मनांत अकस्मात् कल्पना चमकली, कीं मधल्या अवधींत सतीशचा निषेध करून त्याला न येण्याविषयीं सूचना करण्यांत आली असावी. यांत हेतु काय, हें तिला सांगण्याची कोणाची इच्छा नसली, तरी तो कांहीं तरी अत्यंत गूढ आणि महत्त्वाचा असावा, यांत कांहींच शंका नव्हती ! आणि या भयंकर अनिष्ट गोष्टीच्या मुळाशीं हा शशांकमोहनच असून, तसा दुष्ट उद्देश मनांत धरूनच तो परत येथें येऊन हजर झाला आहे, याविषयींही तिच्या मनांत आतां संशयाला कांहीं जागा राहिली नाहीं.

परंतु तें कारण कितीही महत्त्वाचें आणि भयंकर असो, आपण स्वतः घरांत सशरीर हजर असतां, आपली बिलकुल अनुमति न घेतां आपल्या मुलांनीं सतीशला यावयाला मनाई करावी, याबद्दल जगत्तारिणीला अतिशय राग आला.

तत्क्षणीं एलोकेशीकडून ज्योतिषला बोलावून आणून तिनें त्याला विचारलें, “ सतीशला आमच्या घरांत यायची तूं बंदी केली आहेस, ज्योतिष ? ”

ज्योतिष आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " नाहीं. तुला हें सांगितलं कुणीं ?"

".सतीशसंबंधानं तूं उपेनला टेलिग्राम केला आहेस का ?"

" हो."

" सतीशनं काय केलं आहे ?"

ज्योतिष उत्तर देऊं न देऊं या विचारांत कांहीं क्षण गप्प राहिला.

नंतर तो म्हणाला, " त्यानं जें कांहीं केलं आहे, तें जर खरं असेल, तर त्याच्याशीं आमचा कसलाही संबंध रहाणं शक्य नाहीं."

" ही बातमी तुला कुणीं सांगितली ? शशांकमोहननं ना ?"

ज्योतिष कांहीं बोलला नाहीं.

जगत्तारिणी संतापानें म्हणाली, " दुष्ट चांडाळ आहे मेला ! त्याच्या बोलण्यावर माझा तिळभर दिखील विश्वास नाहीं."

ज्योतिष म्हणाला, " पण माझा आहे. त्यापैकीं अर्ध जरी खरं असेल, तर सतीशाची सावली पडणं दिखील अतिशय तिरस्करणीय आहे !"

मुलाच्या भाषणाचा उत्तप्त स्वर ऐकूनच जगत्तारिणीला चमत्कारिक वाटूं लागलें. ती नरम होऊन म्हणाली, " ठीक आहे. पण काय प्रकार आहे, तें मला एकवार स्पष्टपणं कळूं तरी दे, ज्योतिष ! सतीशनं कांहीं चोरी डाकुगिरी केली नाहीं, किंवा खूनबीन करून तो पळूनही आला नाहीं. मग त्याच्या सांवलीचा दिखील तुम्हाला इतका तिटकारा कां वाटावा ? पोरसवदा छोकऱ्याच्या हातून चुकून जर कांहीं दोषबीष घडला असला—किती लोकांच्या हातून तर नेहमीं होतात !—तर त्याला सुधरून घ्यायला कितीसा अवकाश ?"

ज्योतिष जोरानें मान हलवून म्हणाला, " नाहीं, आई ! असले दोष माफ करण्यासारखे बिलकुल नसतात ! निदान, सरोजिनी तरी त्याला क्षमा करणार नाहीं, हें मी तुला अगदीं निश्चित सांगतों.

जगत्तारिणी कांहीं क्षण विचार करीत स्तब्ध बसली.

नंतर तिनें विचारलें, " पण सतीशाचा अपराध काय, तो तर मला सांग, ज्योतिष !"

" उद्यां काय तें सांगेन मी तुला. उपेनचं पत्र येईपर्यंत ही चर्चाच आतां मुळीं बंद राहूं दे."

असें म्हणून आईनें पुनः आग्रह करण्यापूर्वीच ज्योतिषनें तेथून घाईघाईनें काढता पाय घेतला.

मनाच्या क्षोभाच्या आवेगांत आतांपर्यंत जगत्तारिणी बिछान्यावर उठून बसली होती. मुलगा निघून गेल्यानंतर ती एकदम प्रेताप्रमाणें बिछान्यावर आडवी पडली.

तिनें एक मोठा थोरला उसासा टाकला, आणि ती स्वतःशीच उद्गारली, " देवा ! या कलियुगांत कुणावर विश्वास ठेवून रहावं, असं तूं कांहीं ठेवलंसच नाहीं, दयाघना ! "

कांहीं अनुमान, कांहीं आभास या साधनांनीं अनेक गोष्टी तिच्या ध्यानांत आल्या, आणि तिच्या डोळ्यांतून जोरानें अश्रुप्रवाह सुरू झाला.

परंतु ते अश्रु केवळ सतीशसाठीं नव्हते-पतीची आठवण होऊनही तिला या वेळीं फार वाईट वाटलें.

रात्रीं मुलीला बोलावून आणावयाला तिनें एलोकेशीला तिच्या खोलींत पाठविलें.

थोड्याच वेळांत एलोकेशी परत येऊन म्हणाली, " ताईसाहेबांना झोंप लागली आहे, आई ! "

हें ऐकतांच जगत्तारिणीनें कपाळावर हात मारून घेतला.

इतकी वाईट बातमी ऐकूनही जी मुलगी खुशाल डाराडुर झोंपूं शकते, ती अर्थात् सतीशपेक्षां त्या वानरावरच मनांतल्या मनांत अनुरक्त असली पाहिजे, असा सहजच तर्क करून जगत्तारिणी मुलीवर खूब संतापली. सरोजिनीसंबंधानें आतां यत्किंचित् स्नेहममता तिला वाटेना !

दुसऱ्या दिवशीं दुपारचे तीन एक वाजले असतील.

गेटासमोर सायकल खालीं आडवी ठेवून सतीश बाहेरच्या दिवाणखान्यांत आला.

त्याचा सुकून गेलेला चेहरा, अस्ताव्यस्त रुखे केंस, यांकडें नजर जाऊन तेथे बसलेली सर्व मंडळी चकितच झाली.

सरोजिनीनें चेहरा वर करून त्याच्याकडे पाहिलें. परंतु एक अक्षरही ती बोलली नाहीं.

ज्योतिषनें विचारलें, " तुम्ही काय आजारीबिजारी आहां काय, सतीशबाबू ? "

सतीशनें एकवार हंसण्याचा व्यर्थ प्रयत्न करून म्हटलें, " नाहीं बुवा ! "

पुढें कोणीच कांहीं बोलेना !

हें पाहून मनांतल्या मनांत सतीश चकितच झाला. आज बंगल्यांत येऊन

हजर होतांच, तक्रारी, फिर्यादी, आरोप यांना सीमाच रहाणार नाहीं, अशी मनांतल्या मनांत कल्पना करीतच तो इकडे आला होता.

सतीश बंगल्याच्या अन्तर्भागाकडे जावयाला निघाला. जातां जातां शांततेचा भंग करून तोच म्हणाला, " कालच्या अपराधाबद्दल प्रथम आईची माफी मागून मी येतों. मग पुढं काय तीं सारीं कामं—"

शशांक इतका वेळ सतीशकडे तीव्र दृष्टीनें पहात होता. घरच्या मंडळीच्या वतीनें त्या पाहुण्यानेंच उत्तर दिलें.

तो म्हणाला, " आई या वेळीं झोंपल्या आहेत. त्यांना उठवून त्यांची माफी मागण्याइतकी घाई कशाला, म्हणतों मी ? जरा बसा. तुमच्याशीं थोडं बोलायचं आहे आम्हांला—"

त्याच्यासारख्या परक्या माणसानें आपणाला उत्तर द्यावें, हें सतीशला मुळींच आवडलें नाहीं, आणि त्याची बोलण्याची तऱ्हा तर त्याला अतिशय तिरस्करणीय आणि अपमानकारक वाटली.

तो उद्गारला, " माझ्याशीं बोलायचं आहे ? "

शशांक म्हणाला, " हो–दुर्दैवानं तसा प्रसंग आला आहे खरा ! "

पुनः चार दोन क्षण निःस्तब्धतेंत गेले.

नंतर ज्योतिषकडे अंगुलिनिर्देश करून शशांक म्हणाला, " तुम्हाला खात्रीनं माहीत असेल, मी यांचा एक जिवलग मित्र आहें. नाहीं, नाहीं–ज्योतिषबाबू, तुम्ही उठूं नका. हें काय ? तुम्ही मंडळीच जर पळून चाललां तर कसं होणार ? माझी जी फिर्याद आहे, ती तुमच्यांसमोरच मी करणार आहें. बसा. दोघंजणही बसा तुम्ही—"

असें म्हणून त्यानें सरोजिनीकडे हेतुपूर्वक एक कटाक्ष टाकला.

परंतु सरोजिनी जी मान खालीं घालून बसली होती, ती तिनें वर केलीच नाहीं. त्यामुळें शशांकाचा तो प्रयत्न व्यर्थ गेला.

समोरच्या टेबलावर जोरानें हाताचा आघात करून शशांक आवेशानें म्हणाला, " लहानपणापासून माझा असा स्वभाव आहे, कीं ज्यांच्यावर माझं प्रेम असतं, त्यांच्यासंबंधानं डोळे मिटून मी कधींही उदासीन राहूं शकत नाहीं. त्यामुळं गेल्या खेपेला ऐकल्यापासून मनांतल्यामनांत मी म्हणालों, कीं हें कांहीं बरं नाहीं. सतीशबाबूंच्या या निर्जन अज्ञात-वासाची एकदां बातमी काढणं जरूर आहे. तुम्हाला कदाचित् माझा राग येईल, सतीशबाबू ! परंतु

मलाही माझ्या स्वभावाविरुद्ध जातां येणं कांहीं शक्य नाहीं. काय म्हणणं आहे तुमचं, ज्योतिषबाबू ? ”

कांहीं न बोलतां ज्योतिष मान खालीं घालून बसून राहिला होता. सतीशही स्तब्धपणें त्याच्याकडे पहात बसला.

सर्वच श्रोते गप्प बसल्यामुळें, त्या संयुक्त निःस्तब्धतेचा परिणाम असा झाला, कीं शशांकाच्या उत्तेजनाचा वेग आपोआपच ढिला होत आला !

कल्पनेपेक्षांही शांत स्वरानें तो म्हणाला, “ ज्योतिषबाबू माझे परम मित्र असल्यामुळं तुम्हाला कांहीं प्रश्न विचारायचा मला अधिकार आहे. तुम्हाला तर माहीतच आहे—”

त्याचें वाक्य पुरें करूं न देतां सतीश मध्येंच म्हणाला, “ नाहीं. मला तुमच्या मैत्रीची कांहींच माहिती नाहीं. परंतु तुमचे प्रश्न काय आहेत, ते तरी ऐकूं द्या. ”

शशांक आंवढा गिळून म्हणाला, “ तुम्ही इथं कां आला आहां, हें मला कळलं पाहिजे. ”

सतीश म्हणाला, “ माझी मर्जी म्हणून. तुमचा दुसरा प्रश्न ? ”

शशांक जरासा गळाठून, ज्योतिषला उद्देशून बोलूं लागला, “ सतीश-बाबूंची कलकत्त्यांतली मेस शोधून काढायला आम्हांला बराच त्रास पडला. राखालबाबूंना हे ओळखतात. त्यांनीं मला सांगितलं—”

सतीशाचे डोळे जणूं आगीनें धगधगूं लागले !

तो ओरडून म्हणाला, “ चुलींत जाऊं दे तो राखालबाबू ! तुमचं स्वतःचं काय म्हणणं आहे तें सांगा. ”

या वेळीं मात्र चेहरा वर करून ज्योतिष म्हणाला, “ सतीशबाबू, शशांक माझ्या सांगण्यावरून तुम्हाला प्रश्न विचारतो आहे. तुमची इच्छा नसेल, तर त्याचा तुम्ही जबाब देऊ नका. परंतु त्याचा तुम्ही अपमान करूं नका. आमच्या-बरोबर तुम्ही ज्या रीतीनं वागतां आहां, ती लक्षांत घेतां, तुम्हाला आम्हीं एक प्रश्नही विचारणं योग्य नव्हतं. केवळ आमच्या आईसाठींच तुमच्या स्वतःच्या तोंडून ती गोष्ट ऐकणं जरूर आहे. ठीक आहे—मीच तुम्हाला प्रश्न करतों. सावित्री ही कोण अन् तिच्याशीं तुमचा संबंध काय ? ”

सतीश कांहीं क्षण त्याच्याकडे पहात स्तब्ध राहिला.

नंतर तो म्हणाला, “ सावित्री कोण, तें मला माहीत नाहीं, ज्योतिषबाबू !

परंतु तिच्याशीं माझा संबंध काय, या प्रश्नाचं उत्तर देणं आवश्यक आहे असं मला वाटत नाहीं."

"कां ?"

"कारण, तें मीं सांगितलं तरी तुम्हाला कळायचं नाहीं."

"पण काय वाटेल तें झालं तरी, आम्हांला तें कळणं अत्यंत जरूरीचं आहे. बरं, तिला आणून तुम्हीं कुठं ठेवली आहे, हें जरी आम्हांला तुम्हीं सांगितलंत, तरी आम्हांला काय कळायचं तें कळेल."

सतीशनें आपली जळजळीत नजर ज्योतिषच्या चेहऱ्याकडे लावली.

तो क्षणभर थांबला, आणि अगदीं अनपेक्षित शान्त स्वरानें म्हणाला, "हें पहा, ज्योतिषबाबू, आपण होऊन तुम्हां मंडळीशीं लगट करून, लोचटपण तुमच्याशीं घनिष्ठ संबंध जोडायचा मीं कधींही प्रयत्न केला नाहीं. म्हणून प्रश्नोत्तरांच्या निमित्तानं कांहीं अप्रिय गोष्टींची खडाजंगी करण्याची मला बिलकुल जरूर वाटत नाहीं. काय घडलं असावं त्यासंबंधाची मला चांगली कल्पना आली आहे. तेव्हां, तुम्हाला जें कळणं अवश्य आहे, तें मीं स्वतःच तुम्हांला सांगतों. सावित्री कुठं गेली आहे, तें मला माहीत नाहीं. कां, कशी गेली वगैरे सर्व हकीगतीची आवश्यकता नाहीं. तरी पण एक गोष्ट अगदीं त्रिवार सत्य आहे, कीं सावित्री स्वेच्छेनं मला सोडून जर निघून गेली नसती, तर, जोंपर्यंत मी जिवंत असेन तोंपर्यंत तिला मी माथ्यावर घेऊनच राहिलों असतों ! केवळ तुमच्यापुढंच नाहीं, तर सगळ्या जगासमोर हें ठणठणीतपणं सांगायला मला तिळमात्र शरम वाटणार नाहीं. यानंतर अधिक कांहीं प्रश्न विचारून मजकडून माहिती मिळविण्याची तुम्हांला आवश्यकता नाहीं. अन् असली तरी मजकडून आतां तुम्हांला अधिक कांहीं मिळण्यासारखं नाहीं."

सतीशनें जें हें अतिशय स्पष्ट, त्याप्रमाणेंच अतिशय संक्षिप्त उत्तर दिलें, तें ऐकून सर्वच श्रोते अगदीं स्तंभित होऊन गेले ! डोळे विस्फारून, दगडाच्या मूर्तीप्रमाणें ते निश्चलपणें त्यांच्याकडे पहात राहिले.

सरोजिनीच्या मुखमंडलावर तर, सतीशचा अनुपम, हृदयहीन बेफामपणा आणि त्याचा निःसीम निर्लज्जपणा, यांमधील घोर युद्धाचा परिणाम स्पष्ट दिसत होता ! तिच्या निर्णयाप्रमाणें त्याची बेफाम हृदयहीनताच या संग्रामांत विजयी झाली होती !

ज्योतिष स्तंभित मूर्तीप्रमाणें बराच वेळ बसून राहिला होता. नंतर शिकस्तीचा

प्रयत्न करून, त्यानें आपली गेलेली 'शुद्धि' परत आणली, आणि मान हलवून तो म्हणाला, "नाहीं. तुम्हांला आतां विचारण्यासारखं कांहीं नाहीं. अन् जें कांहीं होतं, त्याचं उपेनच्या उत्तरानं पूर्ण समाधान झालं आहे. पहा हें-"

असें म्हणून त्यानें तारेचा कागद सतीशकडे भिरकावून दिला.

"उपेनदादाचा टेलिग्राम ? पाहूं-पाहूं बरं-"

असें म्हणून सतीशनें आतुर उत्कंठेनें तो कागद चटकन् उचलून घेतला. त्याची घडी उलगडून हळुहळू त्यानें त्यांतील मजकूर साग्र वाचला, आणि कागद ज्योतिषकडे परत दिला.

कांहीं क्षण तो स्वतःशींच विचार करीत स्तब्ध बसून राहिला.

नंतर एक खोल उसासा टाकून म्हणाला, "सगळं खरं आहे. माझा उपेन-दादा कधींही खोटं बोलायचा नाहीं. खरोखरच मी चांगला नाहीं. खरोखरच माझ्याबरोबर कुणींही संपर्क ठेवणं योग्य नाहीं. या सगळ्या गोष्टींची जाणीव यथायोग्य रीतीनं झाल्यामुळंच मी एक दिवस अशा रीतीनं जंगलांत पळून आलों, अशी माझी कल्पना आहे."

बोलतां बोलतांच, कोणत्या तरी मंत्रबलानें त्याचा कंठस्वर जड, भाराक्रान्त, सद्गदित होत आला.

परंतु कोणाच्या तोंडून एक शब्दही निघाला नाहीं, आणि स्वतः सतीशही स्तब्धपणें बसून राहिला.

हृदय चिरून आलेला एक दीर्घ निःश्वास त्यानें टाकला, आणि गहन विचार-भ्रमणांत तो अगदीं व्यग्र होऊन गेला.

त्याला वाटूं लागलें, एका अत्यंत गुंतागुंतीच्या कठिण समस्येचा आज अतिशय अद्भुत रीतीनें उलगडा झाला ! काल सकाळीं जगत्तारिणीचें निमंत्रण आल्यापासून त्याच्या मनांत किती तरी चिंताजनक विचार खेळूं लागले होते. सरोजिनीचें हृदय जिंकून घेण्याची आकांक्षा एकाएकीं आपल्या हृदयामध्यें पहिल्यानें केव्हां जागृत झाली, हें त्या क्षणीं त्याला जरी चांगलेंसें स्मरत नव्हतें, तरी मनाच्या गुप्त अन्तर्भागीं ही आकांक्षा दबा धरून बसली होती हें नक्की ! तसें जर नसतें, तर हा सर्व प्रकार घडून तरी कसा आला असता ? कोणत्या सागराचें मंथन होऊन हें अमृत निघालें होतें ? सावित्री त्याला दुरावल्यापासून, तरुण स्त्रीचें मन मिळणें निराळें, आणि तें मिळाल्यानंतर तें कामाला लावतां येणें हें अगदींच निराळें, हा सत्य सिद्धान्त सतीशला पूर्णपणें पटला होता. कारण,

स्त्री-पुरुषांच्या हृदयाच्या निभृत भागीं, हा लाभ जेव्हां गुप्तपणें, निःशब्द रीतीनें संपूर्णतेकडे अग्रेसर होत असतो, तेव्हां बाहेरच्या जगाला त्याचा पत्ताही लागत नाहीं. परंतु ज्या दिवशीं त्या जगाची संमति घेतल्यावांचून एक पाऊलही पुढं पडण्याचा मार्ग रहात नाहीं, तो दिवस दारुण दुःखाचाच ठरतो! हा लाभ किती कठीण असतो, हें रत्न किती दुर्लभ असतें, या विचाराच्या दिशेकडे बाहेरचें जग ढुंकूनही पहात नाहीं. तें केवळ आपलें शास्त्र घेऊन, समाज घेऊन, लोकाचार घेऊन विरोधी स्वरानें कलरव करीत असतें, बाधा देतें, निषेध करतें, एवढेंच त्याचें काम!

कदाचित् सरोजिनीवर त्याचें प्रेम असेलही. त्या दिशेनेंही तिचें प्रतिदान जर असें उत्सुक उतावळेपणानें बेफाम होऊं लागलें, तर त्याची स्थापना त्यानें करावी कोणत्या ठिकाणीं? दोघांचेही समाज अगदीं भिन्न भिन्न! काल देखील त्याच्या वृद्ध पित्याचें चिंतनानें गंभीर झालेलें मुखमंडल त्याला वारंवार दिसत होतें. उपेनदादाच्या घरच्या शुष्क भट्टाचार्य उपाध्येबुवांचा, त्यांच्यापेक्षांही अधिक शुष्क तीव्र स्वर हजार वेळ येऊन त्याच्या कानांना विंधून टाकीत होता. आसपासच्या सगळ्या शत्रु-मित्र मंडळीचें जोरजोराचें शिरश्चालन त्याच्या हृत्पिंडावर सारखे धक्के मारीत होतें. तरीही या विरोधी जगांतील सर्व लोकांच्या एकवटलेल्या 'नको-नको' अशा जंगी आवाजामधूनही, केवळ सरोजिनीचें लज्जेनें नम्र झालेलें निःशब्द मुखमंडल त्याला धीर देत, अधिकाधिक सबल करीत, खंबीरपणें स्थिर राहिलेलें दिसत होतें!

परंतु आज आतां कांहीं भय नाहीं—चिंता नाहीं! एकाच दिवसांत कांहीं कल्पनातीत मार्गानें सर्व गुंतागुंतीच्या गांठी उलगडून मोठी काळजी दूर झाली! मोठें संकट टळलें—वांचलों आपण!

स्वतःशींच असे उद्गार निघतांच सतीशनें एकदम चमकून वर नजर करून पाहिलें.

सर्वजण पूर्वीप्रमाणेंच खालीं मान घालून मुकाट्यानें बसून राहिलीं होतीं.

सरोजिनीच्या चेहऱ्याकडे सतीशनें निरखून पाहिलें. परंतु त्याला जवळजवळ कांहींच दिसलें नाहीं. तेव्हां तिलाच उद्देशून तो म्हणाला, "तुम्ही—आपण माझ्या जुन्या बिऱ्हाडीं एक दिवस जिची वाळत घातलेली साडी पाहून आलांत, तिचं नांव सावित्री. एक दिवस सर्व हकीकत आपण होऊन आपणाला सांगून टाकावी, असा माझा बेत होता; परंतु तशी संधिच मला मिळाली नाहीं. अन् तें धाडसही माझ्यानं झालं नाहीं."

असें म्हणून तो स्तब्ध बसला. त्याच्या श्रोत्यांपैकींही कोणी कांहीं बोललें नाहीं.

तेव्हां क्षणभरानें तो उठून उभा राहिला, आणि म्हणाला, " ज्योतिषबाबू, सर्व दोष माझा आहे. या गोष्टीची दररोज, प्रतिक्षणीं मला आठवण होत होती, अन् म्हणूनच माझ्या मनाला तिळमात्र शांति नव्हती–सुख नव्हतं. "

असें म्हणून तो तसाच गप्प उभा राहिला.

नंतर क्षणभरानें तो पुनः बोलूं लागला, " अन् तरीही कोणत्याही बाबतींत मीं कुणाला फसवलं नाहीं, अन् तें मला ठाऊकही नाहीं. तरी दिखील मलाही कांहीं बोलण्यासारखं नाहीं. "

ज्योतिषनें वर नजर केली. तो कांहीं बोलणार होता; परंतु त्याच्या कंठांतून शब्दच फुटेना !

सतीशची स्वतःचीही अशीच अनुकंपनीय अवस्था झाली असावी, असें दिसलें. अन्तर्यामांतून वेफामपणें निघणारा एक कठोर उच्छ्वास त्यानें कसाबसा आवरला. आणि गद्गद स्वरानें तो म्हणाला, " बरं, येतों मी आतां. माझी आपणां सर्वांना एक प्रार्थना आहे. माझ्या हकीकतीची अधिक चर्चा करून आपलं मन आपण आणखीं खराब करून घेऊं नका. कोणत्याही निमित्तानं यापुढं मी आपणासमोर कधीं येणार नाहीं. मला आपण सारे विसरून जा. "

असें म्हणून तो हळू हळू तेथून निघून गेला.

ज्योतिषनें बाजूला वळून पाहिलें आणि तो एकदम भ्याला !

सरोजिनीचें मस्तक एकाएकीं तिच्या गुढघ्यांशीं झुकून पडलें होतें.

" सरोज–सरोज ! ए–सरोज ! "

ज्योतिष गडबडून किंचाळतो आहे, तों सरोजिनीच्या मुठीची शिथिल झालेली पकड खुर्चीच्या हातावरून सुटून ती एकदम खालीं गालिच्यावर मूर्च्छित होऊन पडली.

अपमान आणि अभिमान यांनीं ज्योतिषचा राग इतका उफाळून आला, कीं त्याची बुद्धि जवळजवळ पार लोपून गेली, आणि सतीशला कायमचा निरोप द्यावयाची कठोर घटना सरोजिनीसमक्ष घडून आली, तर तिच्या हृदयांत केवढा प्रचंड आघात होईल, याचा विचारही त्याच्या मनाला शिवला नाहीं !

अनेक उपचार केल्यानंतर, योग्य शुश्रूषा होऊन, सरोजिनी चांगली शुद्धीवर आली, आणि कोणाशीं कांहीं न बोलतां रडत स्फुंदत, कांपणाऱ्या पायांनीं,

डुलत डळमळत, ती तेथून हळुहळू निघून गेली.

तेव्हां जणूं काय आपल्या मस्तकावर वीज कडाडून पडली. असें वाटून ज्योतिष एकदम हबकूनच गेला !

सरोजिनीवर ज्योतिषचें प्राणांपलिकडे प्रेम होतें. एवढेंच नव्हे, तर आपल्या सौंदर्यसंपन्न सर्वगुणशाली भगिनीच्या आत्माभिमानाबद्दल आणि स्वसंमानाच्या जाणिवेबद्दल त्याला अत्यंत अभिमान आणि आदर वाटत असे. परंतु तिच्या अंगींचे हे सारे गुण कुचकामी होऊन फुकट जातील, त्यांच्यावर पाणी सोडून एका चरित्रहीन लंपटाच्या पराकाष्ठेच्या अन्यायी वर्तनाकडे पूर्ण दुर्लक्ष करून, अगदीं जाणूनबुजून स्वतःचें भान हरपून त्याच्या पायांशीं ती एखाद्या सुकल्या गवताच्या काडीप्रमाणें सपशेल लोळण घेईल,—इतकी तिची प्रेमभावना आंतल्या आंत प्रबल होऊन राहिली असेल, अशी ज्योतिषला स्वप्नांतहि कल्पना नव्हती ! सरोजिनीच्या मुखावर वेदनांचें जें प्रतिबिंब उमटलेलें त्यानें आतांच स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिलें होतें, तें इतकें करुण आणि अनुकंपनीय होतें, कीं त्याची जाणीवही व्हावयाला त्याला थोडा अवकाश लागला, आणि त्याचें वर्णनही करणें आपणाला अशक्य आहे अशी त्याची कल्पना झाली.

बराच वेळ तो दगडाप्रमाणें निश्चल बसून राहिला.

नंतर शशांकमोहनकडे वळून तो म्हणाला, "मला वाटतं, तुम्ही आज रात्रींच कलकत्त्याला परत जाणार असाल ?"

शशांक म्हणाला, "नाहीं, तसं कांहीं माझं जरूरीचं काम नाहीं तिथं."

अधिक कांहीं प्रश्न न करतां ज्योतिष उठला, आणि आंत निघून गेला.

तो तडक आपल्या खोलींत गेला, आणि दरवाजा बंद करून बिछान्यावर सपशेल लवंडला.

त्या रात्रीं शशांकमोहनला 'डिनर' एकट्यानेंच घ्यावें लागलें. कारण, ज्योतिषबद्दल कांहीं 'बातमी'च त्याला लागेना !

जगत्तारिणीला मुलाकडून कणाकणानें एकएक बातमी कळून सर्व हकीगत तिच्या ध्यानीं आली.

मोठा थोरला दुःखाचा एक निःश्वास टाकून ती म्हणाली, "हा सारा जळल्या माझ्या या फुटक्या कपाळाचा परिणाम, ज्योतिष !"

ज्योतिष कांहींच बोलला नाहीं. मुकाट्यानें खालीं पहात राहिला.

आपल्या परलोकवासी पतीचें स्मरण होऊन जगत्तारिणी म्हणाली, "सगळ्या

जन्मभर स्वतः तर मी या आगीच्या खाईत जळून मेलेंच आहें. पण पोटच्या मुलांसाठीं दिखील जर मला तशीच आगींत जळत, राहिलेलं आयुष्य काढावं लागलं नाहीं, तर सोळा आणे पापाचं प्रायश्चित्त मला मिळणार कसं ? बरं बाबा, तुम्हाला जो पसंत पडेल, त्याच्याशीं बहिणीचं खुशाल लगीन लावून टाक. एक शब्द दिखील त्या बाबतींत मी बोलणार नाहीं. ''

तरीही ज्योतिष स्तब्धच राहिला.

पुनः एक मोठा उसासा टाकून जगत्तारिणी म्हणाली, '' मनाला माझ्या पूर्ण अन्तर्ज्ञान ! म्हणूनच, तो एकाएकीं फिरून आला हें ऐकून त्या दिवशीं माझं काळीज धडधडूं लागलं, तें उगीच नव्हे, ज्योतिष ! ''

परंतु ज्योतिष कांहीं देखील बोलला नाहीं. हें प्रकरण कांहीं इतकें सोपें आणि सरळ नाहीं, हें मनांतल्या मनांत तो पक्कें समजून होता. अर्थात्, जें घडलें तें घडलें, असें म्हणून डोळे मिटून बसून राहूनही चालण्यासारखें नव्हतें !

कदाचित्–कदाचित् एकाद्या दिवशीं स्वतः जाऊन, त्या चरित्रहीन लंपटाच्या पायां पडून त्याला परत आणावें लागेल, असेंही ज्योतिषला दिसत होतें.

कालच्या सगळया दिवसांत सरोजिनी आपल्या खोलींतून बाहेर पडलेली त्याला दिसली नव्हती. परंतु आज संध्याकाळीं चहा घेण्यासाठीं तो बाहेरच्या दालनांत येतो, तों, सरोजिनी अगोदरच आली असून, शशांकमोहनशीं हळुहळू गप्पागोष्टी करीत आहे, असें त्याला आढळून आलें.

जवळ येऊन ज्योतिषनें एक खुर्ची ओढून घेतली, आणि तिच्यावर तो बसला. जरी बहिणीच्या मलिन कळाहीन चेहऱ्याकडे पहातांच त्याला सर्व प्रकार कळून चुकला, तरीही आपल्या छातीवरील मोठा थोरला एक बोजा उतरल्यासारखें वाटून त्यानें एक निःश्वास सोडला.

फराळानंतरही बराच वेळ मंडळींत गप्पागोष्टी चालल्या होत्या; परंतु त्या दिवसाचा उल्लेख कोणीं भाषणांत चुकूनही केला नाहीं.

संध्याकाळानंतर बऱ्याच स्वस्थ स्वच्छंद चित्तानें सरोजिनीला जातांना पाहून ज्योतिष मनांतल्या मनांत म्हणाला, '' घडलेली दुर्घटना जितकी वाईट, असं मला वाटलं होतं, तितकी ती नाहीं, असं दिसतं. कदाचित् थोड्याच अवकाशांत पुन्हां सर्व ठीकठाक होऊन जाईल, अशीही तूर्त आशा करायला हरकत नाहीं.''

असें म्हणून ज्योतिषनें सुटकेचा निःश्वास टाकला.

त्या दिवशीं बरीच रात्र होईपर्यंत त्या दोघां मित्रांमध्यें बऱ्याच गप्पागोष्टी

आणि चर्चा झाली. इतकेंच नव्हे, तर आपणाला वाटत असलेली आशाही ज्योतिषानें इंगिताइंगितानें शशांकापाशीं प्रकट केली. तसें म्हटलें तर, कोसळलेल्या संकटाच्या तडाख्यांतून स्वतःला सांवरून घेतल्यानंतर देखील, सतीशच्या एवढ्या प्रचंड तिरस्करणीय आचरणाशीं शशांकमोहनाच्या आर्जवी वर्तनाची मनांतल्या मनांत सरोजिनी तुलना करून पहाणार नाहीं, ही गोष्ट एक प्रकारें असंभवनीय आहे, असेंही उभयतां मित्रांना खात्रीनें वाटूं लागलें.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं, जेवणखाण आटोपल्यावर आपल्या वरच्या मजल्यावरच्या झोंपण्याच्या खोलींत उघड्या खिडकीसमोर एक खुर्ची ओढून घेऊन सरोजिनी बसली असून सहज समोरच्या रस्त्याकडे पहात होती.

इतक्यांत तिची नजर जरा दूर गेली. बोज्यांनीं भरलेली एक बैलांची गाडी हळुहळू चालली असून, तिच्या मागून जीं दोन माणसें छत्री उघडून हळुहळू चाललीं होतीं, त्यांपैकीं एक बिहारी, असें सरोजिनीला खात्रीपूर्वक वाटूं लागलें.

सरोजिनी घाईघाईनें उठून खिडकीचे गराद धरून त्या बाजूकडे लक्ष्यपूर्वक पाहूं लागली.

गाडी हळुहळू तिच्या खिडकीसमोर येतांच, त्यांपैकीं एका माणसानें वर मान करून पाहिलें. तत्क्षणीं स्पष्ट दिसून आलें, कीं तो बिहारीच !

सरोजिनीनें हात हलवून त्याला यावयाची खूण केली.

बिहारीनें आपल्या सोबत्याला गाडीबरोबर पुढें जावयाला सांगून आपली छत्री मिटून घेतली, आणि तो सरळ खिडकीखालीं येऊन उभा राहिला.

सरोजिनी त्याला उद्देशून म्हणाली, " बिहारी, आंत येतांच उजव्या हाताला जिना आहे बघ. वर ये सरळ. "

त्या वेळीं घरची सर्व मंडळी दिवसाच्या झोंपेत आरामानें निमग्न होऊन गेली होती. बिहारी सरोजिनीच्या सूचनेप्रमाणें तावडतोब जिना चढून वर तिच्या खोलींत आला, आणि खालीं वांकून तिच्या पायांची धूळ घेऊन त्यानें जीभ, गळा आणि माथं यांवर ठेवल्यासारखें केलें.

मनांतल्या मनांत त्याला आशीर्वाद देऊन सरोजिनी म्हणाली, " अरे, तुमची गाडी तर रात्रीं अकरा वाजल्यानंतर—नव्हे, बिहारी ? अजून तिला खूप खूप वेळ आहे. तुमचा ठाकूर आहे गाडीबरोबर तो हमालांकडून बोजेबिजे खालीं उतरून घेऊन नीट व्यवस्थित ठेवील. तूं बस थोडा वेळ. "

सतीश तेथलें आपलें बिऱ्हाड उठवून दुसरीकडे कोठें चालला आहे, हें, प्रश्न न करतांच, तिला कळून चुकलें.

आपल्या छोट्या उपरण्याच्या टोंकानें कपाळावरचा घाम पुसून बिहारी खालीं जमिनीवरच बसला.

चार दोन क्षण स्वतःशींच विचार करीत सरोजिनी मुकाट बसली. नंतर तिनें आपल्या हेतूला पोषक अशी प्रस्तावना केली.

" काय रे बिहारी, तूं तर कधीं ब्राह्मणाच्या मुलीसमोर खोटं बोलत नाहींस— खरं ना ? "

बिहारी जीभ किंचित् बाहेर काढून म्हणाला, " बाप रे ! तसं माझ्या हातून झालं, तर माझा काय मग निभाव आहे, ताईसाहेब ? सात जन्म जरी काशींत जाऊन राहिलों मी, तरी त्या पापापासून सुटका नाहीं होणार माझी ! "

त्या धर्मभीरु, खेडवळ वृद्धाच्या चेहऱ्याकडे स्नेहार्द्र दृष्टीनें पाहून सरोजिनी हंसत हंसत म्हणाली, " तें तर मला ठाऊकच आहे, बिहारी ! तूं कधींही खोटं बोलणार नाहींस. पण मी जें विचारणार आहें, त्याच्याबद्दल कधींही कुणाजवळ तूं ब्र दिखील काढायचा नाहीं–कळलं ?—अगदीं तुझ्या धन्या-जवळ दिखील नाहीं ! "

बिहारी म्हणाला, " कुणापाशीं बोलायची मला काय जरूर पडली आहे, ताईसाहेब ? "

सरोजिनी चार दोन क्षण विचारांत स्तब्ध बसली. नंतर तिनें अस्सल गोष्ट काढली.

" बरं, कायरे बिहारी, ही सावित्री आहे तरी कोण ? "

बिहारी सरोजिनीच्या तोंडाकडे पहातच राहिला.

नंतर तो किंचित् आर्द्र स्वरानें म्हणाला, " माझ्या सावित्रीआईसंबंधानं विचारतां होय तुम्ही, ताईसाहेब ? ती आई–मातादेवी आमच्या कुणाच्या शापामुळं पृथ्वीवर जन्म घेऊन इतकं दुःख भोगते आहे, कांहीं कळत नाहीं ! काय सांगूं तुम्हाला, ताई ? आहा, आई म्हणजे साक्षात् लक्ष्मीची मूर्ति आहे बरं ! "

पुष्कळ दिवस झाले–सावित्रीचं नांव देखील उच्चारावयाला बिहारीला संधि आली नव्हती ! त्याचे डोळे आसवांनीं भरून येऊन गळाही अगदीं दाटून आला.

सावित्रीचें नांव निघतांच त्या बुड्ढ्या भाविक खेडवळामध्यें इतका विलक्षण फरक झालेला पाहून, सरोजिनीला अतिशय आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

बिहारीनें हातानेंच डोळे पुसले, आणि तो गद्गद स्वरानें म्हणाला, "ज्या दिवशीं राखालबाबूच्या मेसमध्यें मोलकरणीचं काम करायला म्हणून आई आली, त्या वेळीं तिथलं एकूण एक माणूस आश्चर्यानं अगदीं थक्क होऊन गेलं! चेहऱ्यावर हंसं कसं नेहमीं अगदीं पसरलेलं! राखालबाबू मॅनेजर अन् मी तर नुसता नोकर; पण आईजवळ सगळेच सारखे! सगळ्यांची ती सारखीच सेवा ममतेनं करायची. एकादशीच्या दिवशीं तिला पुरापुरा उपास! तोंडांत पाण्याचा थेंब दिखील घालायचा नाहीं. पण आईच्या चेहऱ्यावर त्रासाचं किंवा बेजारपणाचं चिन्हही मीं कधीं पाहिलं नाहीं, ताईसाहेब!"

अगदीं अंतरंग ओतून म्हातारा हकीकत सांगत होता! त्यामुळें अर्थात्च, त्याच्या अकृत्रिम आदरभक्तीचा उफाळा पाहून सरोजिनी अगदीं मुग्ध होऊन गेली. तर त्यांत कांहीं नवल नाहीं. तिच्या अन्तःकरणांतल्या दारुण उफाळणाऱ्या ज्वालांचा भडकाही कमी होऊन त्या अर्ध्याअधिक शांत झाल्या.

बिहारी पुढें बोलूं लागला, "ताईसाहेब, शास्त्रपुराणांत लिहिलं आहे, कीं आई लक्ष्मीच्या हातून एकदां कसलासा अपराध झाला, अन् नारायणाच्या हुकुमानं तिला दासीपणा करायला पृथ्वीवर यावं लागलं. आमची ही आई दिखील तशाच कसल्या तरी दोषामुळं नोकरी करायला आली, अन् मोठालीं दुःखं भोगून शेवटीं आम्हांला सोडून निघून गेली. ज्या दिवशीं आई निघून गेली, तो दिवस माझ्या काळजाच्या काळजांत आज दिखील कसा अगदीं कोरून ठसून राहिला आहे, ताईसाहेब!"

सरोजिनीनें आस्ते आस्ते विचारलें, "ती तूर्त आहे कुठं रे, बिहारी?"

बिहारीनें या प्रश्नाचें एकदम उत्तर दिलें नाहीं. तिच्या चेहऱ्याकडे पहात तो गप्प बसला.

सरोजिनीनें पुनः विचारलें, "ठाऊक नाहीं तुला, बिहारी?"

या वेळीं, किंचित् मान हलवून बिहारी उत्तरला, "अगदीं नक्की ठाऊक नाहीं खरं; परंतु तरीही साधारण कल्पना आहे. पण ती गोष्ट कुणालाही सांगायची आईची मला मनाई आहे, ताईसाहेब! म्हणून मला सांगतां येत नाहीं. माफ करा."

सरोजिनीनें विचारलें, "मनाई कां रे?"

मनाई कां, हें स्वतः बिहारीच्या देखील विचार करूनही लक्षांत येत नव्हतें. परंतु सावित्रीनें केलेला हा निषेध नेहमीं मान्य करून चालणें, ती कशी आहे हें नुसतें कळूनही न येणें, साऱ्या आयुष्यांत पुनः डोळ्यांना तिचें दर्शनही न घडणें, या साऱ्या गोष्टी आपणालाही किती दुःसह आहेत, याची बिहारीला स्वतःला चांगलीच जाणीव होती. विशेषतः जेव्हां जेव्हां कसल्या तरी बातम्यां-मुळें आपल्या आईविरुद्ध सतीश तीव्रपणें घाणेरडेंसाणेरडें बोले, अगर इंगितानें व्यक्त करी, त्या वेळीं सर्व गोष्टी स्पष्टपणें प्रकट करावयासाठीं त्याच्या मनामध्ये केवढ्या तरी आवेगाचें वादळ उठे ! परंतु तरी देखील आजपर्यंत म्हाताऱ्यानें आपली शपथ कधींही मोडली नाहीं ! एकाद्या दिवशीं परिस्थिति अगदींच असह्य झाली, म्हणजे तो आपल्या मनाची समजावणी करी, कीं इतका प्रचंड कलंक स्वतः सावित्री जर सहन करते आहे, तर त्यामध्यें आपल्या बुद्धीला अगोचर असें कांहीं तरी खास असलें पाहिजे. सावित्री-बद्दलच्या त्याच्या श्रद्धाभक्तीला आणि विश्वासाला सीमाच नव्हती !

परंतु आतां जेव्हां आणखीं एक व्यक्ति ती हकीगत समजून घेण्याकरतां अत्यंत उत्सुकता प्रकट करीत होती, तेव्हां सर्व हकीगत सरळ सांगून टाकण्या-करतां म्हाताऱ्याचा प्राण अगदीं तडफड करूं लागला !

कांहीं वेळ गप्प राहून तो म्हणाला, " मी तुम्हांला सांगेन, ताईसाहेब ! पण माझी एक अट आहे. "

" बोल. "

" आमच्या बाबूजींजवळही कांहीं सांगायचं नाहीं. "

त्याची ही अट ऐकून मनांतल्या मनांत सरोजिनीला अतिशय आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. बिहारीला माहीत आहे आणि सतीशला माहिती नाहीं ! आणि त्यालाही कळूं न देण्याविषयीं सावित्रीचा एवढा कटाक्ष ! या विलक्षण चमत्काराचें कारण काय असावें, हें विचार करूनही सरोजिनीच्या लक्षांत येईना !

ती म्हणाली, " नाहीं, बिहारी, मी कुणालाहि सांगणार नाहीं. "

आपण ती गोष्ट ताईसाहेबांना सांगितली, तर असत्याचें पाप आपणाला लागेल कीं काय, याविषयीं विचार करीत बिहारी चांगला दीड दोन मिनिटें गप्प बसला.

नंतर हळुहळू, त्यानें तो सगळा इतिहास, एक एक घटनेचा उलगडा करीत सरोजिनीला सांगितला.

सावित्रीचें सतीशवर प्राणांपेक्षांही अधिक प्रेम होतें, आणि म्हणूनच राखाल-बाबूंच्या अंगाची आगीआग होऊन, त्यानें बाबूजींशी झगडा करून, त्यांना मेसमधून बाहेर जावयाला भाग पाडलें; सतीशबाबू मध्येंमध्यें दारूही पीत असत; इत्यादि गोष्टींपैकीं एकही गोष्ट बिहारीनें सरोजिनीपासून लपवून ठेवली नाहीं.

बिहारी ती हकीगत सांगत असतां, सरोजिनी मंत्रानें मुग्ध झाल्याप्रमाणें बसून ती ऐकत होती. अशा एकाग्र चित्तानें, सर्व मनच कानांत एकवट करून कधीं कोणी कसलीही हकीगत कोणाकडून ऐकली असेल असं मला वाटत नाहीं. ज्या राखालबाबूकडून शशांकमोहननें ती बातमी मिळविली होती, त्या माणसाचा इतिहासही आज सरोजिनीला अज्ञात राहिला नाहीं.

सावित्रीचें घर कोठें, किंवा तिच्या वडिलांचें अथवा सासरचें घराणें कोणतें, कोणत्या तऱ्हेचें, वगैरेसंबंधाची सर्व माहिती बिहारीला सांगतां आली नाहीं, तरी ती जातीनें ब्राह्मण, सत्कुळची, विधवा, सुरूप, लिहितां वाचतां चांगलें येणारी, केवळ अदृष्टाच्या विडंबनामुळें दासीवृत्ति करावयाला आली होती, वगैरे हकीगत बिहारीनें सरोजिनीला इत्थंभूत रीतीनें, पुनरुक्तीकडे पूर्ण दुर्लक्ष करून सांगितली.

नंतर तो म्हणाला, " बाबूजींवर तिचं इतकं प्रेम, तरी दिखील बाबू तिला वाघाप्रमाणं भीत असत, ताईसाहेब! दारू पिऊन मेसमध्यें पाऊल टाकायची दिखील बाबूजींची छाती नव्हती. विपिनबाबू नांवाचा बाबूजींचा एक बदमाष मित्र होता. त्याच्या संगतीनं गाणंबजावणं करायला बाबूजी एका खराब ठिकाणीं जात असत. ही गोष्ट आईच्या कानांवर जातांच तिथं त्यांचं जाणं अजिबात बंद झालं! बाबूजींची अशी छाती नव्हती, कीं सावित्रीआईला तुच्छपणं डावलून ते त्या ठिकाणीं जाऊं शकतील! "

असें म्हणून बिहारीनें गर्वभरानें सरोजिनीच्या चेहऱ्याकडे नजर फेंकली.

सतीशवर दुसऱ्या एका स्त्रीचें इतकें विलक्षण स्वामित्व आहे, हें वृत्त ऐकतांच सरोजिनीच्या हृदयाला तीव्र जखमेप्रमाणें वेदना होऊं लागल्या.

नंतर हळूहळू तिनें विचारलें, "काय रे बिहारी, तिला इतकं भ्यायला सतीश? बाबूंना तरी इतकी काय जरूर होती रे? "

बिहारीला स्वतःला यासंबंधानें जी कल्पना होती, ती तो सांगूं लागला. ता

म्हणाला, " आमची आई म्हणजे विलक्षण गंभीर बायको होती, ताईसाहेब! फक्त आमचे बाबूजीच नव्हेत, तर मेसमधली सगळीच मंडळी मनांतून आईला भीत असत. एका दिवसाची गोष्ट तुम्हाला सांगतों. त्या दिवशीं बऱ्याच रात्रीं दारू पिऊन अन् दारूची बाटली बरोबर घेऊन आमचे बाबू मेसमध्यें परत आले. त्यांची कल्पना अशी, कीं रात्र खूब झाली आहे, तेव्हां सावित्री खात्रीनं आपल्या बिऱ्हाडीं गेली असेल. मी जागा होतों, अन् दार मींच उघडलं. धन्यांनीं विचारलं, ' सावित्री घरीं गेली ना रे, बिहारी ?' मी म्हणालों, ' नाहीं, बाबूजी! आज ती गेली नाहीं. इथंच आहे.' त्यांनीं हें ऐकलं मात्र–दारूची बाटली काखेंत होती, ती तशीच त्यांनीं रस्त्यावर भिरकावली. अन् आस्ते आस्ते चोरासारखे ते मेसमध्यें शिरले. दारूची नशाबिशा त्याच क्षणीं स्वारीची सारी पार उतरली! तुम्हीच सांगा आतां, ताईसाहेब, सावित्री आईशिवाय बाबूजींना कह्यांत ठेवील, असं दुसरं कोण माणूस आहे जगांत ? "

सरोजिनी कांहीं वेळ आपणाशींच विचार करीत स्तब्ध बसून राहिली.

" सतीशबाबू अजूनही दारू पितात कारे, बिहारी ? "

मान हलवून बिहारी म्हणाला, " नाहीं, पण पुन्हां सुरू करायला किती वेळ लागणार आहे, ताई ? म्हणून तर आज दोन दिवस मनांत मी सारखा घोकतों आहें, कीं अशा या संकटाच्या वेळीं माझी सावित्रीआई जर एकवार येती- -"

सरोजिनीनें उत्सुकतेनें विचारलें, " कां बरं, बिहारी ? "

बिहारी म्हणाला, " मी बरोबर बघत आलों आहें ना, ताई, मन खराब झालं, कीं बाबूजी दारू ढोसायला आरंभ करतात. फक्त एक उपेनबाबूंना भितात ते. पण त्यांच्याबरोबर दिखील स्वारीचं कांहीं तरी बिघडलं असावं! त्या रात्रीं ते आमच्या बिऱ्हाडी आले, अन् सावित्रीआई तिथं बसलेली दृष्टीला पडतांच ते जे ताबडतोब निघून गेले, तेव्हांपासून कुणी कुणाचं नांव दिखील घेत नाहीं! आतां तुम्हीच सांगा, ताईसाहेब, आईशिवाय बाबूजींना सांभाळायची ताकद आहे तरी कुणाला ? "

बिहारी बोलतां बोलतां एकदम थांबला. त्याचा गळा दाटून आला होता.

नंतर गळा साफ करून तो पुनः बोलूं लागला, " दुखण्याची बातमी कळल्यापासून आज पांच सहा दिवस बाबूजींचे कसे गेले आहेत, तें मीं या डोळ्यांनीं पाहिलें आहे ना, ताई! परवां झोंप घेऊन उठल्यानंतर तारेनं

आलेली बातमी वाचल्यापासून तोंड फटफटीत चिमणीएवढं करून ते जे पडले, ते साऱ्या दिवसांत कांहीं त्यांनीं डोकं वर केलं नाहीं. नतर रात्रींच्या गाडीनं ते घरीं निघून गेले. जातांना फक्त मला सांगून गेले, ‘ बिहारी, तुम्ही सगळं आवरून बरोबर घेऊन घरीं या.’—बस्स ! एवढेच शब्द ! ”

सरोजिनीनें अत्यंत अस्वस्थ होऊन विचारलें, “ कोण आहे रे आजारी ? ”

बिहारी तिच्याकडे आश्चर्यानें पहातच राहिला.

त्यानें विचारलें, “ म्हणजे ? घरीं जातांना तुम्हाला बाबूजी सांगून गेले नाहींत, ताईसाहेब ? ”

सरोजिनी मान हलवून म्हणाली, “ नाहीं बाई ! कोण आहे आजारी ? ”

बिहारी उसासा टाकून म्हणाला, ‘ तर मग, मन तिकडेच गुंतलं असल्या- मुळं बाबूजी तसेच पुढं सरळ निघून गेले असावे—या घरीं येऊन सांगून जायचं त्यांना कांहीं भान राहिलं नाहीं ! ज्या दिवशीं सकाळीं बाबूजींना इथं जेवून जायचा निरोप आला होता ना, त्या दिवशींच बुड्ढे बाबूजी आजारी असल्याचं पत्र त्यां ा आलं. त्यामुळं त्यांना कांहीं जेवायला येतां आलं नाहीं. तार करून ब.बूजी स्वतःच टेलिग्राफ हपीसांत बसून राहिले होते सारा दिवस. पण त्या दिवशीं कांहींच बातमी कळली नाहीं. नतर परवां सकाळीं बातमी आली. पण ती अखेरची. रात्रीच्या गाडीनं बाबू निघून गेले. ”

सरोजिनी एकदम चमकून त्याच्या तोंडाकडे पाहूं लागली.

“ सतीशबाबूंचे वडील वारले ? ”

बिहारी म्हणाला, “ होय, ताईसाहेब ! ”

“ काय झालं त्यांना ? ”

“ बरंच वय झालं होतं त्यांचं. कांहीं तरी निमित्त होऊन गेले झालं थोरले बाबूजी ! ”

असें म्हणून बिहारीनें आपले पाणावलेले डोळे पुसले.

क्षणभर थांबून तो पुढें बोलूं लागला, “ दुसऱ्या कशासाठीं इतकं दुःख वाटत नाहीं ताई, पण या म्हाताऱ्याखेरीज बाबूजींना आपलं असं म्हणायला कुणी राहिलं नव्हतं, अन् आतां तेही गेले ! म्हणूनच आज दोन दिवस माझ्या मनांत सारखी घालमेल चालली आहे, कीं बाबूजी यानंतर काय करतील अन् काय नाहीं, तें एका आई दुर्गेलाच ठाऊक ! ”

असें म्हणून म्हाताऱ्यानें आपल्या चादरीच्या टोंकानें डोळे पुनः एकवार चांगले पुसून काढले.

सरोजिनीच्या डोळ्यांतही आंसवें उभीं राहून तीं घरंगळण्याच्या अगदीं बेतांत होतीं. तीं तिनं झपकन् पुसून टाकलीं.

" यानंतर सतीशबाबू ठीक, चांगले वागायलाहि लागतील—खराबच होत होत जातील, असं भय तुला कां वाटतं, बिहारी ? "

मन दुसरीकडेच कोठें गुंतलें असावें, अशा रीतीनें बिहारी म्हणाला, " कुणाला ठाऊक ! "

सरोजिनी उद्गारली, " अं ? म्हणजे ? "

बिहारीनें चमकून तिच्याकडे पाहिलें, आणि तो म्हणाला, " तुमच्या तोंडीं साखर पडो, ताई ! बाबूजी चांगले होवोत—नीट शुद्धीवर वागोत ! पुन्हां त्या बाजूंकडे जायची त्यांना आई दुर्गेनं बुद्धि देऊं नये–दुसरं काय ? पण मला मोठी भीति वाटते, ताईसाहेब ! जातांना गाडींत बसल्यावर ते मला म्हणाले, ' जाऊं दे—वांचलों म्हणायचा मी. बिहारी ! जगांत आतां कुणाविषयीं कसली काळजीविळजी करायचं कांहीं कारण राहिलं नाहीं ! ' तुम्हाला खरंच सांगतों मी, ताईसाहेब, त्या दिवसापासून मनांत जेव्हां जेव्हां बाबुजींविषयीं विचार येतो, तेव्हां तेव्हां काळजांत कसा थरकांप होतो माझ्या ! आतां त्यांच्या हातीं केवढा तरी जंगी पैसा येईल. बाबूजींचे स्नेहीसोबती कांहीं चांगलीं माणसं नाहींत. खराब रस्त्यानं ते जर दौडत निघाले, तर त्यांना आतां कोण आवरणार आहे ? केवळ एका आमच्या आईमध्यें ती शक्ति होती. "

असें म्हणून बिहारीनें हात जोडून नमस्कार केल्यासारखें केलें. आपल्या भाषणानें सरोजिनीच्या हृदयावर तप्त शूलाचा आपण केवढा जबरदस्त प्रहार केला, याची बिचाऱ्याला कल्पना नव्हती !

परंतु सरोजिनीनें तो प्रहारही सहन केला.

मृदु वाणीनें ती म्हणाली, " नें खरं, बिहारी ! पण मग तिला यायला तूं पत्र कां पाठवीत नाहींस ? "

बिहारी म्हणाला, " पण आईचा पत्ताच मला माहीत नाहीं हो, ताई ! खुद्द मला जर काशीला जातां आलं असतं, तर काय वाटेल तें करून, तिला शोधून काढून मी घेऊन आल्यावांचून राहिला नसतों. पण तें शक्य नाहीं. बाबूजींना एकटंच सोडून निघून जायला मनच कसं तें घेत नाहीं बघा. शिवाय मी कधीं काशीला गेलोंही नाहीं—त्या मुलखाची मला कांहीं माहिती नाहीं—"

असें म्हणून एकाद्या असहाय माणसाप्रमाणें बिहारीनें सरोजिनीकडे दीनवाण्या

दृष्टीनें पाहिलें. त्यावरून असें स्पष्ट दिसून आलें, कीं सतीशाचा तो परमहितचिंतक म्हातारा नोकर, त्याच्या अवश्यमेव घडून येणाऱ्या अमंगलाच्या आशंकेनें अतिशय व्याकुल झाला असून, सरोजिनीपासून आश्वासन मिळण्याविषयीं तिची अत्यंत आतुरतेनें निःशब्द प्रार्थना करीत आहे !

परंतु सरोजिनीनें त्याला बिलकुल कसलें आश्वासन दिलें नाहीं. ती त्याच्याकडे पहात मुकाट्यानें बसून राहिली.

" बरं तर, मी येतों आतां, ताईसाहेब ! "

असें म्हणून बिहारी जरा पुढें सरला, आणि खालीं वांकून त्यानें तिला प्रणाम केला. नंतर तिच्या पायांची धूळ घेऊन मस्तकीं लावून तो बाहेर पडला.

परंतु पांच दहा क्षणांतच तो अकस्मात परत आला आणि हात जोडून सरोजिनीसमोर उभा राहिला.

" काय, बिहारी ? "

" एक प्रार्थना करूं मी, ताईसाहेब ? "

सरोजिनीनें मोठ्या कष्टांनीं तोंडावर म्लान हास्य आणलें, आणि ती म्हणाली, " कसली रे प्रार्थना ? "

बिहारी तसाच हात जोडून करुण वाणीनें म्हणाला, " मी एक गांवढळ गवळी–शेतकरी. त्यांतून म्हातारा झालेला. बोलतांना कुठं तरी चुकून बोललों, तर माझा अपराध मनावर घेऊन माझ्यावर तुम्ही रागावणार नाहीं ना, ताईसाहेब ? "

सरोजिनीला आतां अश्रु आवरेनात. परंतु शिकस्तीचा प्रयत्न करून तिनें आपला आवेग दाबून टाकला, मागें वळून डोळे पुसले, आणि मान हलवून तिनें कसाबसा एकच शब्द उच्चारला.

" नाहीं. "

तिच्या तोंडून निघालेला ' नाहीं ' असा हा उद्गार ऐकून बिहारी चमकल्यासारखा झाला. गांवढळ, शेतकरी वगैरे विशेषणें आपणाला लावून तो जरी आपला परिचय नेहमींच करून देत असे, तरी तो खरोखर खुळावेडा, बावळट आदमी नव्हता. म्हणून, सावित्रीची हकीगत विचारण्याकरतां आपणाला सरोजिनीनें रस्त्यावरून बोलावून कां आणलें असावें, तिची कहाणी मनाच्या इतक्या विलक्षण एकाग्रतेनें ती कां ऐकत होती, हें सर्व कांहीं आतां त्याला सूर्यप्रकाशाप्रमाणें स्वच्छ दिसूं लागलें. त्याबरोबरच केवळ

अजाणतां या तरुणीचें हृदय विंधून आतांपर्यंत आपण तिला विलक्षण यातना दिल्या, या जाणिवेनें त्याच्या मनस्तापाला आतां सीमा राहिली नाहीं. ''

बिहारी अतिशय करुण स्वरानें म्हणाला, '' मला ठाऊक आहे, ताईसाहेब, तुमच्याही शब्दाबाहेर बाबूजी जाणं शक्य नाहीं. तुमच्या मनांत असेल, तर तुम्हीही त्यांचं संकटांतून रक्षण करूं शकाल. पण माझं मन मला सांगतं आहे, कीं तुम्हीं बाबूजींना वाऱ्यावर सोडून दिलं आहे, आई ! ''

बिहारीनें हें अगदीं पहिल्यानेंच सरोजिनीला ' आई ' असें मातृसंबोधन दिलें.' आई ' म्हणून काम साधण्याचें तंत्र म्हाताऱ्याला चांगलेंच अवगत होतें !

सरोजिनीच्या अश्रूंनीं आतां कोणतीही बाधा मानली नाहीं. म्हाताऱ्याच्या डोळ्यांदेखतच तिच्या डोळ्यांतून मोठाले अश्रुबिंदु झरझर खालीं टपकूं लागले.

परंतु ते घाईघाईनें पुसून सरोजिनी म्हणाली, '' नाहीं, बिहारी, माझ्या-कडून कांहीं दिखील होण्यासारखं नाहीं. मी आतां त्यांच्या कोणत्याही बाबतींत पडणार नाहीं. ''

बिहारी मान हलवून म्हणाला, '' मीं तुम्हाला ' आई ' म्हणून हांक मारली आहे–तुमच्या मुलासारखा आहें मी, आई ! मुलाच्या चुका दोष कांहींही झाले असले, तरी त्याबद्दल मी माफी मागतों. ''

असें म्हणून खालीं वांकून बिहारीनें सरोजिनीच्या पायांची धूळ घेऊन मस्तकीं धारण केली.

तो म्हणाला, '' तुम्ही तर आमच्या बाबूजींना चांगलं ओळखतां. या संकटाच्या वेळीं रुसून, अभिमान धरून त्यांना मारून टाकायचं कृत्य मी कांहीं झालं तरी तुमच्या हातून होऊं देणार नाहीं, आई ! ''

सरोजिनीचा कठोर अभिमान बिहारीच्या या वर्तनानें आणि भाषणानें गळून जाऊन सतीशला क्षमा करावयाला ती एकदम तयार झाली, हें खरं; परंतु त्याबरोबरच म्हाताऱ्याच्या तोंडून ऐकलेल्या सावित्रीच्या कहाणींतील कित्येक प्रसंग तिच्या डोळ्यांसमोर उभे राहून, तिचें शिथिल झालेलें मन क्षणार्धांत पुनः शुष्क–अगदीं लांकडाप्रमाणें कठीण झालें !

ती मान हलवून शांत, पण कठोर स्वरानें म्हणाली, '' नाहीं, बिहारी, भ्यायचं तुला मुळींच कांहीं कारण नाहीं. सावित्री येतांच सर्व कांहीं ठीक, व्यवस्थित होऊन जाईल पहा. पण माझ्याकडून मात्र तुझं कांहीं काम होण्यासारखं नाहीं. ''

सरोजिनीकडून असें निष्ठुर उत्तर मिळेल, अशी बिहारीला स्वप्नांतही कल्पना नव्हती. त्याच्या स्वतःच्या सर्वजय प्रेमापुढें सरोजिनीचा हा शुष्क कंठस्वर त्याला इतका कठोर आणि तापदायक वाटला, कीं कांहीं वेळपर्यंत तो विव्हल दृष्टीनें तिच्याकडे नुसता पहातच राहिला.

नंतर एक शब्दही न बोलतां पुनः एकवार सरोजिनीला प्रणाम करून तो तेथून निघून गेला.

## १४

क्षयरोगानें जर्जर झालेल्या आपल्या पत्नीच्या उपचारासाठीं उपेन्द्र पांच सहा महिने नैनितालला जाऊन राहिला होता, तो कांहीं दिवसांपूर्वी बक्सारला परत आला होता.

सुरबालेची ही शेवटची इच्छा होती.

त्या दिवशीं संध्याकाळ उलटून गेल्यानंतर, दिव्याच्या शांत स्निग्ध प्रकाशाकडे दृष्टि लावून ती परलोकाला जावयाला निघालेली तरुणी किती वेळ तरी मुकाट्यानें बिछान्यावर पडून राहिली होती.

नंतर पतीच्या हातावर आपला उजवा हात ठेवून ती हळूहळू म्हणाली, "तुमच्या शब्दाविषयीं मला आजपर्यंत कधींच कसली शंका आली नाहीं. आज मला एक गोष्ट तुम्ही सत्याला स्मरून सांगाल गडे? पण फसवणार नाहीं, असं आधीं कबूल करा बरं–"

मृत्यूच्या दाराशीं पडलेल्या आपल्या प्रिय पत्नीच्या मुखाशीं वांकून उपेन्द्रानें विचारलें, "कोणती गोष्ट, पशु?"

सुरबाला क्षणभर गप्प राहिली.

तिनें नंतर क्षीण स्वरानें विचारलें, "तुमचा लाभ पुन्हां मला होईल ना?"

पत्नीच्या कपाळावरच्या रुक्ष केसांच्या बटा बाजूला करून उपेन्द्र दृढ स्वरानें म्हणाला, "होईल–अगदीं खात्रीनें होईल."

"बरं–किती दिवसांनीं बरं होईल तो लाभ मला? मी तर ही लवकरच निघालें. पण तिथपर्यंत तुमच्यासाठीं कुठं मी वाट पहात बसून राहूं बरं?"

"स्वर्गांत वाट पहात रहा माझी तूं. तिथून सदोदित तूं मला पाहूं शकशील, पशु!"

" पण मी तिथं एकटीच एकटी कशी हो राहूं ? काय हो, पण सगळ्या डाक्टरनींच माझी सारी आशा सोडली का ? मी वांचेन असं खरोखरच का एकादं औषध नाहीं ? मी गेलें म्हणजे तुम्हाला भारी कष्ट पडतील हो ! "

डोळ्यांतून वेगानें येणारे अश्रु थांबवून धरणें उपेन्द्राला आतां कठिण झालें. त्यांपैकीं एक मोठा अश्रु टपकन् सुरबालेच्या कपाळावर पडला.

त्याच्या अन्तर्यामांतील कोपऱ्याकोपऱ्याचें मंथन करून एक प्रचंड आक्रोशाचा ध्वनि निघाला—' परमेश्वरा, पतीच्या हृदयांत केवळ इतकं अमर्याद प्रेमच तूं निर्माण केलंस; परंतु प्रेमस्नेहाचं निधान अशा प्राणप्रिय वल्लभेला जगांत एक दिवसही अधिक ठेवूं शकेल, असं कसलंही सामर्थ्य तूं त्याला दिलं नाहीस ! '

आपला क्षीण हात वर करून सुरबालेनं पतीचे डोळे पुसले. नंतर ती हळू-हळू म्हणाली, " तुमचं हें रडणं मला मुळींच सहन नाहीं हो होत !—माझी आणखी एक विनंति मान्य कराल ? "

मान हलवून उपेन्द्र म्हणाला, " जरूर. "

सुरबाला म्हणाली, " तर मग माझी धाकटी बहीण शची हिच्याबरोबर धाकट्या भाऊजींचं लगीन लावून द्या. पुष्कळ दिवसांत ते मला भेटले नाहींत. चार दोन दिवसांत अभ्यासाचं असं त्यांचं कितीसं नुकसान होणार आहे ? एकवार कलकत्त्याहून इथं यायला भाऊजींना तार करा ना हो ! "

उपेन्द्राच्या काळजांत पुनः एकदां तीव्र शस्त्राची जखम झाली. दिवाकरवर सुरबालेची केवढी ममता होती, हें उपेन्द्राला ठाऊक होतं. परंतु तिची ही शेवटची इच्छा पूर्ण करण्याचा त्याला कोणताही उपाय सुचत नव्हता.

दिवाकराची परमश्रेष्ठ कीर्ति त्यानें पत्नीपासून आजपर्यंत गुप्तच ठेवली होती. आजही ती त्यानें तिच्यापाशीं प्रकट केली नाहीं.

टेलिग्राफ करण्याच्या तिच्या आग्रहाला बगल देऊन उपेन्द्र म्हणाला, " पण त्याच्याबरोबर शचीचं लग्न व्हावं या गोष्टीला पहिल्यानं तुझी संमति नव्हती. परंतु केवळ माझ्या आग्रहामुळं तूं त्याला कबूल झालीस. आतां माझं स्वतः-चंही त्या बाबतींत मत बदललं आहे. शचीसाठीं कितीतरी पटीनं उत्तम स्थळ मी पाहून देईन. पण हें लग्न नको–अगदीं नको, सुरबाला ! "

सुरबाला आग्रहानें म्हणाली, " नाहीं–तसं व्हायचं नाहीं, धाकट्या भाऊजीं-बरोबरच शचीचं लगीन झालं पाहिजे. "

तिच्या या आग्रहाचें उपेन्द्राला आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. क्षणभर तो तिच्याकडे पहात राहिला.

" कां बरं–असा आग्रह कां तुझा ? "

सुरबाला म्हणाली, " तिचा चेहरा तुमच्या दृष्टीला पडला, म्हणजे पुढं कधींही आमचा संबंध तुम्हाला परकी वाटणार नाहीं. शिवाय, शची घरांतच असली, म्हणजे तुम्हालाही हवं नको ती बरोबर पाहील. "

उपेन्द्र अन्यमनस्कतेनें म्हणाला, " ठीक आहे. अशक्य न झालं तर जरूर तसं करूं. "

आणखी तीन दिवस गेले.

सुरबालेची तब्येत अधिक बिघडल्याची बातमी कळून, उपेन्द्रानें येऊं नको म्हणून कळविलें असतांही, महेश्वरी बक्सारला येऊन उपस्थित झाली.

नणंदेच्या मांडीवर डोकं टेंकून सुरबाला क्षीण स्वरानं म्हणाली, " मी गेल्या-वर यांच्यावर तुमची नजर असूं द्या, वन्सं ! मला चांगलं माहीत आहे, पुन्हां हे कधीं लग्न करणार नाहींत. परंतु त्यामुळं यांना अतिशय कष्ट होतील. तुम्ही सगळी मंडळी यांना हवं नको नीट पहा–दुसरं काय सांगूं ?—तुम्हां सर्वांना माझी शेवटची हीच प्रार्थना आहे. "

बोलतां बोलतां तिचा गळा अतिशय दाटून येऊन डोळ्यांतून आंसवें झर-झरां गळूं लागलीं.

सुरबालेच्या छातीशीं वांकून महेश्वरीनें टाहोच फोडला ! परंतु तिच्या तोंडां-तून एक शब्दही निघेना !

अशा रीतीनें आणखींही चार पांच दिवस गेले. नंतर एके दिवशीं सकाळीं पतीच्या मांडीवर डोकें ठेवून, आसपासच्या सर्व लोकवसतीला शोकसागरांत निमग्न करून ती सतीसाध्वी स्वर्गाला निघून गेली.

शान्त स्थिर चित्तानें पत्नीचें अन्तिम कृत्य पूर्ण करून, महेश्वरीला घेऊन उपेन्द्र घरीं परत आला.

उपेन्द्राचे वडील शिवप्रसादबाबू मुलासाठीं अतिशय काळजींत पडले होते. परंतु तो आल्यावर, त्याच्या चेहऱ्याकडे पाहून बरीचशी स्वस्थता त्यांना वाटूं लागली. मनांतल्या मनांत ते म्हणाले, नाहीं, जितकं भय वाटलं होतं, तितकं कांहीं नाहीं. इतकेंच नव्हे तर, अल्पावधींत नवीच एक छानदारशी सून घरीं आणावयाच्या आशेलाही त्यांनीं मनांत स्थान दिलें.

परंतु मला वाटतं, अन्तर्यामी सर्वेश्वरानें अलक्षित राहून वृद्धासाठीं त्या दिवशीं दीर्घ निश्वास सोडला !

आणखीं थोड्याच दिवसांनंतर वकिलीचा पोषाख चढवून उपेन्द्र कोर्टांत जावयाला निघालेला पाहून शिवप्रसादबाबूंना अतिशय समाधान वाटूं लागलें.

इतकेंच नव्हे, तर अत्यानंदाच्या भरांत मुलाला थोडा वेळ जवळ बोलावून, जगत्संसाराच्या अनित्यतेसंबंधीं अनेक हिताच्या गोष्टी त्याला सांगून ते शेवटीं म्हणाले, " उपेन, तुला मी आणखीं काय समजुतीच्या गोष्टी सांगणार, बाबा? तूं सगळं कांहीं जाणतो आहेस, सर्व कांहीं तुला समजतं आहे. या जगांत कांहीं दिखील चिरकाल रहाणारं नाहीं. आज जें आहे, तें उद्यां नाहीं. काल जें होतं, तें आज नाहीं. कुणीही कुणाचा नाहीं. सर्व कांहीं मिथ्या! सगळा हा मायेचा खेळ आहे बाबा! कांहीं झालं तरी, अखेरी हातची सोडायची नाहीं, ती साधायचीच, एवढी गोष्ट मात्र तूं सदोदित लक्षांत ठेव, बाबा! प्राणांपलीकडे श्रम करून आपली शक्य तेवढी उन्नति करून घ्यायची मनुष्याच्या आयुष्यांतली वेळ हीच असते. अरे, कुणाचा कोण जगांत? शास्त्रांतच सांगितलं आहे ना?—' चलाचलमिदं सर्वं कीर्तिर्यस्य स जीवति! ' याचा अर्थ एवढाच, कीं मानसंमान म्हण, कीर्ति म्हण, सगळ्या सगळ्याचा अर्थ–पैसा! पैसा अन् तो मिळवण्यासारखा योग्य व्यवसाय, यावरच जगाचा सगळा भार आहे बाबा! आतां तूंच पहा ना उपेन, सतीशाचे वडील किती पैसा मागं ठेवून निघून गेले, सांग बरं!"

असें म्हणून शिवप्रसादबाबू गंभीरतेनें मान हलवूं लागले.

उपेन्द्र खालीं मान घालून त्यांचें हें सर्व लांबलचक व्याख्यान मुकाट्यानें ऐकत होता.

वडील बोलावयाचे थांबतांच वर मान करून तो म्हणाला, "खरं आहे."

आणि असें म्हणून तो कोर्टाकडे निघून गेला.

कोर्टांत सतीशाच्या वडील भावाशीं त्यांची भेट झाली. घडलेल्या दुर्घटनेविषयीं अत्यंत दुःख प्रदर्शित करून त्यानें अखेरीला सतीशाची गोष्ट काढली.

उपेन्द्राची कल्पना होती, कीं वडिलांच्या मृत्यूनंतर आतांपर्यंत सतीश घरींच आहे. परंतु आतां त्याला कळलें, कीं तो घरीं आहे खरा; परंतु येथल्या नव्हे,–देशांतल्या!

दुनुबाबू हे सतीशाचे वडील सावत्र-भाऊ. त्याच्याविषयीं त्यांचें कधींच

चांगलें मत नव्हतें. कधीं त्याच्याकडे त्यांनीं चांगल्या नजरेनें पाहिलेंच नाहीं. एका घरांत राहूनही त्याचा यत्किंचित् समाचार घ्यावयाचीही त्यांना कधीं आवश्यकता भासली नाहीं !

तसें म्हटलें तर सतीशबरोबर टुनुबाबूंचा कांहीं संबंधच नव्हता, असें म्हटलें तरी तें चुकीचें होणार नाहीं. वडिलांच्या मृत्यूनंतर सतीश निम्मे संपत्तीचा मालक झाल्यामुळें दादांची अधिकच विखारी नजर त्याच्यावर पडली होती !

दादा उपेन्द्राला म्हणाला, " इतक्यामध्येंच जवळजवळ तीस चाळीस हजार रुपये खर्च करून सतीशनं दोन मस्त डिस्पेन्सरीज उघडल्या आहेत. शंभर रुपये महिन्यावर एक डॉक्टरही आणला आहे. शिवाय घराचंही स्वारीनं हॉस्पिटल बनवलं आहे. "

उपेन्द्र सहजभावानें म्हणाला, " आतां ठीक. पुष्कळ दिवसांपासून त्याचा असा हेतु होता खरा. केवळ पैशाच्या अभावीं त्याला कांहीं करतां आलं नसावं, असं मला वाटतं. "

टुनुबाबू व्यंग्योक्तीनें किंचित् हंसून म्हणाले, " तसं मलाही वाटतं, उपेन ! पण त्याच्या परमेश्वर-भक्तीच्या साधन-भजनाचा हेतु तुला माहीत नसणार, ही माझी पक्की खात्री आहे, दोस्त ! "

उपेन्द्राला ही बातमी ऐकून आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं !

" साधन-भजन हें काय प्रकरण आहे आणखीं ? "

टुनुबाबू म्हणाले, " तें मोठं गुढ आहे, उपेन ! चक्र, कारण, पंचमकार वगैरे वगैरे ! बेटा नुसता फिलॉन्थ्रफिस्ट नाहीं--आतां एक जंगी, श्रेष्ठ दर्जाचा साधु बनला आहे आमचा ' सतीशस्वामी ' ! भगवीं वस्त्रं, जंगी दाढी-मिशी, डोकीवर मोठाल्या केसांच्या बटा, गळ्यांत रुद्राक्षांच्या माळा, कपाळीं शेंदराचे हे थोरले पट्टे !--अन् नेहमीं गरगर फिरणारे डोळे ! त्याची सही घेऊन येण्याकरतां एक दिवस रासबिहारीला पाठवला होता मीं--पण दोन दिवस त्याचा तो अवतार पाहून भयानं तो त्याच्या जवळही जाऊं शकला नाहीं ! अन् हें पत्र बघ वाचून, उपेन ! त्याचा नोकर तो बिहारी आहे ना, त्यानं मला हें लिहिलं आहे. अजून कांहीं त्याला उत्तर पाठवलं नाहीं मीं--म्हणून खिशाखिशांतून तें सारखं फिरतं आहे बेटं ! "

असें म्हणून पिंवळ्या रंगाचा एक घडी केलेला कागद खिशांतून बाहेर काढून त्यांनीं तो उपेन्द्रापुढें ठेवला.

धन्यापुढें निरुपाय झालेल्या बिहारीनें त्याच्या वडील बंधूला पत्र पाठवून उपायांची भिक्षा मागितली होती. गांवांतील एकाद्या लहान अज्ञान मुलाकडून त्यानें हें पत्र बहुतेक लिहून घेतलें असावें, असें दिसत होतें. अथपासून इतीपर्यंत सर्व पत्र वाचणें उपेन्द्राला अशक्य झालें असलें, तरी जो मजकूर वाचतां आला किंवा समजला, त्यामुळें उपेन्द्र कांहीं काळ अगदीं स्तंभित होऊन गेला !

उपेन्द्राचा लहानपणापासूनचा परम मित्र, त्याचा उजवा हात, त्याचा धाकटा भाऊ–तोच सतीश आज अधःपाताच्या इतक्या खालच्या थराला जाऊन पोंचला आहे, कीं उघड उघड हीं सारीं किळसवाणीं नामांकित कृत्यें करूनही गांवामध्यें छाती काढून फिरावयाला त्याला लाज कशी ती वाटत नाहींच; पण उलट आपण मोठें कार्यसाधन करीत आहों, अशी मनाची समजूत करून घेऊन तो आत्मप्रसादाच्या आनंदांत अगदीं तल्लीन झाला आहे ! बहुधा त्याची ती कुलटा हलकट दासीही त्याच्या या 'धर्मसाधनां'त सामील असावी ! त्याशिवाय बिहारीच्या पत्राच्या झोंकावरून असेंही दिसत होतें, कीं गांवांतले बरेचसे निरुद्योगी उडाणटप्पूही त्याच्या गळ्यांत गळा घालून राहिले असावेत !

अन्यमनस्क होऊन उपेन्द्रानें पत्र खिशांत घातलें, आणि कोर्टांतून तो घरीं आला. पत्र दुनूला द्यायचें भानही त्याला राहिलें नाहीं.

पत्र पोस्टाच्या पेटींत टाकून पहिल्यानें कांहीं दिवस बिहारी दुनुबाबू येतील या आशेनें त्यांची आतुरतेनें वाट पहात राहिला. नंतर, त्यांचें उत्तर तरी येईल, म्हणून अधीरतेनें एक एक दिवस काढूं लागला.

दिवसामागून दिवस जाऊं लागले; पण दुनुबाबू तर आले नाहींतच; पण त्याच्या पत्राची दोन ओळींची पोंचही त्यांच्याकडून आली नाहीं !

विशेषेंकरून 'थाकोबाबाच्या अत्यंत दुर्वृत्त वर्तनामुळें अतिशय त्रासून बिचारा बिहारी अगदीं मेटाकुटीला आला होता ! 'थाकोबाबा' हे एक तांत्रिक संन्यासी सिद्धपुरुष होते. हे सतीशचे मंत्रगुरु. अष्टौप्रहर, चौवीस तास हे दारूच्या किंवा गांजाच्या कैफांत असून त्यांची मिजास दुर्वासापेक्षांही अधिक जाज्वल्य आणि तापदायक होती. त्यांचें तोंड इतकें खराब होतें, कीं केवळ रागाच्या भरांतच नव्हे, तर तब्येत खुष असतांही त्यांचें भाषण ऐकतांना कानांत बोटें घालावीं लागत !

परंतु हेंच म्हणे तांत्रिक सिद्ध साधूंचें एक लक्षण! शिवाय ते सतीशचे गुरु ना!

आणि स्वतः बिहारीच्या बाजूनें पाहिलें तरी बाबांसंबंधानें त्याची श्रद्धा कमी नव्हती. परंतु सतीशला अनिष्ट असलेल्या कोणत्याही गोष्टीचा नुसता वासवारा लागतांच बिहारीचें हिताहितज्ञान नाहींसें होऊन जाई, हें पूर्वी सांगितलेंच आहे.

'गुरुबाबां'च्या शिक्षणक्रमांतील सतीश आणि त्याचें टोळकें यांची रात्रीची गुप्त चक्रसाधना आणि तिच्यापेक्षांही अधिक गुप्त अशीं त्यांचीं आनुषंगिक अनुष्ठानें वगैरे चाळे इतके दिवस बिहारीनें कसे तरी सहन केले होते. परंतु ज्या दिवशीं भर दोन प्रहरीं सतीशनें 'बाबां'कडून दारू आणि गांजा यांचा 'प्रसाद' सेवन करून दंगल माजविली, त्या दिवशींचा तो प्रकार मात्र बिहारीला बिलकुल सहन झाला नाहीं.

सतीश घरीं नसतां तो गुरुबाबांच्या खोलींत घुसला, आणि त्यांच्या पायांची धूळ घेऊन नम्रपणें हात जोडून तो भक्तिभावानें म्हणाला, "बाबा, दिवसाच्या वेळीं तरी आपण बाबूजींना दारू अन् गांजा यांचा प्रसाद देऊं नका."

आगींत तुपाची आहुतिच पडली!

क्षणार्धांत 'बाबा' सप्तमांत चढून चीत्कार करत झाले, "साल्या, तूं 'दारू' म्हणतोस तिला?"

बिहारी नम्र वाणीनें म्हणाला, "कुणाला माहीत, बाबा! पण आमच्या देशांत तर तिला 'दारू'च म्हणतात."

'बाबा' पुनः खूप चढ्या स्वरानें ओरडले, "दारू? हूंः! पण तुला साल्या, करायचं आहे काय? अन् तूं मला असं सांगणार कोण रे एवढा टिकोजी?"

बिहारीची सहनशक्तिही हळुहळू कमी होऊन मिजास तापत चालली होती.

तोही आतां खड्या स्वरांत उत्तरला, "मी बाबूजींचा नोकर."

"अरे हायरे माझा एकनिष्ठ नोकर!" असें हेटाळणीच्या स्वरांत अंगविक्षेपांसह म्हणून 'बाबां'नीं एक अश्राव्य शिवी त्याला हांसडली, आणि दांत विचकून ते ओरडले, "पण तुझ्या बाबूंचा बाबा मी, ठाऊक आहे तुला?"

बिहारी खालीं बसला होता, तो एकदम ताडकन् उठून उभा राहिला.

मुठी घट्ट वळून तो ओरडला, "खबरदार! माझ्या समोर हें असलं कांहीं बोलूं नका. बजावून ठेवतों तुम्हाला—"

' थाकोबाबां ' च्या ठिकाणीं दिवसारात्रींमध्यें सहज, साधेंसुधें ' जीवन-चैतन्य ' बहुधा चार दोन क्षणही नसे ! ते नेहमीं निराळ्याच लोकांत वावरत असत !

पण आतां सर्वच मनु पालटला ! बिहारीनें प्रकट केलेलें निराळेंच स्वरूप पाहून ' बाबा ' अगदींच हिताहितज्ञानशून्य बनले !

त्यांनीं डोळे अधिकच तांबारले, आणि ते ओरडले, " काय करणार आहेस रे साल्या, तूं ? "

असें म्हणून समोरचा खडावा उचलून त्यांनीं तो बिहारीच्या माथ्याकडे खूब जोरानें भिरकावला.

तत्क्षणीं बिहारीच्या नाकांतून झरझर रक्त गळूं लागलें, आणि एका क्षणार्धांत त्याच्या हृदयांतील कोणत्याशा अज्ञात स्थानांतून चाळीस वर्षांपूर्वीचें गरम सळसळणारें रक्त एकदम मगजापर्यंत चढलें !

खोलीच्या एका कोंपऱ्यांत ' बाबां ' चा चार हात लांबीचा लोखंडी त्रिशूल ठेवलेला होता. डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्या अवकाशांत बिहारीनें तो ओढून घेतला, आणि ' बाबां ' च्या माथ्याचा नेम धरून उगारला.

प्राणांच्या भयानें दोन्ही हात वर करून ' बाबां 'नीं कुत्र्याप्रमाणें एकदम आरोळी ठोकली.

त्यांची ती आरोळी इतकी भेदक होती, कीं स्वतः बिहारीही क्षणार्धांत एकदम भानावर आला. हातांतला उगारलेला त्रिशूल खालीं करून त्यानें तो परत त्या कोंपऱ्यांत ठेवला, आणि नाकांतलें रक्त पुशीत पुशीत तो तेथून निघून गेला.

तासाभऱ्यानें सतीशनें त्याला विचारलें, " खरं, बिहारी ? "

बिहारी म्हणाला, " हो. "

परंतु त्यानें आपल्या रक्तस्रावाचा धन्यासमोर नुसता उल्लेखही केला नाहीं !

सतीश क्षणभर स्तब्ध राहून म्हणाला, " तुला या घरांत आतां मला राहूं देतां यायचं नाहीं, बिहारी ! पण तुझा संबंधही मी तोडीत नाहीं. दोनशें रुपये तुला मी देतों, ते घेऊन तूं घरीं जा. पुढं महिन्याच्या महिन्याला तुझा पगार मी तुझ्या घरीं पाठवीत जाईन. "

बिहारीनें मान हलवून खालीं घातली, आणि तो म्हणाला, " जो हुकूम, मालिक ! "

त्यानें मनांतला शोक लवमात्र बाहेर दाखविला नाहीं; क्षमाही मागितली नाहीं. धन्यानें दिलेले दोनशें रुपये उपरण्याच्या टोंकाला बांधून घेऊन, मालकांच्या पायांची धूळ मस्तकीं धारण करून, संध्याकाळापूर्वी तो गांव सोडून निघून गेला.

वरच्या व्हरांड्यांत उभा राहून, बिहारीची मूर्ति जोंपर्यंत दिसत होती, तोंपर्यंत सतीश त्याच्याकडे एकसारखा पहात होता. शेवटीं विधु पालच्या दुकानाच्या आड जेव्हां तो दिसेनासा झाला, तेव्हां त्यानें फक्त एक उसासा टाकला, आणि तो स्वतःशींच उद्गारला, " जाऊं दे—इतक्या दिवसांनीं बिहारी दिखील गेला ! "

या वर्षी आश्विनच्या पहिल्याच आठवड्यांत महामायेच्या पूजेचा सण आला होता. अजूनही त्याला बराच अवकाश होता. परंतु, या वेळीं मायेच्या पूजेची कशी काय व्यवस्था करावी, याविषयीं सतीशच्या मित्रमंडळींत जोरानें चर्चा सुरू झाली. महा–अष्टमीच्या कार्यक्रमासाठीं एव्हांपासूनच तयारीला सुरुवात करणें अवश्य होतें.

परंतु भाद्रपदाच्या मध्यापासूनच मलेरियाच्या सांथीला चांगलाच जोर चढला. इतकेंच नव्हे तर चार दोन सन्निपातज्वराच्या रोग्यांसाठींही डॉक्टरसाहेबांनीं धांवाधांव करावयाला प्रारंभ केला होता.

आज कित्येक दिवसांपासून सतीशला चांगलेंसं बरें वाटत नव्हतं. शरीरांत कांहीं बिघाड झाल्यासारखें वाटत होतं.

ज्या दिवशीं बिहारी निघून गेला, त्या रात्रीं तर तापाचीं लक्षणें अगदीं स्पष्टपणें दिसूं लागलीं.

कदाचित् एकादशीच्या उपवासामुळें असा भास होत असेल, अशा कल्पनेनें दुसऱ्या दिवशीं सकाळीं सतीशनें विकाराची थोडी उडवाउडवीच केली. परंतु जी वस्तुस्थिति, जिला प्रत्यक्ष वजन–भार–आहे, तिला अशा सहज रीतीनें उडवून देतां येणें शक्य नसतें. आपलें शरीर नेहमींप्रमाणें सुस्थ आणि आरोग्यपूर्ण नाहीं, ही वस्तुस्थिति सतीशच्या मनाला दिवसभर सारखी टोंचीत होती.

यानंतर तीन दिवसांनीं, पूर्वीच्या रीतीप्रमाणें आजच्या चतुर्दशीच्या रात्रींही मोठ्या थाटामाटानें पूजा करावयाची सर्व तयारी झाली होती. परंतु सतीशनें स्वतः तींत भाग घ्यावयाला नकार दिला.

संध्याकाळीं गुरु–बाबांनीं येऊन सतीशच्या मस्तकावर 'शान्ति'जलाचें

सिंचन केलें, आणि कमंडलु त्याला दाखवून हंसत हंसत ते त्याला म्हणाले, " बाबा, याच्यावर यमराजाचा कांहीं अधिकार चालत नाहीं. शिवाय, तूं आहेस एकंदर प्रकाराचा मूळ आधार ! तूं नसलास, तर सगळं कांहीं फुकट जाईल बघ. "

गुरुजींचा आदेश सतीशनें अमान्य केला नाहीं. स्वतःच्या इच्छेविरुद्ध तो पूजाविधींत भाग घ्यावयाला तयार झाला.

खरा प्रकार असा होता, कीं बिहारी निघून गेल्यानंतर, सर्व प्रकरणाचें मनांतल्या मनांत पर्यालोचन केल्यामुळें, चालल्या प्रकारापैकीं त्याच्या मनाला कांहींसुद्धां सुचत नव्हतं. बिहारी आपली रजा घेऊन कायम निघून गेला; पुनः तो कधींही यावयाचा नाहीं, असें जरी क्षणभरही सतीशला मनःपूर्वक वाटत नव्हतें, तरी शक्य तितक्या लवकर त्याची आपली भेट व्हावी म्हणून त्याचा प्राण अगदीं व्याकुल होऊन गेला होता.

याशिवाय दुसऱ्याही एका चिंतेचे इंगळे सतीशाच्या मनाला आंतल्या आंत लागून राहिले होते. बिहारी गेला तो सरळ स्वतःच्या घरींच गेला, कीं आपल्या पश्चिमेकडील घरीं गेला; तेथें जाऊन येथल्या सर्व प्रकारांचें गुणसंकीर्तन करून आपल्याविषयीं कांहीं तरी कुत्सित आणि अत्यंत अनिष्ट लौकिकाचा प्रचार त्यानें चालविला आहे; किंवा दुसराच कांहीं मतलब साधावयाचा विचार तो करीत आहे; वगैरे अनेक काळजीचे प्रश्न त्याच्या मनाला अत्यंत अस्वस्थ करीत होते.

कांहीं असलें, तरी बिहारीला स्वतःच्या डोळयांनीं पाहिल्याशिवाय आपलें चित्त शांत आणि स्थिर व्हावयाचें नाहीं, अशी सतीशाच्या मनाची पूर्ण खात्री झाली.

संध्याकाळापूर्वी दुसऱ्या मजल्यावरील दालनांत जमलेल्या मित्र-मंडळींत एक-दोन वाडगे झोंकल्यानंतर सतीशाची ही निर्जीव भावना बरीचशी नाहींशी झाली. तरीही, मनाच्या अन्तर्भागीं राहून राहून त्याला वेदना होत असून ग्लानिही येतच होती.

तोंच शेजारच्या खोलींतून बिहारीचा कंठस्वर अकस्मात् ऐकूं आल्यामुळें सतीशला अत्यंत आश्चर्य तर वाटलेंच; पण विलक्षण आनंदानें त्याचें मन पुलकित झालें.

त्यानें चटकन् हांक मारली, " बिहारी नव्हे काय रे ? "

बिहारी चटकन् दरवाजाशीं येऊन अतिशय अदबीनें उत्तरला, " जी, मालक ! "

' गुरुबाबां 'चा चेहरा मात्र तत्क्षणीं अतिशय काळवंडला.

त्यांनीं सतीशकडे पाहून रागानें विचारलें, " हा बेटा फिरून कां आला रे ? अन् आला तर साला या खोलींत कसा घुसला ? "

या खोलींतच त्यांच्या मध्यरात्रींच्या चक्रसाधनाची तयारी चालली होती.

' बाबां 'च्या या सर्व प्रश्नांचीं उत्तरें न देतां सतीशनें बिहारीला विचारलें " तूं घरीं गेला होतास ना रे ? "

बिहारी म्हणाला, " जी, नाहीं. मी काशीला गेलों होतों."

" काशीला कशाला रे ? "

" आईला आणायला. "

सतीश त्याच्या या उत्तरानें एकदम चमकला. बिहारी कोणत्या व्यक्तीला ' आई ' म्हणून संबोधीत असे, हें सतीशला चांगलें माहीत होतें.

त्यानें विचारलें, " ती काशीला असते वाटतं ? "

बिहारी म्हणाला, " जी, होय. "

" तुला तिचा पत्ता ठाऊक होता ? "

बिहारी म्हणाला, " नाहीं. पण मला ठाऊक होतं, कीं आई कुठंही असली, तरी विश्वनाथाच्या देवळांत एक दिवस तरी तिची भेट होईलच होईल."

" झाली का भेट ? "

" जी–झाली."

सतीशच्या काळजाच्या अन्तर्भागीं एकाएकीं जबरदस्त वादळ उठलें ! आपणाला थोडेंफार सांवरून घेण्यासाठीं तो कांहीं वेळ स्थिर बसून राहिला.

नंतर शुष्क स्वरानें तो म्हणाला, " पण बिहारी, मला कांहीं न कळवतां तिकडे तूं गेलास, हें कांहीं तूं चांगलं नाहीं केलंस. त्या माणसांना मानापमान, लज्जा–शरम याची जाणीव तिळमात्र दिखील नसते. तुला खुळाबावळा बघून तुझ्याबरोबर ती जर निघून आली असती, तर तूं केवढ्या मोठ्या संकटांत पडला असतास, याची कल्पना आहे तुला ? "

बिहारी कांहीं न बोलतां उभा राहिला.

सतीश कांहीं क्षणांनीं आपणच पुढें बोलूं लागला, " तिला घरांत पाऊल दिखील घालूं दिलं नसतं मीं. दरवानाकडून फाटकांतूनच हांकून दिलं असतं

मीं. तिच्यामुळं अशा ऐन रात्रीं तुझी किती मुष्किल झाली असती, याची नुसती तूं मनाशीं कल्पना कर पाहूं. उगाच कारे लोक तुम्हाला गांवढळ बावळट म्हणतात ते ! बरं जा—खाणं पिणं उरकून घे झटकन्. कालीचरण, आणखीन् एक मोठा वाडगा भरपूर भरून दे बघूं, दोस्त ! ”

हुकूम होतांच कालीचरणनें एक वाडगा ‘ कारण ’ प्रमुख भक्तांच्या हातीं आणून दिलें.

बिहारी मृदु स्वरानें हळूच म्हणाला, “ बाबूजी, आई एकवार आंत येऊन जायला सांगते आहे तुम्हाला. ”

सतीश वाडगा तोंडाला लावणार होता; तों एकदम चमकून त्याच्याकडे पहातच राहिला.

त्यानें विचारलें, “ कोण सांगते आहे, म्हणालास ? ”

बिहारी म्हणाला, “ आई—”

सतीशनें हतबुद्ध होऊन चटकन् हातांतला वाडगा पिकदाणींत उपडा केला. त्याचा हात थरथरत होता.

त्यानें विस्मयस्तंभित होऊन विचारलें, “ तुझ्याबरोबर आली आहे ? मग मला अगोदर कां नाहीं बोललास ? ”

बिहारी धन्याच्या या प्रश्नाला उत्तर न देतां पुनः म्हणाला, “ आईनं तुम्हाला आतांच्या आतां एकवार येऊन जायला सांगितलं आहे, बाबूजी ! ”

सतीश स्वर बराच खालीं आणून म्हणाला, “ तूं जाऊन सांग जा, बिहारी, कीं बाबूंना ताप आला आहे, म्हणून बाहेरची त्यांची कांहीं मित्रमंडळी त्यांच्या समाचाराला आली आहे. अर्ध्या एक तासानं येतों म्हणावं मी—”

आपल्या हाताजवळचा दरवाजा डोळ्याच्या खुणेनें दाखवून बिहारी हळुहळू म्हणाला, “ आई ही इथंच उभी आहे, बाबूजी ! थोडें बाहेर येऊन जा म्हणजे झालं. ”

सतीश आतां विलक्षणच चकित झाला !

खोलीकडे बोट करून त्यानें विचारलें, “ या खोलींत ? ”

मान हलवून बिहारी म्हणाला, “ हो, तिथंच. ”

सतीशनें झटकन् जवळच्या पानदानांतून दोन लवंगा आणि वेलचीदाणे तोंडांत कोंबले, आणि तो एकदम उठला. नंतर धीरे धीरे तो बाहेर आला.

शेजारच्या दरवाज्याच्या आडून सावित्रीच्या साडीचें टोंक त्याला दिसलें.

सावित्रीनें स्वतःच्या कानांनीं सर्व कांहीं ऐकलें, याविषयीं सतीशला आतां तिळमात्र शंका राहिली नाहीं. या गद्धया, बावळट, मूर्ख बिहारीच्या चांगल्या दोन श्रीमुखांत द्याव्या, असें त्याला वाटूं लागलें.

सावित्री चटकन् बाहेर डोकावली, आणि अतिशय मृदु स्वरानें, हळूच म्हणाली, " खोलींत या—"

या कंठस्वराच्या तराफ्यावर त्याच्या हृदयाच्या सर्व तारा जणूं काय बांधलेल्या होत्या ! त्या सर्वांनीं एकाच स्वरांत एकदम 'झं झं' असा झंकार निर्माण केला !

सतीश खोलींत येतांच सावित्रीनें विचारलें, " ताप आला आहे ? असं तर म्हणालां—"

सतीश मस्तक हलवून म्हणाला, " ताप आलाच आहे कीं ! "

" पाहूं, पाहूं बरं—"

असं म्हणून त्याच्या जवळ येऊन सावित्रीनें हात पुढें करून त्याच्या कपाळावर ठेवला.

ताप बराच होता. त्याचा हाताला चटका बसतांच ती चमकून म्हणाली, " खरंच, ताप आहे कीं ! अंग जणूं भाजून निघतं आहे सारं ! या तुम्ही. मी तुम्हाला बिछाना तयार करून देतें. खोलींत जाऊन पडा तुम्ही, चला. बिहारी, बाबूजींच्या खोलींतला दिवा लावून ये बरं चटकन्. "

असें म्हणून सावित्री तिसऱ्या मजल्याच्या जिन्याकडे निघाली.

घरांत येतांच तिनें बाबूजींची झोंपावयाची खोली कोठें आहे, हें बिहारीला विचारून घेतलें होतें.

पलंगावर बिछाना घातलेलाच होता, तो सावित्रीनें आपल्या पदरानें एकवार चांगला झाडून झटकल्यावर, सतीश एकाद्या शांत, सुध्या बालकाप्रमाणें त्यावर पडला, आणि त्यानें झटकन् डोळे मिटले.

त्याच्या माथ्याजवळची आणि पायथ्याशेजारची अशा दोन्ही खिडक्या बंद करून सावित्रीनें बिहारीला विचारलें," साधुबाबा कोणत्या खोलींत असतो रे ? "

बिहारीनें शेजारच्या खोलीकडे बोट केलें.

सावित्री म्हणाली, " त्याचं तिथं काय काय असेल तें खालीं नेऊन टाक बरं, बिहारी ! बाहेर ओळीनं साऱ्या खोल्या तर रिकाम्या पडल्या आहेत उगी-च्च्या उगीच ! त्यांपैकीं एकाद्या खोलींत छान होईल बाबाची रहायची सोय ! "

बिहारी लगेच तिकडे जावयाला निघाला.

त्याला परत बोलवून सावित्री म्हणाली, " अन् हें वघ, बिहारी, जी मंडळी उगाचच बाबूजींच्या समाचाराला म्हणून आली आहे, त्यांनाही घरीं जायला सांगून ये. म्हणावं, बाबूजींना खूब ताप आला आहे; ते आतां खालीं येऊं शकणार नाहींत."

सावित्री इतकें बोलली; परंतु सतीश त्यावर एक अक्षरही बोलला नाहीं. डोळ्यांप्रमाणेंच तोंडही मिटून तो मुकाट्यानें पडून राहिला.

एकाद्या वीराप्रमाणें दर्पभरानें बिहारी सावित्रीच्या हुकुमाची तामिली करावयाला निघून गेला.

सावित्री म्हणाली, " आतां उठूं नका हं मुळींच. मी फराळाची व्यवस्था ठाकठीक करून येतें."

असें म्हणून दरवाजा बंद करून घेऊन, पायांचा लवमात्र आवाज न करतां ती तेथून निघून गेली.

' साधुबाबा ' जटांत राख घालून कदाचित् बंड करून उठतील, अशी सावित्रीची कल्पना होती. म्हणून कोणाला कांहीं दाद लागूं न देतां ती दरवाजाआड येऊन उभी राहिली.

क्षणभरानें पलीकडच्या दरवाज्यानें बिहारी आंत येऊन जोरदार आवाजानें म्हणाला, " आईनं सांगितलं आहे, कीं तुम्हीं सर्व मंडळींनीं आतां निघून जावं. बाबूजींचा ताप बराच वाढला आहे. आज त्यांना आतां खालीं येतां यायचं नाहीं."

नंतर ' थाकोबाबां 'ना उद्देशून तो त्याच आवाजांत म्हणाला, " तुमचे जिन्नसपान्नस बाबाजी, खालीं निवारणच्या खोलीजवळच्या खोलींत नेऊन ठेवायला आईचा हुकूम आहे. तुम्हीं तिथंच रहायचं."

' बाबां 'नीं तिळमात्र उग्रता प्रकट केली नाहीं.

शांतपणें त्यांनीं विचारलें, " आई कोण, बिहारी ? "

बिहारीनें कडूजहर स्वरानें उत्तर दिलें, " या चांभारचौकशा तुम्हाला कशाला हव्यात, ठाकुर ? मी सांगतों तसं मुकाट्यानं करा. चला खालीं एकदम. "

मनांतल्या मनांत तो नंतर म्हणाला, " आई कोण तें कळेल ताबडतोब तुला. फुकटची दारू पिऊन अन् गांजाच्या चिलम्यावर चिलम्या फस्त करून, खडाव्यानं लोकांचे घोणे फोडायची तुझी सारी मस्ती उद्यां मी बाहेर काढतों ! "

सर्वजण हतबुद्ध होऊन परस्परांच्या तोंडाकडे पहात, तोंडें वेडींवांकडीं करीत

उठण्यासाठीं चाळवाचाळव करूं लागले. कोणालाही यथार्थ परिस्थिति कांहीं कळली नाहीं, हें खरें; परंतु हुकूम जेव्हां खरोखरच करड्या हुकुमाच्या रूपानें, अंकुठित स्वरानें फर्माविला जातो, त्या वेळीं तो कोणाच्याही तोंडून बाहेर पडो, तो मान्य केल्यावांचून गत्यंतर नाहीं अशी, कोणाला ठाऊक कशी ती, पण माणसाची मनः प्रवृत्ति होते, यांत शंका नाहीं.

बिहारी तसाच स्वयंपाकघराकडे आला, आणि पहातो तों, सावित्री स्वयंपाक्याकडून दूध तापवून घ्यावयाच्या उद्योगांत आहे असें त्याच्या दृष्टीला पडलें.

बिहारी तिला म्हणाला, " रात्र तर बरीच झाली. अजूनपर्यंत तुझी आंघोळ आन्हिक कांहीं झालं नाहीं, आई ! सगळ्या दिवसांत गाडींत तोंडांत पाण्याचा एक थेंब दिखील घातला नाहींस तूं. चल, अगोदर तुला आंघोळीची जागाबिगा दाखवून येतों; तोंपर्यंत बाबूजींचं दूध तापवून बिपवून ठाकूर सारी व्यवस्था करतील. "

असें म्हणून बिहारी एक प्रकारच्या जबरदस्तीनेंच सावित्रीला तेथून घेऊन गेला.

सावित्रीची स्नान करावयाला रवानगी करून देऊन बिहारी धन्यासाठीं तमाखू भरून, गुडगुडी फुलवून सतीशच्या खोलींत ती घेऊन आला.

सतीश डोळे मिटून मुकाट्यानें पडला होता. त्यानें डोळेही उघडले नाहींत.

चाहूल लागतांच त्यानें विचारलें, " कोण, बिहारी ? "

" होय, बाबूजी ! गुडगुडी आणली आहे तयार करून. "

" ये. ती कुठं आहे रे ? "

बिहारी म्हणाला, " आतांपर्यंत पाण्याचा एक थेंबही आईच्या तोंडांत गेला नाहीं. म्हणून जरा जबरदस्ती करूनच मीं तिला स्नान करायला पाठवली, तेव्हां हा आलों, बाबूजी ! "

सतीश म्हणाला, " ठीक केलंस. पण मी तुलाच पहात होतों, बिहारी ! "

बिहारी कांहींसा गडबडून जाऊन म्हणाला, " कां–कां, बाबूजी ? आतां कसं काय वाटतं आहे प्रकृतीला ? "

सतीश मान हलवून म्हणाला, " बरी नाहीं रे, बिहारी ! म्हणूनच तुला मी शोधीत होतों. दरवाज्याला कडी लावून ये अन् माझ्याजवळ बस जरासा. "

बिहारी दरवाजा बंद करून आला, आणि शंकाव्याकुल मनानें धन्याच्या पायांपाशीं जमिनीवरच गुडघे टेकून बसला.

सतीशनें विचारलें, " बरं काय रे बिहारी, मृत्युयोगावर तुझा विश्वास आहे का रे?"

बिहारीला धन्याच्या या आकस्मिक प्रश्नाचें आश्चर्य वाटून तो त्याच्याकडे पहातच राहिला !

" आहे काय रे ? "

बिहारी उद्गारला, " मृत्युयोग ? कसा माझा विश्वास नसेल, बाबूजी ? पोथी-पंचांगांत लिहिलेलं कधीं तरी खोटं होऊं शकतं काय, बाबूजी ? "

सतीश कांहीं क्षण गप्प राहिला—नंतर म्हणाला, "या वेळीं माझ्या कुंडलींत एक जबर मृत्युयोग आहे, बिहारी ! "

बिहारीचें अंग एकदम शहारून निघालें.

जोरानें मान हलवून बिहारी म्हणाला, " नाहीं-नाहीं. असं भलतंच कांहीं बोलूं नका, बाबूजी ! "

स्वतःच्या गुंगींतच एक दोन वेळ किंचित् मान हलवून सतीश म्हणाला, " मला पक्कं कळून चुकलं आहे, बिहारी ! माझा हा ताप शेवटचा ताप आहे. यांतून मी आतां वांचत नाहीं. "

तत्क्षणीं धन्याचे दोन्ही पाय हातांनीं दाबून धरून बिहारी आवेगानें उद्गारला, " असे शब्द दिखील तोंडांतून काढूं नका, बाबूजी ! तुमच्या सर्व बला अन् आपत्ति बरोबर घेऊन मलाच अभाग्याला मरण येऊं दे, माझं सारं आयुष्य तुम्हालाच मिळो, बाबूजी ! शंभर-शंभर वर्षं तुम्ही वांचा, धनी ! अन्-अन् तुम्ही गेलांत, तर आम्हीही सगळे मरून जाऊं—एक प्राणीही मग वांचणार नाहीं. "

बोलतां बोलतां गळा दाटून येऊन बिहारी एकदम स्फुंदूं लागला.

सतीश गंभीरपणें म्हणाला, " मरणं किंवा वांचणं, याबद्दल कुणाला कांहीं सांगतां येणार नाहीं, बिहारी ! जर मी वांचलों नाहीं—तर-तर-तुला जें मी विचारीन, तें मला खरं खरं सांगशील ? "

बिहारी रडत रडत म्हणाला, " या तुमच्या पायांना शिवून शपथ घेऊन सांगतों मी, बाबूजी ! एक अक्षरही मी खोटं सांगणार नाहीं. "

" कांहींसुद्धां लपवणार नाहींस ? बोल—"

" नाहीं, बाबूजी ! एक अक्षरही लपवणार नाहीं मी. "

सतीश म्हणाला, " बरं-बरं-बस तर मग. "

डोळे पुसून बिहारी परत आपल्या जागेवर येऊन बसला.

सतीश म्हणाला, " सावित्री तुला कुठं भेटली, सांग पाहूं ? "

" सांगितलंच मीं मघांशीं तुम्हाला, बाबूजी ! काशींत."

" तिथं बिपिनबाबूची अन् तुझी भेट झाली ? "

जीभ बाहेर काढून ती दांतांनीं चावून तो तिरस्कारानें उद्गारला, " तो हरामजादा आमचा कोण, म्हणून त्याची माझी भेट होईल तिथं, बाबूजी ? "

सतीश म्हणाला, " पण तूं स्वतःच त्याला हिच्या बिछान्यावर—"

बिहारीनें दोन्ही हात वर करून त्याला पुढें बोलूंच दिलें नाहीं. अकस्मात् अतिशय उत्तेजित होऊन, स्वतःच्याच गालफडांवर जोराजोरानें ठसठस असे बरेच प्रहार करून तो अतिशय आवेगानें म्हणाला, " त्या पापाची शिक्षा ही-ही-ही ! तरी पण तें मी अजाणतां बोललों, म्हणून अजून पांचजणांपुढं तोंड तरी काढतां येतं आहे मला. तसं नसतं, तर इतक्या दिवसांत माझी ही जीभ गळून पडली असती ! "

सतीश आश्चर्यातिशयानें बिछान्यावर एकदम उठून बसला, आणि त्याच्याकडे पहातच राहिला.

" अरे झालं आहे तरी काय तुला, बिहारी ? "

बिहारीला आपल्या आततायी वर्तनाची जणूं लाज वाटून नजर खालीं लावून तो मुकाट्यानें बसून राहिला.

कांहीं क्षणांनीं तो बराच सावरल्यासारखा झाला. नंतर एकएक गोष्ट सांगावयाला त्यानें प्रारंभ केला.

बिहारीनें यत्किंचित्‌ही कांहीं अधिक सांगितलें नाहीं—एक अक्षरही लपविलें नाहीं. त्याला स्वतःला जें कांहीं माहीत होतें, मोक्षदेकडून, चक्रवर्तीकडून जें जें कांहीं त्यानें ऐकलें होतें, स्वतः सावित्रीच्या तोंडून जें कांहीं त्याला कळलें होतें, तें सारें त्यानें धन्यासमोर एक एक सांगितलें.

पाषाणाच्या मूर्तीप्रमाणें सतीश निःस्तब्धपणें बसून राहिला.

बिहारीच्या तोंडूनही नंतर अक्षर फुटेना !

बऱ्याच वेळानें एक दीर्घ निःश्वास सोडून सतीश म्हणाला, " तर मग इतक्या दिवसांत ही सारी हकीगत तूं मला कां सांगितलीस नाहीं, बिहारी ? "

बिहारी म्हणाला, " बोलण्यासाठीं इतके दिवस माझं काळीज जणूं फाटून जात होतं, बाबूजी ! पण काय वाटेल तें झालं तरी तोंड उघडणं मला शक्य झालं नाहीं. "

" कां, ऐकूं तरी ? "

" आई सावित्रीनं स्वतःची शपथ घालून सांगायला मला मनाई केली होती, बाबूजी ! "

सतीश पुनः कांहीं वेळ स्वतःशींच विचार करीत गप्प बसला.

नंतर तो म्हणाला, " बरं, हें सारं ठीक, बिहारी ! पण त्या दिवशीं रात्रीं 'मला बिपिनशिवाय दुसऱ्या कुणाची जरूर नाहीं; त्याच्याबरोबरच मी जातें आहें,' असें स्वतःच्या तोंडानं सांगून सावित्री निघून गेली होती, त्याचं काय, बिहारी ? "

बिहारी म्हणाला, " त्या गोष्टीचा अर्थ माझ्या स्वतःच्याही अजून ध्यानांत येत नाहीं, बाबूजी ! पण माझी पुरी खात्री आहे, कीं तें सारं खोटं आहे. खोटं—अजिबात—भयंकर खोटं ! तें जर खोटं नसेल, तर माझा एकही पोरगा जिवंत रहाणार नाहीं ! आई निघून गेली, त्यावेळीं रडत रडत मी तिला म्हणालों, 'या निवळ खोट्या-अगदीं खोट्या कलंकाचा बोजा माथ्यावर कां घेऊन चालली आहेस तूं, आई ?' तरी दिखील कुणाला खरं सांगायला आईनं मला हुकूम दिला नाहीं. स्वतःही ती रडत रडत मला म्हणाली, 'बिहारी, माझ्या गळ्याची शपथ हं तुला ! बाबूजींना यापैकीं कांहीं दिखील तूं सांगूं नकोस. माझा तें तिटकारा करूं देत—जन्मभर माझं तोंडही त्यांनीं पाहिलं नाहीं, तरी फार उत्तम ! पण त्यांना असंच सांग, स्वतःच्या पायांवर कुऱ्हाड मारून घेऊनच मी इथून चालती झालें ! "

असें म्हणून त्या रात्रीं घडलेल्या घटनाच्या आठवणीच्या वेदनांनीं त्याच्या डोळ्यांतून झरझर आंसवें गळूं लागलीं, आणि तो डोळ्यांना पदर लावून रडूं लागला.

परंतु धन्याच्या डोळ्यांतूनही आपल्याप्रमाणेंच अश्रुप्रवाह जोरानें सुरू झाला आहे, हें त्या बुढ्या सेवकाच्या नजरेलाही आलें नाहीं !

बऱ्याच वेळानें सतीशनें हळूच आपले डोळे पुसले, आणि तो म्हणाला, " तुला कळलं नाहीं, बिहारी ! पण स्वतःच्या पायांवर कुऱ्हाड मारून सावित्री कां गेली, तें मला कळलं आहे. पण खोट्याचा कधींच जय होत नाहीं, बिहारी ! "

बाहेरून दरवाज्यावर कोणाची तरी थाप पडली.

" हें काय ? दार बंद करून झोंपलां वाटतं ? कडी काढा पाहूं एकदम—"

बिहारी धनीसाहेबांच्या तोंडाकडे पाहूं लागला.

परंतु धनीसाहेब कांहीं न बोलतां चटकन् बिछान्यावर लवंडले, आणि त्यांनीं डोळे मिटून घेतले.

बाहेरून पुनः जोराच्या थापा सुरू झाल्या.

" दरवाजा उघडा ना हो-हात माझे पुरे पोळून गेले कीं ! "

बिहारी उठला, आणि दरवाजा उघडून, बाजूनें हळूच बाहेर निसटला.

## १५

हातीं गरम दुधाचा वाडगा घेऊन सावित्री खोलींत आली, आणि घाईघाईनें तिनें तो जवळच्या तिवईवर ठेवून दिला.

सतीशनें आड-नजरेनें हळूच तिच्याकडे पाहिलें.

सावित्रीनें नुकतीच आंघोळ केली असून, तिचे लांबसडक ओले केंस तिच्या पाठीवरून रुळत खालपर्यंत झुलत होते. कांहीं छोट्या मोकळ्या केंसांच्या बटा तिच्या कपाळावर आणि मुखावर पडल्या होत्या. तिनें एक स्वच्छ, पांढरी शुभ्र रेशमी साडी परिधान केली होती.

तिच्याकडे पाहून सतीशच्या मनांत एकाएकीं कल्पना आली-आपण आज जणूं सावित्रीला पहिल्यानेंच पहात आहों ! परंतु खोलींतल्या दिव्याच्या म्लान प्रकाशांत, सतीशच्या पाणावलेल्या डोळ्यांच्या पापण्या सावित्रीला दिसल्याही नाहींत.

किंचित् पुढें सरून सतीशच्या पलंगाजवळ येऊन, सावित्री गालांतल्या-गालांत हंसली.

सतीशकडे नजर लावून ती हंसत म्हणाली, " दरवाज्यांना कड्याकुलपं घालून धनी-नोकरांचं कसलं एवढं कारस्थान चाललं होतं, ऐकूं तरी ! आलेली बेशरम बला फाटकाबाहेर कशी काढून लावतां येईल, याबद्दलच ना ? "

परंतु सतीशनें तिच्या हंसण्याला किंवा बोलण्याला मुळींच साद दिली नाहीं. आपण कांहीं बोललों, तर आपल्या कंठस्वरांत, अंतःकरणांतील दुर्बलता उमटून आपण पकडले जाऊं, अशा भीतीनें तो गप्पच राहिला.

सावित्री म्हणाली, " लहानपणीं मांजराच्या गळ्यांत घंटा बांधायची गोष्ट तुम्हीं वाचली आहे ना ? मला दिखील बघायचंच आहे, या वेळीं घंटा बांधायला कुणाचं पाऊल पुढं पडतं आहे ! तुमचं स्वतःचं, कीं त्या तुमच्या साधुबाबाचं ! "

तरीही सतीश कांहीं; बोलला नाहीं. पहिल्यासारखाच चूप झोंपून राहिला.

सावित्रीनें एक खुर्ची ओढून घेतली, आणि तिच्यावर ती बसली. कांहीं क्षण तीही गप्प होती–नंतर ती बोलूं लागली.

परंतु या वेळीं मघांचा तिचा थट्टाविनोदाचा हलका, तरल स्वर आतां खूब गंभीर झाला होता.

ती म्हणाली, “ थट्टा राहूं द्या. पण प्रकार आहे तरी काय, हें मला समजावून देतां का ? उपेनदादाशीं तंटा केलांत; शेवटीं अगदीं सरोजिनीशीं दिखील तंटा केलात, अन् निघून आलांत. पुढं कधीं तरी ते झगडे मिटतीलही–मला ठाऊक आहे. परंतु सध्यां चालला आहे हा प्रकार काय आहे ? दारूला स्पर्शही करणार नाहीं, अशी माझ्या गळयाची तुम्हीं शपथ घेतली होती. पण दारू गेली चुलींत–आणखीं वर गांजाचा खुराक जोरानं सुरूं केला आहे ! अन् तो दिखील साध्या सरळ रीतीनें का ? तर जितके म्हणून गांवांत निरोद्योगी उडाणटप्पू आहेत, त्यांचा कळप जमवून भगवीं लक्तरं चढवून, तंत्रमंत्रांचा ढोल बडवून, उघडा-उघड, छाती फुलवून, ही गांजा-दारूची पाणपोयी सुरू केली आहे–नव्हे ? ”

सावित्रीच्या तोंडून सरोजिनीचा उल्लेख होतांच सतीशच्या अंगाची आग-होळी झाली. बिहारीनें कोणतीही गोष्ट तिला सांगावयाची शिल्लक ठेवली नाहीं हें त्याच्या पूर्ण लक्षांत आलें.

‘ तुझ्यामुळंच माझा असा हा सत्यानाश झाला!—माझा शनि तूंच आहेस ! ’ हे शब्द त्याच्या अगदीं तोंडाशीं आले.

परंतु ते मोठ्या शिकस्तीच्या प्रयत्नांनीं मागें लोटून, तो धीर गंभीर स्वरानें संक्षेपानें म्हणाला, “ छाती फुलवून गांजा ओढण्यांत दोष कसला ? ”

“ दोष कसला, तें ठाऊक नाहीं तुम्हाला ? ”

“ नाहीं. ”

“ ठीक आहे. नाहीं तें ठाऊक तुम्हाला असं म्हटलं, तरी माझ्या गळ्याची तुम्हीं शपथ घेतली आहे, कीं असल्या वस्तूंना आपण कधीं स्पर्श करणार नाहीं म्हणून! ती तरी माहीत आहे कीं नाहीं ? ”

“ कधीं माझ्यावर जोर जबरदस्ती करून माझ्याकडून तूं शपथ घेवविलीस, म्हणून ती माझ्या नेहमीं नेहमीं आड यावी, अशी माझी कोण ग तूं ? ”

सावित्रीला हंसूं येत होतें; पण तें तिनें शिकस्तीनें दाबलें.

माथें हालवून ती म्हणाली, “ कुणी नव्हे ना मी ? अजिबात कुणी नव्हे ? ”

सतीशाही जोरानें मान हलवून म्हणाला, " नाहीं. "

" हें जर खरं तर दारूचा ग्लास पिकदाणींत ओतून टाकून लवंग, वेलची चावीत चावीत तुम्ही बाहेर आलांत ते कां ? "

" तें केवळ तूं बकाबकी सुरू करशील, या भीतीनं. "

सावित्री हें ऐकून खूब मोठ्यानें हंसली,

" तरी सावित्री कुणी नव्हेच अं ? "

तो कांहींच बोलला नाहीं.

क्षणभरानें सावित्री म्हणाली, " बरं, नाहीं तर नाहीं ! पण आतां थोडं हें आणलं आहे तें दूध घ्या अन् झोंपा. "

असें म्हणून पुढें होऊन तिनें दुधाची वाटी हातीं घेतली, आणि ती सतीशाच्या समोर येऊन उभी राहिली.

सतीशनें आतां कसलीच हरकत घेतली नाहीं. तो चटकन् उठून बसला, आणि वाटींतलें सगळें दूध फस्त करून तो पुनः बिछान्यावर आडवा झाला.

वाटी घेऊन सावित्री कांहीं न बोलतां निघून जाऊं लागली.

सतीशनें तिला हांक मारली, " सावित्री—"

सावित्री थांबून मागें वळून पाहूं लागली.

" तुझं आन्हिक बिन्हिक आटोपलं ? "

खालीं पहात सावित्री उत्तरली, " हो. "

" काय खाल्लंस तूं ? "

सावित्री क्षणभर थांबली, आणि म्हणाली, " अजून कांहीं खाल्लं नाहीं–पण आतां जाऊन, कांहीं झालं तरी खाणार आहें मी—"

" झोंपणार कुठं तूं ? "

" पाहूं या. फाटकाच्या बाहेर कुठं थोडीशी जागाबिगा मिळते कीं काय तें पहातें, नाहींच मिळाली, तर झाडाखालीं कुठं तरी–"

असें म्हणून ती मोठ्यानें हंसली.

क्षणभरानें ती म्हणाली, " बरं–तोंडांतून एवढे शब्द तरी बाहेर काढायला तुम्हांला कष्ट होत नाहींत का ? खरोखर धन्य आहे तुमची ! "

असें म्हणून अत्यंत स्नेहशीलतेनें सतीशाच्या कपाळावरचे केंस हातानें हळूच वर करून तिनें मागें सारले, आणि कपाळावर तळवा ठेवून तिनें ताप बघितला.

ती एकदम चमकलीच. ताप खूब होता !

बिहारी खोलींत येऊन म्हणाला, " आई, तुझं अंथरूण—"

जवळच्या खोलीकडे बोट करून सावित्री म्हणाली, " त्या खोलींत मी झोंपणार आहें, बिहारी ! बाबूजींच्या अंगांत आतां बराच ताप आहे-तेव्हां शेजारच्या खोलींतच मला झोंपलं पाहिजे. "

बिहारी म्हणाला, " बरं, आई-"

नंतर सतीशकडे वळून सावित्री म्हणाली, " आतां जागूं नका अधिक तुम्ही. झोंपायचा प्रयत्न करा. रात्र बरीच झाली. "

असें म्हणून दरवाजा बंद करून ती हळुहळू निघून गेली.

थोड्याच वेळानें, थोडासा फराळ करून ती परत आली, आणि सतीशच्या शेजारच्या खोलींत सतरंजी पसरून तिच्यावर ती लवंडली.

ती आज फारच दमली होती. जवळ जवळ सतरंजीवर पडतांक्षणींच तिचे डोळे मिटत आले, आणि तिला ताबडतोब गाढ झोंप लागली.

बऱ्याच पहांटे सावित्रीची झोंपमोड होऊन ती धडपडून उठली, आणि लगबगीनें सतीशच्या खोलींत आली.

तिनें पाहिलें, बिछान्यावर सतीशची यातनांमुळें सारखी तळमळ तळमळ चालली आहे ! त्याच्या कपाळावर हात ठेवून तिनें पाहिलें, तों हात जणूं आगीच्या चटक्यानें चांगला पोळलाच !

सावित्रीच्या हाताच्या थंडगार स्पर्शामुळें सतीशनें डोळे उघडले. जास्वंदीच्या फुलाप्रमाणें ते लालबुंद झाले होते.

तापाची ती खूब चढती कमान पाहून, अतिशय घाबरून कमर खचून सावित्री बिछान्यावरच धवकन् बसली. सतीशला कांहीं विचारण्याचेंही सामर्थ्य तिला राहिलें नाहीं !

सतीशनें तिचा हात ओढून घेऊन आपल्या तापलेल्या कपाळावर ठेवला.

दोघेही कांहीं वेळ स्तब्ध होतीं.

नंतर कपाळावरचा तिचा हात दाबून सतीश कांहींसा कण्हत म्हणाला, " कालच मला बरोबर कळून चुकलं, सावित्री ! कालच मीं बिहारीला म्हटलं, ' हा ताप माझा अगदीं शेवटचाच ! आतां यांतून मी वांचत नाहीं ! ' "

तापाच्या तीव्र यातनांनीं बेहोष होऊन सतीश हें इतक्या कष्टांनीं आणि धापा टाकीत टाकीत बोलला, कीं सावित्री त्यामुळें अतिशय भिऊन गेली. तिला सारखें रडूं कोसळत असल्यामुळें, तिचा गळा अगदीं दाटून येऊन ऊरही

भरून आलें होतें. अशा स्थितींत सतीशाचें सांत्वन तरी कसें करावें, हें तिला कळेना.

सारी रात्र आपण अगदीं निश्चिंतपणें कशा गाढ झोंपीं गेलों होतों, या पश्चात्तापाच्या टोंचणीमुळें, आपल्या माथ्याच्या अगदीं चिंध्या करून टाकाव्या असें तिला वाटूं लागलें.

सतीश म्हणाला, " आज तूं माझ्याजवळ आहेस, यामुळं मला केवढा धीर वाटतो आहे म्हणून सांगूं ! "

असें म्हणून तो बाजूला वळला.

आज सावित्रीचा सतीशला सर्वांपेक्षां मोठा आधार वाटत होता. आणि रात्रींच अतिशय अभिमानानें आणि तुच्छतेनें तो तिला म्हणाला होता, " तूं माझी कोण ? "

बिहारीला हांक मारून डॉक्टरला बोलावून आणावयाला त्याला सांगावें, हेंही सावित्रीला अशक्य झालें. सतीशाच्या किंचित् उंचावलेल्या बाहूवर हात ठेवून ती दगडाच्या मूर्तीप्रमाणें निश्चल बसून राहिली.

आणखीं चार दोन क्षणांनीं सतीश पुनः या बाजूला वळला: आणि त्यानें पुनः सावित्रीचा हात ओढून घेऊन आपल्या छातीवर तो घट्ट दाबून धरला.

नंतर तो म्लान स्वरानें म्हणाला, " मी दिखील थोडीशी डॉक्टरी शिकलों आहें. मला हें खात्रीनं माहीत आहें, कीं अखेरपर्यंत माझं भान कदाचित् टिकणार नाहीं; परंतु आतांपर्यंत तरी मी चांगला शुद्धीवर आहें—हुषारही आहें. पण मी जर शुद्धीवर मुळीं आलोंच नाहीं, तर उपेनदादाला तूं सांग—माझं मृइल या कपाटांत मीं ठेवलं आहे. उपेनदादा माझं तोंड पहाणार नाहीं, हें मला ठाऊक आहे. परंतु तसंच हेंही मला माहीत आहे, कीं माझ्या मृत्यूनंतर माझ्या शेवटच्या इच्छेचा तो अपमानही करणार नाहीं. सावित्री, सगळ्या जगांत एक तुझ्याशिवाय त्याच्याइतका मला अधिक जवळचा असा एकही माणुस नाहीं, असं मला वाटतं."

सतीशाच्या तोंडून ' मृइल 'चा उल्लेख ऐकून सावित्रीचें जणूं सर्व भानच नाहींसें झालें ! इतका वेळपर्यंत ज्या पराकाष्ठेच्या संयमानें तिनें आपल्या हृदयाला आवरून धरलें होतें, तो बांध एका क्षणार्धाच्या प्रबल आवेगामुळें पार भंगून गेला !

सतीशाच्या छातीवर पडून एकाद्या लहान बालकाप्रमाणें ती हामसाहामशी रडूं लागली.

सगळ्या रात्रींत बिहारीच्या डोळ्याला डोळा कसा तो लागला नाहीं. परंतु

अखेर पहांटे त्याला झोंप लागलीच.

तो एकदम चमकून उठून बसला, आणि एकाद्या हतबुद्ध माणसाप्रमाणें धन्याकडे पहातच राहिला.

त्या वेळीं सतीश दोन्ही हातांनीं सावित्रीचें मुखमंडल जोरानें वर करून, कांहीं वेळ त्याकडे एकदृष्टीनें पहात राहिला होता. नंतर तो मिटलेला अश्रूंचा झरा आगीनें तापलेल्या आपल्या शुष्क ओष्ठद्वयाशीं आणून तो निःशब्दपणें किती वेळ तरी तसाच पडला होता.

सतीशचें मुखमंडल, त्याची हनुवटी, त्याचा गळा सावित्रीच्या नेत्रद्वयांतून झरणाऱ्या अश्रुप्रवाहांत जणूं तरंगूं लागलीं ! तो प्रवाह जणूं काय तिच्या प्राणाधिक दयिताच्या रोगजन्य प्रबल दाहालाही भिजवून थंड करूं लागला !

हें सर्वसाक्षी अन्तर्यामी प्रभूला दिसल्यावांचून राहिलें नाहीं हें खरें; परंतु सगळ्या जगांत वृद्ध बिहारीच्या विस्मयानें मुग्ध झालेल्या विव्हल नेत्रांशिवाय याला दुसरा कोणी साक्षी नव्हता, हेंही तितकेंच खरें होतें !

बाहेर शरत्कालची स्निग्ध प्रभात दिवसाच्या प्रकाशांत हळुहळू विकसित होऊं लागली. तेव्हां सावित्री स्वतःला आवरून घेऊन उठून बसली, आणि पदरानें आपले डोळे आणि प्रियकराच्या मुखमंडलावरील सर्व अश्रुचिन्हेंही अगदीं काळजीनें पुसून तिनें तें स्वच्छ केलें.

नंतर उठून तिनें सगळीं दारें आणि खिडक्या उघडल्या. तत्क्षणीं सूर्यकिरणांनीं आंत प्रवेश करून सगळी खोली उजळून टाकली.

बिहारीच्या डोळ्यांतून त्या वेळीं मोठालीं आंसवें ठिपकत होतीं; तरी त्यानें आपल्या धन्याकडे सारखी नजर लाविली होती.

तोंडांतून बाहेर पडणाऱ्या शब्दांना आवरून, सावित्री शांत, नैसर्गिक स्वरानें म्हणाली, “ त्यांत भय कसलं आलं आहे, बिहारी ? मी जवळ असतांना यांना तिळमात्र कसली भीति नाहीं. बाबूजी लवकरच बरे झाल्याशिवाय रहाणार नाहींत. मी त्यांचे कपडे-बिपडे बदलून, त्यांचा बिछानाही झाडून झटकून तयार करतें. तोंवर तूं जाऊन डाक्टरसाहेबांना चटकन् घेऊन ये. ”

असें म्हणून ती पुनः सतीशच्या बिछान्याकडे आली.

डिस्पेन्सरींतील डॉक्टरसाहेबांनीं येऊन सतीशची अगदीं बारकाईनें तपासणी केली.

सावित्री आणि बिहारी हीं दोघें पराकाष्ठेच्या आतुरतेनें त्यांच्याकडे पहात होतीं.

डॉक्टर शेवटीं चेहरा वांकडा करून म्हणाले, " हंः ! अस्सं एकंदरींत ! हें तर न्युमोनियाचं लक्षण दिसतं आहे. पण भ्यायचं कांहीं कारण नाहीं. रोग कांहीं अजून फारसा बळावला नाहीं. "

आश्वासन देऊन गोड शब्दांनीं सांत्वन करून, डॉक्टरसाहेब आपल्या हातानें औषध तयार करून देण्याकरतां खालीं निघून गेले.

ते गेल्यावर सतीश मोठ्या कष्टानें किंचित् हंसला, आणि सावित्रीच्या चेहऱ्याकडे नजर लावून म्हणाला, " मला तिळभर दिखील भय वाटत नाहीं. "

असें म्हणून उशीखालीं हात घालून त्यानें एक किल्ल्यांचा घोंस बाहेर काढला.

तो घोंस सावित्रीपुढें करून सतीश म्हणाला, " या किल्ल्या तुझ्या ओळखीच्या आहेत, सावित्री ? स्वतः आपण होऊन एक दिवस जो हा घोंस तूं आपल्या पदराला बांधला होतास, तोच आज मी तुझ्या पदराला बांधतों आहें."

असें म्हणून सावित्रीचा आंसवांनीं ओला झालेला पदर ओढून घेऊन सतीशनें हळुहळू त्याला किल्ल्यांची रिंग बांधून टाकली.

नंतर शांततेचा एक निःश्वास टाकून तो कुशीला वळला.

सावित्रीवरच्या बिहारीच्या विश्वासाला सीमाच नव्हती. तिच्याकडून धीर मिळाल्यामुळें त्याची वृत्ति पहिल्यानें प्रफुल्ल आणि आनंदित झाली असली, तरी तो कांहीं अजाण बालक नव्हता. कांहीं दिवसांनीं त्याच सावित्रीच्या चेहऱ्याचा उलटलेला नूर पाहून मनांतल्या मनांत त्याला अतिशय भय वाटल्यावांचून राहिलें नाहीं. बिहारीचें लक्ष नेहमींच सावित्रीच्या चेहऱ्याकडे असे. त्या निःसीम कर्मतत्पर, सेवापटु तरुणीच्या शांत मुखावर एका प्रकारची पांडुर छाया हळुहळू घनदाट होत चालली आहे, हें बिहारीच्या लक्षांत आलें होतें.

आठ दहा दिवस झाले होते.

एके दिवशीं संध्याकाळीं सावित्रीची एकीकडे गांठ पडल्यावर बिहारी सद्गदित कंठानें तिला म्हणाला, " आई, या बुड्ढ्याला फसवून काय मिळणार आहे तुला ? तुझ्या नाजुक काळजाला जें सहन होतं, तें या म्हाताऱ्या हाडांना काय सहन करतां येणार नाहीं, आई ? त्यापेक्षां मला सगळं कांहीं खुलासेवार सांग, म्हणजे कांहीं उपाय करतां येतो कीं काय हें तरी आपणाला पहातां येईल. "

सावित्री चार दोन क्षण कांहीं न बोलतां मुकाट्यानें उभी होती.

नंतर ती म्हणाली, " तुझ्या जवळ अजून मी बोललें नाहीं, बिहारी, पण तुझ्या नांवानं उपेनबाबूंना मीं पत्र लिहून पाठवलं आहे. दोन दिवस मी वाट पाहतें. जर ते आले नाहींत, तर तुला स्वतःला त्यांच्याकडे जायला हवं, बिहारी ! "

बिहारी कांहींसा क्षुब्ध होऊन म्हणाला, " मला न विचारतां हें तूं कशाला बरं केलंस, आई ? "

सावित्री त्याच्याकडे पहातच राहिली.

" कां बरं, बिहारी ? उपेनबाबू येणार नाहींत, असं का तुला वाटतं ? "

बिहारी क्षणभर थांबला, आणि मान हलवीत आस्ते आस्ते म्हणाला, " बाबूजी कदाचित् येतीलही; परंतु मला कां नाहीं बरं अगोदर कळवलंस, आई ? "

" कां रे, बिहारी ? "

बिहारी संकोचानें चूप बसला.

" बिहारी–"

हकीगत सांगणें अतिशय अवश्य असलें तरी तें अत्यंत अपमानकारक वाक्य त्याच्या तोंडांतून एकदम बाहेर पडणेंही कठीण होतें !

सावित्री म्हणाली, "-या प्रसंगीं उपेनबाबू इथं येणं फार जरूर आहे, बिहारी ! "

बिहारी मोठ्या कष्टांनीं संकोच दूर करून म्हणाला, " तें मला ठाऊक आहे, आई ! परंतु तूं जवळ नसलीस, अन् जगांतले सगळे लोक बाबूजींचा बिछाना घेरून राहिले, तरी त्यांना वांचवितां येणं शक्य नाहीं, हा विचार तूं कां मनांत आणीत नाहींस, आई ? "

सावित्री म्हणाली, " तो विचार मीं केला आहे, बिहारी ! घरांत कोणत्याही जागीं लपून छपून मी काम करूं शकेन. पण उपेनबाबू आल्यावांचून कांहीं भागणार नाहीं. शिवाय, बोलूनचालून मी आहें बायकोमाणुस ! असल्या मोठ्या संकटांत काय वाईट, काय चांगलं, हें मला कितीसं माहीत असणार ? नाहीं, बिहारी ! उपेनबाबूंना येऊं देच ! "

बिहारी मान हलवून म्हणाला, " उपेनबाबूंच्याबद्दल मला माहिती नाहीं. पण बाबूजींची मला पुरी माहिती आहे. मी मूर्ख, गांवढळ खरा; पण आज साठ वर्षं तर जग मी पहात आलोंच आहें ना ! कितीसे पुरुष तुझ्यापेक्षां

चांगलं-वाईट अधिक जाणतात, मला सांग, आई! तें कांहीं असलं, तरी तूं बाबूजींच्या जवळून दूर गेलीस, तर या दुखण्यांतून ते बचणं शक्य नाहीं, हें तुझ्या पायांची शपथ घेऊन मी सांगायला तयार आहें. असं कांहीं तूं करूं नको, आई! आमच्या बाबूजींना सोडून तूं आतां कुठंही पळून जाऊं नकोस–जाऊं नकोस!"

हें सर्व बिहारीपेक्षां सावित्रीला कमी माहीत होतें असें नाहीं. परंतु ती गप्प बसली होती.

सावित्री जवळ नसली, तर आपल्या मनाची व्याकुलता किती वाढेल, त्याची सतीशला पूर्ण कल्पना होती. परंतु अशा भयंकर रोगशय्येवर सतीशला डोळ्यांआड करून सावित्री स्वतः तरी कशी जिवंत राहिली असती? आपणां दोघांबद्दल उपेन्द्राला किती भयंकर तिरस्कार वाटतो, हें तिला चांगलें ठाऊक होतें. तो आल्यावर सावित्रीला त्याच्या दृष्टीआड रहाणें अगदीं अवश्य होतें, यांत कसलाही संदेह नव्हता.

मनांतल्या मनांत सावित्रीनें या सर्व परिस्थितीचें उत्तम समालोचन करून पाहिलें होतें. परंतु ज्याच्यासाठीं इतके दिवस आपण एवढें दुःख सहन केलें होतें, त्याच्यासाठीं हें दुःखही शांतपणें आपण सहन करूं, असा मनाशीं विचार करूनच, सतीशच्या आजाराची इत्थंभूत हकीगत स्पष्ट कळवून उपेन्द्राला यावयाला तिनें आग्रहपूर्वक लिहिलें होतें.

सावित्री दृढ स्वरानें म्हणाली, "नाहीं, बिहारी! तसं मी होऊं देणार नाहीं. उपेनबाबू जर परवांपर्यंत इथं आले नाहींत, तर तुला स्वतः तिकडे जाऊन त्यांना घेऊन आलंच पाहिजे–त्याशिवाय गत्यंतर नाहीं."

बिहारीचा चेहरा अधिकच म्लान झाला.

तो रडवेल्या स्वरानें म्हणाला, "असं तूं कां म्हणतेस, आई? मी नोकर; मला जो हुकूम तूं करशील, तो मला पाळलाच पाहिजे. पण मी दिखील माणूसच आहें ना! एखाद्या चोराप्रमाणं या घरांत लपूनछपून तूं वावरणं मला जर एखाद्या दिवशीं सहन झालं नाहीं, आई, तर मला तूं नांवं मात्र ठेवतां कामा नयेत, हें मी तुला अगोदरपासून स्पष्ट सांगून ठेवतों."

असें म्हणून तो व्यथित हृदयानें तेथून निघून गेला.

परंतु सावित्रीचें तें पत्र उपेन्द्राच्या हातीं पडलें नाहीं.

त्या वडीलचे शिवप्रसादबाबू आणि बहीण महेश्वरी यांनीं सतत विलक्षण

आग्रह चालविल्यामुळें महिना-सव्वामहिन्यापूर्वी, स्वतःच्या अगदीं इच्छेविरुद्ध हवा बदलण्यासाठीं म्हणून त्याला पुरीला येऊन रहाणें भाग पडलें होतें.

पुरीला त्याची ओळखदेख कांहींच नव्हती. त्यामुळें पहिल्या रात्रीं त्याला तेथील एका लहानशा हॉटेलच्या आश्रयाला येऊन रहावें लागलें होतें. त्याचा बेत असा होता, कीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं एखादी चांगलीशी जागा शोधून काढून तेथें आपला तळ ठोकावा.

परंतु हॉटेलचे मालक होते बंगालीच. त्यांचें नांव भुवन मुकर्जी. मुकर्जी महाशयांनीं उपेन्द्राची अशी कांहीं उत्कृष्ट बडदास्त ठेवली, कीं तिला यत्किंचित्‌ही नांव ठेवावयाला जागा नव्हती. स्वतंत्र खोलींत त्यांनीं उपेन्द्राची सुंदर व्यवस्था केली. उत्तम बिछाना घालून दिला. खाण्यापिण्याची सुंदर तजवीज केली. इतकेंच नव्हे, तर मर्जीला येईल तितके दिवस बाबूजी राहिले, तरी तशा सुंदर व्यवस्थेंत आणि सेवेंत यत्किंचित् कसूर होणार नाहीं, असें भुवनबाबूंनीं उपेन्द्राला आश्वासन दिलें.

सकाळीं एक प्रौढ वयाची बाई उपेन्द्राची खोली झाडावयाला आली. काम करावयाला सुरवात करतांच ती वारंवार त्याच्याकडे पाहूं लागली.

शेवटीं, कांहीं वेळानें तिनें हातांतला झाडू बाजूला फेंकला, आणि उपेन्द्रापुढें खालीं वांकून त्याला प्रणाम करून ती म्हणाली, "बाबूजींना कांहीं दुखणं आलं होतं ? अगदीं खंगलेले अन् आजाऱ्याप्रमाणं दिसतां आहां ! तो पूर्वीचा चेहरा नाहीं—तो रंग नाहीं—"

उपेन्द्र आश्चर्यानें थक्कच झाला !

"तूं मला ओळखतेस वाटतं ?"

ती बाई झटकन् म्हणाली, "मी ती मोक्षदा, बाबू ! आपणाला काय ओळखणार नाहीं मी ?"

सतीश वगैरे मंडळींच्या घरीं फार दिवसांपूर्वी जी नोकरी करीत असे, तीच हीं मोक्षदा मोलकरीण, हें उपेन्द्राला आठवलें.

त्यानें विचारलें, "तूं इथं नोकरीला असतेस वाटतं ?"

मोक्षदा लाजल्यासारखें करून म्हणाली, "नाहीं-होय-पण नोकरीच म्हणायची-दुसरं काय ? मुकर्जीमहाशय म्हणाले, उगीच कलकत्त्याला पडून रहाण्यांत काय अर्थ आहे ? त्यापेक्षां चल, आपण एखाद्या क्षेत्राच्या ठिकाणीं जाऊन राहूं. कांहीं तरी एखादं हाटेलबिटेल काढून—"

उपेन्द्र मध्येंच म्हणाला, "चालतंकां पण हॉटेल बरं ?"

त्याच्या प्रश्नांतली आणि चेहऱ्यावरली विरक्ति मोक्षदेच्या नजरेंतून निसटली नाहीं.

क्षणभर थांबून ती म्हणाली, "चाललं आहे हें असं कसंबसं ! पण बाबू, मला या वयांत नोकरी करायला हवी होती कशाला, अन् मुकर्जीमहाशयांच्या आसऱ्याला येऊन रहावं लागतं तरी कशाला ? तसं पहायला गेलं, तर एका तऱ्हेनं पोरीला मींच लहानाची मोठी करून वाढवली. मला 'मावशी' म्हणत असे ती अन् खरोखरच्या मावशीप्रमाणंच तिला छातीवर बाळगून राहिलें होतें मी, हें कुणाला माहीत नाहीं ? सावित्री म्हणाली, 'हें सगळं करायची जरुरी नाहीं. मी नोकरी करून मावशीचं अन् भाचीचंही पोट भरीन—' म्हटलं, ठीक ! बाबूलोकांच्या मेसमध्यें पोरीला दिली लावून मीं नोकरी. बाबूमंडळी तिला मोलकरीण म्हणून समजत नसत. घरची यजमानीण म्हणून मानीत. ती जर गेली नसती, तर मला दिखील हें सर्व करावं लागलं नसतं. पण तुम्ही कांहीं म्हणा बाबू, मी खरं खरं सांगतें. आमच्या छोट्या बाबूंमुळंच आज मला हें दुःख भोगावं लागत आहे."

उपेन्द्रानें उत्सुकतेनें प्रश्न केला, "छोटे बाबू कोण ? आमचा सतीश ?"

मोक्षदा मान हलवून म्हणाली, "हो—तेच. कारटीनं कोणत्या नजरेनं छोट्या बाबूंकडे पाहिलं कुणाला ठाऊक ! पण त्यांच्यासाठीं आपल्या सर्वस्वावर खुशाल पाणी सोडलं तिनं ! अन् म्हणून काय छोट्या बाबूनां तरी तिनं आपणाला धरूं शिवूं दिलं म्हणतां ? तें दिखील नाहीं. बिपिनबाबू मोठा लाखोपति जमिनदार दिवस नाहीं रात्र नाहीं—माझ्या बिऱ्हाडीं बिचाऱ्याच्या सारख्या खेपा व्हायच्या—रडारुंदायचा ! तळवे त्याचे झिजून गेले असतील पोरीसाठीं धांवाधांव करतां ! सोन्यारुप्याच्या जडावाच्या दागिन्यांसाठीं दहा हजार रुपये पोरीला मोजायला तयार होता बिचारा तो ! पण कारटीनं त्याचं तोंड दिखील नाहीं बघितलंन् ! पोरीचा अभिमान अन् दिमाख केवढा पहा ! दहा दहा हजार रुपयांची माया फुटक्या खापराच्या तुकड्याप्रमाणं लाथेनं दूर उडवून अन् स्वतःचं बिऱ्हाड, आंतले सारे जिन्नसपान्नस तसेच खुशाल मागं टाकून, एका नेसत्या वस्त्रानिशीं ती जी बाहेर पडली, ती चेतलाच्या एका कुठल्याशा ब्राह्मणाच्या घरीं मोलकरीण म्हणून राहिली. तिथं बिचारीला सहा महिने कामाचे इतके लबेदे उसपावे लागले, कीं सगळं शरीर झिजून तिच्या हाडांचा पिंजरा मात्र शिल्लक राहिला ! शेवटीं तिथून

ही पोरगी कुठं निघून गेली, तें एका आई दुर्गेला माहीत! अभागी बिचारी! जिवंत आहे का मेली, कोण जाणे!"

बोलतां बोलतां पूर्वीच्या आठवणींच्या आवेगामुळें तिलाही अगदीं भडभडून आलें, आणि तिनें डोळ्यांना पदर लावला.

उपेन्द्रही कांहीं न बोलतां तिच्याकडे पहात राहिला.

मोक्षदानें हळुहळू डोळे पुसले, आणि कामाला लागावें म्हणून तिनें पुनः झाडणी हातीं घेतली.

तितक्यांत तिनें उपेन्द्राला रडव्या स्वरानें विचारलें, "पण काय हो बाबूजी, आमचे छोटे बाबू हल्लीं आहेत कुठं? कुठं जर भेटले असते, तर विचारलं असतं, कीं पोरीचा शोधबोध कुठं लागला आहे का त्यांना?"

उपेन्द्र मृदु स्वरानें म्हणाला, "सतीश आतां नक्की कुठं आहे, हें मला दिखील माहीत नाहीं. तो आपल्या मुलखांतल्या घरीं आहे, असं माझ्या कानीं आलं आहे. बरं, काय ग मोक्षदा, ही सावित्री पोरगी आहे तरी कोण?"

या प्रश्नानें मोक्षदा एकदम क्षुब्ध झाली.

उत्तेजित स्वरानें उद्गारली, "कोण? कुलीन ब्राह्मणाची मुलगी, बाबू, अस्सल कुलीनाची मुलगी बरं! सारी नऊ वर्षांची होती, तेव्हां कपाळ फुटून पोरगी विधवा झाली. घरींच होती बिचारी. 'लगीन करतों, राजाची राणी करतों तुला,' अशा गोड गोड थापा देऊन या जळक्या तोंडाच्या भद्रकपाळी दुष्ट नष्ट चांडाळानं तिला फुसलावून घराबाहेर काढून आणलं, अन् शेवटीं महाराचांडाळांच्या हालांत तिला टाकून पळून गेला मेला! मी अशी आहें, म्हणून त्याचं तोंड तरी पहातें. नाहीं तर ब्राह्मण का हा?–चांडाळ-मांग मेला! चांभाराच्या हातचं पाणी प्यावं, पण याचं तोंड दिखील बघूं नये!"

उपेन्द्राला ती काय बोलते आहे हेंच कळेना!

त्यानें विचारलें, "तूं कुणाविषयीं हें बोलते आहेस, मोक्षदा?"

मोक्षदा तिरस्कारानें, उद्धत स्वरानें म्हणाली, "हा मेला नष्ट चांडाळ भुवन मुकर्जी! नाहीं तर असा दुष्ट हरामखोर चांडाळ त्रिभुवनांत दुसरा कोण असेल? अरे, तूं मोठा मेहुणा पोरीचा! अन् तुझं हें असलं नीच काम! म्हारडा मेला!"

उपेन्द्र आश्चर्यानें स्तंभित होऊन गेला!

क्षणभर थांबून त्यानें विचारलें, "भुवन मुकर्जी म्हणजे, ज्याचें हें हॉटेल, तो?"

मोक्षदा जोरानें मान हलवून म्हणाली, " होय बाबू, होय ! तोच जगावरुन ओंवाळून टाकलेला अभागी दुष्ट राक्षस ! "

तो 'दुष्ट राक्षस' तेथें हजर नव्हता; तरी तो आपल्यासमोर उभा आहे, अशी कल्पना करून मोक्षदा त्यावरच भयंकर कडाडूं लागली, " पण पोरीचं काय करतां आलं रे तुला, हरामखोरा ? अथांग समुद्रांत तूं बिचारीला लोटून दिलीस—पण त्याशिवाय एक क्षण तरी तिच्या अंगाला नुसतं शिवतां तरी आलं काय तुला ? घरांतून फूस लावून बाहेर काढून आणलीस तूं पोरीला; पण आज नाही उद्यां, असं करून, महिनाभर काढून, ज्या दिवशीं लगीन होणार नाहीं म्हणून तूं तिला सांगितलंस, त्याच दिवशीं तुझ्या त्या दळभद्र्या तोंडावर पायपोसासकट लाथ मारून तुला हांकलून दिलं ना बहादुर पोरीनं ? कच्ची पोर, लहान वय, बुद्धीनंही अननुभवी; पण पुढं मग तिच्या घराच्या त्रिसीमेंत पाऊल टाकायची छाती झाली काय तुला, मेल्या ? अरे, ती काय भोळी खुळी मोक्षदा नव्हे, तर प्रेमाच्या लाडं लाडं दोन गोष्टी बोलून भुलवतां येईल तिला ! सावित्री—नांवाची ती सावित्री आहे ! दहा हजारांच्या जडावाच्या दागिन्यांवर सहज लाथ मारून जी निघून जाते—ती—ती आहे ती ! "

पराकाष्ठेचा विस्मय, शंका वगैरे भावनांनीं स्तिमित होऊन उपेन्द्र गोंधळून जागच्या जागीं स्तब्ध बसून राहिला.

" मोक्षदा, तुझ्या मुकर्जीमहाशयांना एकवार पाठवून देतेस माझ्याकडे ? त्यांना थोडं कांहीं विचारायचं आहे मला. "

मोक्षदा म्हणाली, " चांभारडा गेला आहे बाजारांत. "

नंतर तिला काय वाटलं कोण जाणे ! चार दोन क्षण थांबून ती पुनः बोलूं लागली, " मध्यें एक दिवस चक्रवर्ती ठाकूर भेटला होता मला. ठाकूर बोले अन् रडायला लागे सावित्रीच्या आठवणी काढून. माझ्या बाळीवर सगळीं—सगळींजणं अगदीं प्रेम करीत हो ! आः ! पोरीचं जसं रूप, तसेच गुण ! तशीच दया माया मनांत भरलेली होती पोरीच्या ! "

उपेन्द्रानें जिज्ञासेनें प्रश्न केला, " चक्रवर्ती ठाकूर कोण ? "

मोक्षदा म्हणाली, " बाबूमंडळीच्या मेसमध्यें सैंपाक करीत असे तो. सगळ्या गोष्टी त्याला चांगल्या माहीत असायच्या. बिहारीच्या तोंडून ऐकून त्यानं सगळं कांहीं मला सांगितलंन्. चेतलाच्या त्या ब्राह्मणाच्या घरीं पोरगी होती ना कामाला ? तिथं ती आजारी पडली, अन् तिनं रजा मागितली;

तर काय ? ब्राह्मण तेवढे सारेच का हो निष्ठुर चांडाळ ? त्या मेल्यानं खुशाल सांगितलं, तुझ्या औषधपाण्याचे झाले आहेत सात रुपये ते दे अन् जा कुठं हवी तिकडे. तें देणं देऊन टाकायसाठीं म्हणून एवढा सारा रस्ता पायांनीं तुडवीत पोरगी सतीशबाबूंच्या बिऱ्हाडीं आली. आमच्या छोट्या बाबूंचा या बाबतींत मनाचा कल मोठा उदार ! पैसा अडका मागितला तर, कांहीं अडचण असली तरी, कधीं ते नाहीं म्हणायचे नाहींत. पण पोरीचं कपाळच इतकं खराब मेलं, कीं त्याच रात्रीं बाबूजींचे कोणसे एक जळले मेले स्नेही बायकोला घेऊन तिथं येऊन हजर ! सगळ्या दिवसाची भयंकर दमलेली पोर ! आंघोळ बिंघोळ करून ती खोलींत येऊन बसते न बसते, तों ती मंडळी आलीच ! अरे, स्नेही माणूस तूं—आलास तर रहा रात्रभर ! तर तसं नाहीं—रागावून डोकींत राख घालून बायकोचा हात धरून फरफर करीत बाहेर निघून गेली दिखील स्वारी ! हा सारा प्रकार पाहून छोटे बाबू तर चाटच होऊन गेले ! पण सावित्री माझी मोठी अभिमानी पोर ! तिला काय हा भयंकर अपमान सहन होतो ? तोंडांत पाणी न घालतां ती जी कुठं तश्शी चालती झाली, तो तिचा थांगपत्ता अजून कुठं लागला नाहीं ! ”

उपेन्द्र स्तब्ध होऊन बसून राहिला.

त्या रात्रींचा त्याचा निष्ठुर इतिहास त्याच्या अन्तश्चक्षूंना अत्यंत उजळ प्रकाशांत स्वच्छ दिसूं लागला. त्याला एकसारखें वाटूं लागलें, मोक्षदानें सांगितलेल्या कहाणीपैकीं जरी अर्धी खरी असेल, तर जिच्या नांवाचा देखील आपण आजपर्यंत भयंकर तिटकारा करीत आलों, ती स्त्री किती विलक्षण चरित्राची असली पाहिजे !

मोक्षदा आपल्या कामाला निघून गेली.

परंतु उपेन्द्र तेथेंच दगडी पुतळ्याप्रमाणें निश्चल बसून राहिला.

सहा महिन्यांपूर्वी त्यानें ही कहाणी कानांनीं नुसती ऐकूनही घेतली नसती. जें वाईट, जें खोटें, जें लवमात्र कलंकाच्या नुसत्या वाफेनेंही कलुषित झालेलें, तें उपेन्द्राला नेहमीं विषाप्रमाणें त्याज्यच वाटत आलें होतें. ज्या सतीशचा तो यामुळें सहज त्याग करूं शकला होता, मोक्षदानें सांगितलेली कहाणी ऐकून त्याच्याचसाठीं त्याच्या डोळ्यांच्या पापण्या ओलसर आणि दृष्टि अस्पष्ट झाली होती. संगमरवरी दगडाप्रमाणें शुभ्र असलेलें त्याचें हृदय पत्थराप्रमाणेंच कठिनही होतें. तर मग, आज एका अज्ञात स्त्रीच्या कलंकित प्रणय-वेदनांच्या कहा-

णीनें त्याच निष्कलंक शुभ्रतेवर छाया कां टाकली, याबद्दल विचार केला असतां, असें आढळून आलें असतें, कीं त्याच पाषाणाच्या तळाशीं ही दुर्बलता इतके दिवस दबून राहिलेली होती ! त्याची निम्मे अधिक शक्ति हरण करून सुरबाला जेव्हां निघून गेली, तेव्हां संधि मिळतांच तीच दुर्बलता, एकाद्या जोराच्या कारंज्याप्रमाणें, त्याच्या पाषाण-हृदयाचा भेद करून बाहेर पडली ! सुरबाला आपणाला किती शक्तिहीन करून गेली, हें दिसून आल्यावर उपेन्द्राला भय वाटूं लागलें.

परंतु तिकडे त्याचें लक्ष्य नव्हतं. केवळ शून्य दृष्टीनें तो समोरच्या दिशेकडे पहात बसून राहिला होता. कोणत्याशा अज्ञात सावित्रीच्या प्रेमाचा इतिहास, त्याच्या सुरबालेच्या शेवटच्या क्षणींच्या त्या अवर्णनीय नेत्र युगुलाप्रमाणें, त्याच्या डोळ्यांना डोळा भिडवून स्थिर राहिला होता !

त्याची तंद्रा उडाली भुवन मुकर्जीच्या कंठस्वरानें !

त्यांना हांक मारीतच तो आंत आला. त्यानें विचारलें, " बाबूजी, मला बोलवलं होतं तुम्हीं ? "

उपेन्द्र म्हणाला, " बसा. तुम्ही सावित्रीला ओळखतां ? "

भुवननें खालीं मान घातली, आणि तो गप्प राहिला.

चार दोन क्षणांनीं तो म्हणाला, " हो—ओळखतों. "

" तिच्यासंबंधानं तुम्हाला जी माहिती आहे, ती तुम्ही मला सांगाल ? "

भुवन म्हणाला, " सांगतों—"

असें म्हणून त्या बेशरम माणसानें आपल्या घोर अपराधाचा इतिहास क्रमाक्रमानें उपेंद्राला सांगितला.

शेवटीं तो म्हणाला, " मी दिखील एक सभ्य गृहस्थाचा मुलगा आहें, बाबूजी ! परंतु अगोदरच जर तिची मला बरोबर ओळख पटली असती, तर या कुमार्गावर पाऊल टाकून, आज अशा या परमुलखांत हॉटेलमध्यें सैंपाकी भटाचं काम करीत मला दिवस काढावे लागले नसते ! सावित्रीच्या कुडींत प्राण असे तोंपर्यंत तिला कुणीही नष्ट करूं शकणार नाहीं, या विचाराचंच मला काय तें समाधान आहे. "

उपेन्द्रानें विचारलें, " त्यानं तुम्हाला समाधान असायचं कारण काय ? "

भुवन म्हणाला, " परकालीं मला जबाब देतां येईल, कीं सावित्री भ्रष्ट झाली नाहीं ! "

" बरं, तुम्ही जा आतां. "

भुवन निघून गेल्यावर उपेन्द्र निश्चल मूर्तीप्रमाणें बसून राहिला. ' चांगलं केलं नाहींस उपेन, तूं चांगलं केलं नाहींस, ' असें ओरडत त्याचें मन त्याला एकसारखें टोंचूं लागलें. तें आणखींही त्याला बजावीत होतें–' जी निःसहाय स्त्री एवढ्या प्रचंड प्रलोभनावर अगदीं सहज जय मिळवून निघून जाऊं शकते, तिचा अपमान करायचा तुला अधिकार नव्हता ! '

त्याच दिवशीं संध्याकाळीं भुवन मुकर्जीच्या हॉटेलमधून उपेन्द्र दुसरीकडे निघून गेला.

पुरीच्या वास्तव्यांत समुद्रतीरावरील हवापाणी उपेन्द्राला विशेष आरोग्यदायक ठरलीं नाहींत. दिवस जसजसा उतरूं लागे, तसतशी त्याच्या डोळ्यांची आणि चेहऱ्याची आग होऊन त्याला ताप येई, आणि अशा रीतीनें प्रत्येक दिवस, तिळातिळानें आपणाला आपल्या परलोकीं गेलेल्या, पतिविरहाकुल सुरबालेकडे पुढें पुढें नेत आहे, याचा उपेन्द्राला मनांतल्या मनांत चांगलाच प्रत्यय येत चालला.

अशा रीतीनें समुद्रतीरावरील त्या निर्जन वास्तव्यांत इहलोकाची त्याची मुदत प्रतिदिवशीं हळूहळू संपत येत चालली असतां, एके दिवशीं सकाळच्या डांकेनें, घरच्या पत्त्यावरून पुनः पत्ता बदलून पुरीला त्याच्या हातीं बिहारीचें पत्र येऊन पोंचलें.

ज्याची नुसती आठवण होतांच, काळजाला सुया बोंचत असत, त्या आपल्या चिरकालच्या परम मित्राचा अविचारानें अपमान करून आपण त्याग केला! हें दुःख उपेन्द्राच्या अंतःकरणाचा अष्टौप्रहर कसा दाह करीत असे, हें केवळ एक त्या अन्तर्यामी परमेश्वरालाच ठाऊक होतें ! परंतु आज तोच आपला प्राणप्रिय सुहृद् कठिण विकारानें अतिशय आजारी असून, औषधोपचार आणि शुश्रूषा यांच्या अभावीं त्याची स्थिति किती भयंकर झाली आहे, हें करुण वृत्त जेव्हां बिहारीच्या पत्रानें त्याला कळविलें, त्या वेळीं, किती तरी दिवसांनीं, उपेन्द्राच्या शुष्क अधरोष्ठांवर हास्यरेखा दिसूं लागली. त्या बिचाऱ्याला कल्पना देखील नसेल, कीं ज्याचे दिवस बहुतेक भरत येऊन तो अखेरच्या आयुर्मर्यादेवर येऊन ठेपला आहे, अशा एका माणसाच्या हातीं सेवाशुश्रूषेचा प्रचंड भार तो देऊं इच्छितो आहे !

तरी देखील, आपल्या सामानाची बांधाबांध करून उपेन्द्रानें त्याच दिवशीं पुरी सोडली.

## १६

ज्योतिष हायकोर्टांतून परत येऊन घरीं पाऊल टाकतो, तों समोरच्या व्हरांड्यांत दोन आराम-खुर्च्यांवर शशांक आणि सरोजिनी समोरासमोर बसून गप्पागोष्टी करीत आहेत, असें त्याला आढळून आलें.

तो जवळ येतांच शशांक उठून उभा राहिला.

उपेन्द्राकडे पहात हंसत हंसत त्यानें कबुलीजबाब दिला, " आज काम थोडं लवकरच आटोपलं; तेव्हां म्हटलं इथूनच चहा घेऊन दोघे बरोबरच क्लबांत जाऊं."

" ठीक–उत्तम."

असें म्हणून ओंठावर फुटणारें स्मित लपविण्याचा प्रयत्न करीत ज्योतिष आंत जाऊं लागला.

दादाबरोबर सरोजिनीही उठून आंत निघाली. तें पाहून चटकन् मागें वळून कृत्रिम भर्त्सनेच्या स्वरांत ज्योतिष म्हणाला, " पाहुण्यांना एकटंच सोडून—ही काय ग तुझी अक्कल, सांग पाहूं, सरोज ? "

तिचा चेहरा आरक्त झाला, आणि ती लगेच आपल्या खुर्चीवर येऊन बसली.

बहिणीची ही लज्जासंभ्रमाची कृति ज्योतिषच्या नजरेला आल्यावांचून राहिली नाहीं.

आईची सूचनारूप आज्ञा त्याला अशी होती, कीं कोर्टांतून आल्यावर, कपडे वगैरे बदलावयाचे, हातपाय तोंड स्वच्छ धुवावयचें आणि मग चहा-फराळ घ्यावयाचा.

आज आई दिसतांच ज्योतिष तिला म्हणाला, " शशांक आला आहे. तेव्हां चहा फराळाचं आज बाहेर पाठवून दे, आई ! "

आई म्हणाली, " बरं. सरी दिखील बाहेर आहे वाटतं ? "

ज्योतिषनें ' हो 'कारार्थी मान हलवली.

नंतर चार दोन क्षण गप्प राहून ज्योतिष म्हणाला, " बरं, आई, ज्याच्या अंगीं मुळींच दोष नाहींत, गुण तेवढेच आहेत, असा माणुस कुठं आहे, ठाऊक आहे तुला ? "

मुलाचा हा प्रश्न आईला आवडला नाहीं.

अप्रसन्न चित्तानें जगत्तारिणी म्हणाली, " तुम्ही कां रे जेव्हां तेव्हां असं मला बोलतां, ज्योतिष ? माझी आतां कसली हरकत नाहीं, असं मीं तर तुला किती वेळ तरी सांगितलं आहे. तुम्हाला बरं वाटेल त्याच्या हातीं सरोला दे ना तूं ! "

ज्योतिष म्हणाला, " दोषाशिवाय माणुस नाहीं, आई ! मीं निरनिराळ्या त-हेनं विचार करून पाहिला आहे. सरोजिनी या लग्नामुळं दुःखी व्हायची नाहीं, –सुखीच होईल. शिवाय, ती आतां मोठी झाली आहे. तिची अनुमति नसतां हें कार्य होण्यासारखं नाहीं. "

असें म्हणून तो मागें वळून पहातो, तों सरोजिनी येऊन आपल्या अंगाला जवळजवळ घांसटून उभी राहिली आहे, असें त्याच्या दृष्टीला पडलें.

जगत्तारिणी कोठीच्या खोलींतून मुलाशीं बोलत होती. मुलगी येऊन तेथें उभी राहिल्याचें तिला कळलेंही नाहीं.

ज्योतिषच्या मुद्दयाला उत्तर म्हणून ती विरक्त स्वरानें म्हणाली, " या घोडी-एवढ्या मुलीचें लगीन तिचं मत नसलं तरी तुम्ही करा, असं मीं कधीं एक देवसही म्हटलं नाहीं, ज्योतिष ! मला जी हौस होती ती, तुम्हीं दोघां बहिण-भावंडांनीं मिळून जेव्हां उधळून टाकलीत, तेव्हांच पोरीच्या मनाचा भाव मला का कळून चुकला नाहीं म्हणतोस ? सगळं कांहीं मला कळतं आहे. अन् कळतं आहे म्हणूनच तोंड मिटून मी गप्प आहें. आतां मला खोंचून टोंचून बोलणं फुकट आहे, ज्योतिष ! "

असें म्हणून ती फराळाच्या रेकेबींत पदार्थ व्यवस्थित ठेवूं लागली.

आईचें भाषण अलक्षितपणें ऐकून बिचारी सरोजिनी संकोचानें, लज्जेनें अगदीं मातीला मिळून गेली !

परंतु ती तेथें होती याची देखील जगत्तारिणीला कल्पना नव्हती !

ज्योतिष तिला कांहीं उत्तर देणार, त्यापूर्वीच आपल्या भाषणाचें सूत्र पुढें चालू करण्याच्या हेतूनें ती पुनः बोलूं लागली, " जो मिळाला म्हणजे तुझी बहीण खूब खूष होईल, त्यालाच तूं ती दे, बाळ ! माझं मत पुन्हां पुन्हां घ्यायची जरूर नाहीं बरं तुला. तूं करशील तें मला कबूल आहे, हें तुम्हांला मी एकदांच सांगून टाकतें. "

बहिणीला पराकाष्ठेचा संकोच वाटूं लागलेला पाहून स्वतः ज्योतिषचें मनही अतिशय संकुचित झालें.

तरीही कृत्रिमपणें हंसून तो म्हणाला, " पण कबुली प्रसन्न मनानं द्यायला हवी, आई ! "

जगत्तारिणी म्हणाली, " प्रसन्न मनानं दिली आहे बरं, ज्योतिष ! अगदीं प्रसन्न मनानं दिली आहे. मला आतां उगीच त्रास देऊं नका तुम्ही या बाबतींत."

ज्योतिष थोडा वेळ गप्प राहून स्वतःशींच विचार करूं लागला. एकंदर प्रकरण जर एवींतेवीं येथपर्यंत येऊन ठेपलें आहे, तर, आई असंतुष्ट असली तरी, आजच्या आज त्याचा कांहीं तरी पक्का निकाल करून घेणेंच इष्ट आहे, असें त्याला वाटूं लागलें. कारण, त्यांच्या क्लबांत, लायब्ररींत याच गोष्टीवर बहुधा चर्चा चालत असे, आणि पुढें काय होणार त्याचाही कांहीं नक्की थांगपत्ता लागत नसे. घरीं देखील पुष्कळ वेळां गोष्ट निघे; परंतु शेवटीं ती तशीच अनिर्णीत राहून जाई. अशा तऱ्हेच्या अनिश्चित वातावरणांत शशांकलाही दीर्घकाळ ठेवून चालण्यासारखं नव्हतं. या सर्व कारणांमुळें, वधूवरांच्या निश्चित इच्छेविरुद्ध मातेच्या स्पष्ट अनिच्छेचा बोजा आपल्या शिरावर घेऊनही, काय वाटेल तें झालें तरी, आतांच, कांहीं तरी नक्की करून टाकावें, असा त्यानें मनाशीं निश्चय केला.

तो म्हणाला, " यासंबंधानं मीं मनाशीं असं ठरवलं आहे, आई, कीं परवां रविवारीं, दोघांचौघां आप्तमित्रांच्या समोर या लग्नासंबंधानं पक्कं काय तें करून टाकावं. "

आई म्हणाली, " ठीक आहे. "

सरोजिनी धीरे धीरे आपल्या खोलींत निघून गेली.

रविवारीं सकाळीं ज्योतिषचा बैठकखाना त्याच्या आप्तमित्रमंडळींनीं हळुहळू भरत चालला होता. नवदाम्पत्याच्या विवाहासंबंधानें पक्कीं बोलणीं झाल्यावर तेथेंच मध्यान्हभोजनाचीही योजना करण्यांत आली होती.

आज शशांकाच्या वेषभूषेंतच कांहीं विशेष प्रकारचा नीटनेटकेपणा आणि ऐट दिसत होती असें नाहीं, तर त्याच्या मुखमंडलावर आणि नेत्रयुगुलांतही एका प्रकारची आनंदाची स्फूर्ति प्रकट होत होती. यामुळेंही तो आज विशेषच सुंदर दिसत होता.

कित्येक महिलाही दिवाणखान्यांत उपस्थित होत्या.

दिसत नव्हती फक्त एक सरोजिनी.

तिला बोलावून आणावयाला बेयराला पाठवूनही ती जेव्हां आली नाहीं, तेव्हां स्वतः ज्योतिषच तिकडे गेला.

दरवाज्यावर थाप मारून त्वरा करावयाची आग्रहाची सूचना देऊन तो परत दिवाणखान्यांत आला.

दुसरा एखादा दिवस असता, तर सरोजिनीचें हें आचरण गर्हणीय अपराध म्हणून मानलें गेलें असतें; परंतु आज तें क्षम्य समजलें जाण्याचा तिला अधिकारच आहे, असें समजून अतिथिमंडळी केवळ ज्योतिषलाच वारंवार घाई करीत होती.

सरोजिनीला आणखींही कांहीं बोलावणीं गेलीं.

त्यानंतर, दहाएक वाजावयाच्या सुमाराला, सरोजिनी जेव्हां तेथे येऊन उपस्थित झाली, त्या वेळीं तिचा एकंदर चेहरा पाहून जमलेली मंडळी अतिशय विस्मित झाली.

तिचें मुखमंडल पांढरें फिकट पडलें असून, डोळ्यांखालचा भाग काळा झाला होता. जणूं काय साऱ्या रात्रींत तिला झोंप कशी ती लागली नसावी!

बहिणीकडे पाहून ज्योतिष आश्चर्यानें स्तिमितच झाला! तो तिच्याकडे टकमकां पहात राहिला. सरोजिनीची एकंदर आकृति पाहून तो अगदीं हतबुद्ध होऊन गेला!

परंतु यापेक्षांही शंभरपटीनें मोठा विस्मय थोड्याच क्षणांनीं आपल्या नशिबीं आहे, याची त्याला कल्पनाही नव्हती!

तो प्रचंड विस्मय, उपेन्द्राच्या पूर्वकालच्या आकृतीच्या नुसत्या छायेच्या रूपानें, समोरचा पडदा बाजूला करून दिवाणखान्यांत येऊन उपस्थित झाला!

ज्योतिष विलक्षण चमकून एकदम उद्गारला, "कोण? अरे! हें काय? उपेन तर नव्हे?"

सरोजिनीही उद्गारली, "उपेनबाबू—"

वस्तुतः ती जर दिवसाची वेळ नसती, तर उपेन्द्राला त्यांनीं बहुधा ओळखलेंही नसतें! आपल्या डोळ्यांवरही त्यांच्या स्वतःचा अविश्वास झाला असता! माणसाच्या शरीराचें इतकें विलक्षण रूपान्तर होऊं शकतें, अशी नुसती कल्पनाही होणें त्यांना कठीण पडलें असतें!

उपेन्द्र जवळच्या एका खुर्चीवर बसला, आणि म्हणाला, "प्रकृति तशी बरी नाहीं. पुरीहून आलों मी. आज हा प्रकार काय चालला आहे, ज्योतिष?"

सरोजिनी झटकन् उठून उपेन्द्राजवळ आली, आणि त्याचा हात आपल्या हातीं घेऊन, त्याच्या चेहऱ्याकडे पहात म्हणाली, "कसला आजार झाला आहे तुम्हाला, उपेनबाबू?"

बोलतां बोलतां तिचा गळा दाटून येऊन डोळ्यांत आंसवें उभीं राहिलीं.

आपल्या फिकट झालेल्या ओंठांवर कृत्रिमपणें हंसूं आणून उपेन्द्र म्हणाला, " आजार कांहीं एकच नाहीं, ताई ! "

आज अगदीं पहिल्यानेंच उपेन्द्रानें तिला ' ताई ' या भगिनीवाचक शब्दानें तिला संबोधिलें.

डोळ्यांचीं आंसवें घाईघाईनें पुसून सरोजिनी त्याला म्हणाली, " चला, उपेनबाबू ! आपण त्या खोलींत जाऊन बसूं या—"

असें म्हणून उपेन्द्राचा हात धरून, त्याला हळुहळू सांवरीत, सरोजिनी त्या गर्दीनें गजबजलेल्या दालनांतून बाहेर गेली.

त्याबरोबरच त्या दालनांतलाच नव्हे, त्या बंगल्यांतला सर्व आनंद आणि उत्सव जणूं काय एकदम मालवला गेला.

ज्योतिष त्याच्या मागोमाग बाहेर आला, आणि सरोजिनीला म्हणाला, " उपेनला थोडीशी विश्रांति घेऊं दे इथं, सरोज ! तूं आतां दिवाणखान्यांत चल. "

मान हलवून सरोजिनी संक्षेपानें म्हणाली, " आज राहूं दे, दादा ! "

तिचा तो उद्गार ऐकून ज्योतिष हतबुद्धच झाला !

त्यानें विचारलें, " म्हणजे काय, सरोज ? रहाणार कसं ? "

सरोजिनी पूर्ववत् माथें हलवून म्हणाली, " नाहीं—आज राहूं दे, दादा !"

जगत्तारिणीला बातमी कळून ती ताबडतोब तेथें आली, आणि जवळ जवळ रडतच उपेन्द्राला म्हणाली, " कसा रे असा अगदीं हडहडलास बाबा ? पण आतां दुसरीकडे कुठं तूं रहायचं नाहींस बरं, उपेन ! माझ्याजवळ राहून डाक्टर बिक्टरचीं काय औषधं घ्यायचीं असतील तीं घे. इथंच रहा तूं. नाहीं तर प्रकृति बरी व्हायची नाहीं तुझी ! "

सरोजिनी लगेच आईच्या बोलण्याला दुजोरा देऊन म्हणाली, " हं—खरंच, उपेनदादा ! तुम्हाला आमच्याजवळच राहिलं पाहिजे हं आतां—"

तिनेंही आजच पहिल्यानें उपेन्द्राला ' दादा ' म्हणून संबोधिलें !

उपेन्द्र औषधोपचारासाठींच पुरीहून कलकत्त्याला निघून आला असावा, असेंच, त्याला न विचारतांच, प्रत्येकानें मनाशीं गृहीत धरलें होतें !

उपेन्द्र हंसून म्हणाला, " जरा फिरून बिरून झाल्यावर तुमच्या जवळच येऊन मी राहीन. पण आज एक तासाच्या आंत मला तुम्हीं सुटी दिली पाहिजे. "

जगत्तारिणी विस्मयानें म्हणाली, " आज-अन् ताबडतोब ? कां-कां बरं, उपेन ? "

सतीशच्या भयंकर आजाराची हकीगत सांगून, त्याच्या धर्मादाय हॉस्पिटल वगैरे संस्थांची बातमी त्याला ठाऊक होती तितकी त्या मंडळीला त्यानें कळविली.

नंतर बिहारीचें पत्र खिशांतून काढून, सरोजिनीच्या हातीं देऊन तो म्हणाला, " साडे अकरा वाजतां ट्रेन आहे तिकडे जायला. तिनेंच जायला हवं आहे मला. थोडंसं खातों अन् जातों स्टेशनवर. जर मी परत आलों, तर तुमच्याच आसऱ्याला येईन मी ! "

त्याच्या या वाक्यानें जगत्तारिणीचें मातृहृदय अगदीं हेलावून निघालें, आणि तिचे डोळे अगदीं भरून आले. सतीशवर मनांतल्या मनांत तिची अतिशय माया होती. तोच सतीश आज भयंकर आजारी होता; परंतु अशी प्रकृति घेऊन उपेन्द्र त्याची शुश्रूषा करावयाला निघाला होता. हें ऐकून तिचें काळीज अगदीं फाटून जाऊं लागलें. डोळे पुशीत पुशीत उपेन्द्राच्या जेवणाची व्यवस्था करावयाला ती तेथून निघून गेली.

सरोजिनीनें पत्र दोन तीन वेळ पहिल्यापासून अखेरपर्यंत लक्षपूर्वक वाचलें आणि तें उपेन्द्राच्या हातीं परत देऊन ती कांहीं वेळ स्तब्ध बसून राहिली.

नंतर ती म्हणाली, " तुमच्याबरोबर मीही येतें, उपेनदादा ! "

उपेन्द्र म्हणाला, " दुपारीं उगीच स्टेशनवर येऊन काय करायचं आहे, ताई ? "

सरोजिनी म्हणाली, " स्टेशनवर नाहीं—सतीशबाबूंच्या गांवीं-घरीं. मला तुम्ही बरोबर घेऊन चला. "

तिचा हा विलक्षण प्रस्ताव ऐकून उपेन्द्र चकितच झाला.

" वेड तर नाहीं लागलं तुला, ताई ? तूं तिकडे कशी येणार ? "

" तुमच्याबरोबर. "

उपेन्द्र म्हणाला, " छे: ! तें कसं जमणार ? ही मंडळी तुला जाऊं कशी देतील, अन् तूं तरी तिथं कां म्हणून जाणार ? "

सरोजिनीनें जोरानें माथें हलविलें आणि ती म्हणाली, " नाहीं-मी येणारच तुमच्याबरोबर—ठरलं ! "

असं म्हणून ती उठूनही गेली.

ऑफिसच्या खोलींत एका कोचावर बसून ज्योतिष शशांकाबरोबर एकान्तांत बोलत होता. चर्चा अर्थात्‌च चालू घटनेसंबंधींचीच असावी !

इतक्यांत सरोजिनी तेथें येऊन दादाच्या पाठीशीं उभी राहिली, आणि हळूच त्याच्या खांद्यावर तिनें हात ठेवला.

तत्क्षणीं चकित होऊन ज्योतिषनें तोंड फिरवून तिच्याकडे पहात विचारलें, " काय ग, सरोज ? "

सरोजिनी दादाच्या कानाशीं तोंड नेऊन मृदु स्वरानें म्हणाली, " सतीशबाबू भयंकर आजारी आहेत, दादा ! "

ज्योतिषला वाईट वाटल्यासारखें दिसलें.

मान हलवीत तो म्हणाला, " मीं दिखील ऐकलं तें ! उपेन अकाराच्याच गाडीनं जातो आहे ना ? "

सरोजिनी म्हणाली, " हो, अन् मी दिखील त्यांच्याबरोबर जातें आहें. "

ज्योतिष विलक्षण चमकून कांहीं क्षण तिच्याकडे पहातच राहिला !

" तूं—तूं जाणार ! कुठं जाणार ग ? "

सरोजिनी म्हणाली, " तिकडेच. "

ज्योतिष फिरून पहिल्यासारखा बसला, आणि जरा तीव्र स्वरानें उद्गारला, " तिकडेच म्हणजे ?—"

" सतीशबाबूंच्या घरीं—"

" सतीशच्या घरीं ? "

सरोजिनी म्हणाली, " हो. "

शशांक डोळे विस्फारून सरोजिनीकडे एकदृष्टीनें पहातच राहिला.

ज्योतिष उत्तेजित स्वरानें म्हणाला, " तुला वेडबीड तर नाहीं लागलं, सरोज ? सतीश आजारी असला, तर तुला काय त्याचं ? तूं कशाला जाणार आहेस तिकडे ? "

सरोजिनी शांत, परंतु दृढ स्वरानें म्हणाली, " मी जाणार नाहीं, तर कोण जाईल ? नाहीं, दादा—ते भयंकर आजारी आहेत—मला गेलंच—"

तिला पुढें बोलतांही येईना ! ऊर अगदीं भरून येऊन गळाही दाटला. दादाच्या खांद्यावर माथें टेंकून ती सारखी स्फुंदूं लागली.

जणूं प्रचंड वावटळ सुटून, तिनें क्षणार्धात ज्योतिषच्या डोळ्यांवरचा पुष्कळ दिवसांचा एक काळा पडदा फाडून दूर उडवून नेला !

कांहीं क्षण स्तब्ध बसून बहिणीच्या माथ्यावर हात ठेवून तो हलुहलू तिच्या केसांवरून फिरवीत ज्योतिष म्हणाला, " बरं, जा तूं. बरोबर मोलकरीण अन् दरवानही जाऊं दे तुझ्या. तिथं जातांच सतीशचं कसं आहे, तें मला तावडतोब टेलिग्राम करून कळव, म्हणजे उद्यां किंवा परवां रमणीडॉक्टरला घेऊन मीही तिकडे येतोंच. "

असें म्हणून बहिणीला ओढून समोर आणण्याचा त्यानें प्रयत्न करतांच; दोन्ही हातांनीं तोंड झांकून ती तेथून झटकन् पळून गेली.

शशांक वेड्याप्रमाणें ती गेली त्या दरवाज्याकडे पहातच राहिला.

नंतर त्यानें ज्योतिषला त्यांचाच प्रश्न केला, " सतीशबाबू आजारी असले, तर तुमची बहीण तिकडे कशाला जाते आहे तें मला कळत नाहीं, ज्योतिष-बाबू! हें आहे तरी काय प्रकरण एकंदर? मला सांगा तरी—"

ज्योतिषच्या कानीं हा प्रश्न गेला कीं नाहीं, हें सांगणें कठीण आहे. झोंपेंत स्वप्न पडत असलेल्या माणसाप्रमाणें तो बडबडत तेथून बाहेर गेला—

" त्याच्यासाठीं ही इतकी व्याकुल होऊन जाईल, अशी मला स्वप्नांतही कल्पना नव्हती. या पोरी बोलतात एक, करतात दुसरंच! हें सगळं प्रकरण चाललं आहे तरी कोणत्या थरावर!—"

स्टेशनवर उतरल्यानंतर उपेन्द्रानें ज्या सभ्य तरुणाकडे सतीशच्या गांवच्या रस्त्याची चौकशी केली, तो छोकरा सुदैवानें त्याच्याच डिस्पेन्सरींतील काम्पा-उंडर निघाला! स्वतःच्या कांहीं कामाकरतां तो स्टेशनवर आला होता.

आपल्या बाबूंच्या घरींच ही मंडळी जात आहेत, हें कळतांच त्यानें खूब धांवाधांव करून, एकच मेणा स्टेशन जवळ होता तो, सरोजनीसाठीं कसा तरी पैदा केला.

नंतर उपेन्द्राला तो म्हणाला, " हें दिसतं आहे हेंच महेशपुर. चला ना बोलत बोलत आपण सहज चालत जाऊं. तिथं पोंचायला अर्ध्या तासापेक्षां कांहीं अधिक वेळ लागायचा नाहीं. बैलगाडीनं गेलों तर त्यापेक्षां किती तरी उशीर होईल पोंचायला. "

चालत जाण्यासारखी उपेन्द्राची स्थिति नव्हती. परंतु बैलांच्या खटारा-गाडीच्या भयानें त्यानें हलुहलू चालत जाणेंच पसंत केलें.

सरोजिनीला मेण्यांत बसवून आणि दासी दरवानाला तिच्या बरोबर देऊन उपेन्द्र त्या छोकऱ्याबरोबर महेशपुरच्या रस्त्यानें निघाला.

छोकऱ्याचें वय सतरा-अठरापेक्षां कांहीं अधिक नव्हतं. खूब चलाख आणि चटपटीत होता तो तरुण. त्याचें नांव होतें एककडी.

परीक्षा पास झालेल्या डिस्पेन्सरीवरच्या डॉक्टरबरोबर जर आणखीं एकादं वर्ष आपण काढूं, तर आपणाला स्वतंत्र प्रॅक्टिसही नंतर सुरू करतां येईल, अशी त्याची पूर्ण ग्वात्री होती. त्याच्या मतें डॉक्टरी म्हणजे अगदीं तुच्छ गोष्ट! फक्त एक हातयश असलें कीं झालें!—दुसरें कांहीं नाहीं! नाहीं तर जगांत काय चाललें आहे? वांचणार असेल तो रोगी वांचतोच; आणि जो मरणार तो कांहीं झालें तरी मरतोच!

आपला त्याच्याशीं बिलकुल मतभेद नाहीं, असें उपेन्द्रानें त्याला सांगितलें.

नंतर त्याला त्यानें विचारलें, "तुमच्या बाबूजींचं कसं आहे आतां?"

एककडी म्हणाला, "बाबूजी? आज बावीस दिवस झाले-ते आतां चांगले वर होऊन उठले आहेत कीं दुखण्यांतून! महाशय, सगळीं औषधं बिवशधं बाबूजींना या पठ्ठयानंच दिलीं आहेत."

असें म्हणून त्यानें स्वतःच्या पाठीवर स्वतःच दोनचार शाबासक्या घेतल्या.

त्यानें सांगितलेली बातमी ऐकून उपेन्द्राला हायसें वाटूं लागलें.

कांहीं वेळानें त्यानें विचारलें, "आजार काय खूब जबर होता काय, एककडीबाबू?"

एककडी म्हणाला, "जबर? हूंः! अहो, ते तर जवळ जवळ गेलेच होते कीं! धणीणमाई जर तितक्यांत सुदैवानं येऊन पोंचली नसती, तर प्रत्यक्ष परमेश्वराला दिखील साध्य नव्हतं त्यांना वांचवणं! झालीच होती पार गच्छन्ती! अहो, असं व्हायचं नाहीं तर काय होईल, महाराजा? दिवस रात्र अष्टौप्रहर थाकोबाबाच्या संगतींत दारू अन् दारू, गांजा अन् गांजा—बस्स! कायसा म्हणे कालीसिद्ध प्रयोग चालला होता. माती नी धोंडे! कसला प्रयोग अन् कसलं काय? असल्या तंत्रमंत्रांच्या गोष्टींवर आमचा डॉक्टरांचा कधीं विश्वास बसणं शक्य आहे का? अहो, बोलून चालून आम्ही सायंटिफिक मेन! पण धनीण-माईनं येतांच अगोदर थाकोबाबाच्या बाबापणाला गचांडी मारून बाहेर काढून लावलं. त्याचा त्रिशूल बिशूल हिसकावून घेऊन दूर भिरकाऊन दिला बेट्याला हांकलून घरांतून! अहो, कितीतरी दिवस बेट्यानं केवढा गोंधळ माजवला होता! निव्वळ रानवट पशु होता बाबा म्हणजे! याला मारायला त्याच्या अंगावर वसकन् धांवून जायचा, त्यांच्यावर उखडून त्याला मारायला धांवायचा! अगदीं

सामान्य गोष्ट, महाशय ! माझ्यावर बेटा एक दिवस असाच भलता उसळून मारायला आला कीं ! मी आपला साधा-सीधा शांत माणूस !—कुणाबरोबर तंटाबखेडा करणं मला कधींच आवडत नाहीं. नाहीं तर, माझ्या जागीं जर दुसरा एकादा असता, तर त्यानं बाबाजींचं माथंच फोडून टाकलं असतं ना ? ”

असें म्हणून एककडीनें हातांतील छत्रीचे हवेंतच दोनतीन ‘ हात ’ केले !

उपेन्द्र त्याचें भाषण मौजेनें ऐकत होता. तो बोलावयाचा थांबेपर्यंत तो मुकाट्यानें हळुहळू चालत होता.

किंचित् आश्चर्यानें नंतर त्यानें विचारलें, “ ही धनीणमाई कोण हो ? ”

एककडी म्हणाला, “ तें कांहीं आपणाला माहीत नाहीं बुवा ! सगळेजण म्हणतात धनीणमाई–मीही म्हणतों धनीणमाई ! ”

उपेन्द्रानें विचारलें, “ तिचं वय किती असावं, याची तुम्हाला कल्पना देतां यईल ? ”

एककडी किंचित् विचारांत पडल्यासारखा दिसला.

चार दोन क्षण गप्प राहून तो म्हणाला, “ असेल चाळीस–पन्नास वर्षांचं. नाहीं तर बाबूजींना कुणी असं कह्यांत ठेवूं शकेल, महाशय ? आमचे डॉक्टर तर नेहमीं म्हणतात, ही माई जर आली नसती, तर बाबूजी पार गेलेच होते ! ”

एककडीबरोबर उपेन्द्र जेव्हां सतीशाच्या वाड्यांत येऊन पोंचला, तेव्हां सूर्य खूबच कलला होता.

सरोजिनी त्याच्यापूर्वीच पोंचली होती. तिचा मेणा फाटकाच्या बाहेर वडाच्या झाडाखालीं उतरवून दरवान उपेन्द्राचीच वाट पहात होता.

समोरच मोफत दवाखाना होता. तेथें लोकांची भयंकर गर्दी उसळली होती.

एककडीनें त्या सर्वांना आंत नेलें, आणि खालच्या बैठकखान्यांत त्यांना बसवून तो बिहारीला बोलवावयाला गेला.

परंतु बिहारी त्याला कोठें दिसेना.

डॉक्टरही बाहेर रोगी पहावयाला गेले होते. त्यामुळें सगळी मंडळी दाटी-वाटीनें बसून त्यांचीच वाट पहात होती.

उपेन्द्राला त्या ‘ धनीणमाई ’संबंधानें चांगलीच शंका होती. म्हणून सरो-जिनीला तेथेंच बसावयाला सांगून, तो समोरच्या जिन्यानें सरळ वरच्या मज-ल्यावर गेला.

सतीश बिछान्यावर गाढ झोंपला होता. त्याच्या माथ्याशीं बसून सावित्री तापाचा चार्ट लक्षपूर्वक पहात होती.

पलीकडच्या उघड्या खिडकींतून सूर्यस्ताची लालसर प्रभा खालीं तक्तपोशीवर पसरली होती.

इतक्यांत दारावरचा पडदा सरकल्याचा आवाज कानीं येऊन सावित्रीनें वर नजर करून पाहिलें.

एक अपरिचित गृहस्थ दरवाज्यांत उभा होता.

गडबडीनें माथ्यावर पदर ओढून घेऊन सावित्री उठून उभी रहात आहे, तोंच तो गृहस्थ आंत आलाही !

तिच्या अगदीं जवळ येऊन तो म्हणाला, " तुम्ही उठूं नका. मी उपेन. तुम्ही सावित्री ना ? "

सावित्रीनें नुसती मान हलवून होकार दर्शविला. परंतु भयानें, लज्जेनें, संकोचानें तिला अगदीं मेल्याहूनही मेल्यासारखें झालें !

उपेन्द्रानें विचारलें, " सतीशला झोंप लागली आहे वाटतं ? "

सावित्रीनें मानेनेंच होय म्हणून सांगितलें.

" आतां कसं आहे त्याचं ? "

पूर्ववत् मान हलवून तिनें बरें असल्याची माहिती दिली.

तेव्हां, उपेन्द्र हळुहळू, कॉटच्या एका कोंपऱ्यावर बसला. आपण काय करावयाचें तें त्यानें मनाशीं अगोदरच निश्चित केलें होतें.

तो हळुहळू म्हणाला, " तर मग तें पत्र तुम्हींच मला लिहून पाठवलं, हें आतां माझ्या लक्षांत आलं. मला इकडे यायला लिहून, आपलं स्वतःचं सुखदुःख, बरंवाईट सर्व कांहीं तुम्ही किती तुच्छ गणतां, हें माझ्या लक्षांत आलं नाहीं, असं तुम्ही समजूं नका. असंच तर असावं माणसानं ! अशानंच तर माणसाची खरी ओळख पटते."

आपण जणूं स्वप्नच पहात आहों, असें सावित्रीला वाटूं लागलें ! हें सारें बोलणारी ही व्यक्ति दुसरीच कोणी आहे—सतिशाचा हा उपेनदादा खात्रीनें नव्हे !

उपेन्द्र कांहीं वेळ स्तब्ध बसून राहिला.

नंतर तो म्हणाला, " तुझ्यापेक्षां वयानं मी मोठा आहें. तुला मी ' सावित्री ' म्हणूनच हांक मारीन—तूं मला ' दादा ' म्हणूनच म्हणत जा. आजपासून तूं माझी धाकटी बहीण, सावित्री ! "

तत्क्षणीं सावित्री उठली, आणि मुकाट्यानें उपेन्द्रासमोर येऊन, गळ्यांत पदर घेऊन तिनें त्याच्या पायांशीं वांकून प्रणाम केला.

नंतर दोन्ही हात पुढें करून त्याच्या बुटाची फीत सोडीत, खालीं नजर लावून ती म्हणाली, " यायला इतका उशीर कां बरं लागला ? पत्र वेळेवर मिळालं नाहीं का ? "

उपेन्द्रानें सावित्रीच्या कामांत व्यत्यय आणला नाहीं.

तो सहज स्वरांत उत्तरला, " नाहीं, सावित्री ! वेळेवर नाहीं मिळालं. मला पुरीला पत्र परवांच्या दिवशीं मिळालं अन् तसाच मी निघालों. पण तुझ्यासाठीं एक मोठं काम शिल्लक राहिलं आहे, ताई !— "

येथपर्यंत बोलल्यावर उपेन्द्राचे शब्द गळ्यांतच अडकून राहिले ! तो तिच्याकडे पहात राहिला.

उपेन्द्राच्या पायांतून काढलेले बूट सावित्रीनें जरा बाजूला ठेवले, आणि मोजे काढतां काढतां तिनें विचारलें, " कोणतं काम, दादा ? "

तरी देखील उपेन्द्राच्या तोंडून शब्द फुटेना.

क्षणभर तो तसाच बसून राहिला. नंतर जोर करून अन्तर्गत संकोच दूर करून तो म्हणाला, " पण तुझ्याशिवाय हें काम करतां येणं कुणालाच शक्य नाहीं, सावित्री ! दुसऱ्या एका व्यक्तीला साध्य होतं तें—ती सुरबाला— "

सावित्री गप्प बसून पुढील शब्दांची वाट पहात आहे, हें उपेन्द्राच्या ताबडतोब ध्यानांत आलें.

त्यानें विचारलें, " सरोजिनीचं नांव ऐकलं आहेस तूं ? "

मान डोलवून सावित्री म्हणाली, " ऐकलं आहे. "

" सगळी हकीगत तुझ्या कानांवर आली आहे, असं दिसतं. "

न बोलतां नुसती मान हलवून, सर्व कांहीं आपणाला माहीत आहे असें तिनें सुचविलें.

नंतर हळुहळू उपेन्द्र बोलूं लागला, " सतीश फार आजारी आहे, असं ऐकतांच, सरोजिनीला कांहीं करतां घरीं थांबवून धरतां येईना ! हट्ट धरून ती माझ्याबरोबर आली आहे. खालच्या बैठकखान्यांत ती वाट बघत बसली आहे. तिची कांहीं तरी व्यवस्था कर. ताई ! "

सावित्री धांदलीनें एकदम उठून उभी राहिली आणि उद्गारली, " त्या

आल्या आहेत ? तर मग अशीच जाऊन मी–पण मी त्यांच्याकडे जाऊं का ? जातां येईल का मला ? ”

या बोलण्याचें मर्म उपेन्द्राच्या तेव्हांच लक्षांत आलें.

डोळे विस्फारून तिच्याकडे पहात तो प्रसन्न स्वरानें म्हणाला, “ तुला नाहीं जातां येणार तर कुणाला येणार ? माझी पाठची बहीण या जगांत काय कुणाही स्त्रीपेक्षां कमी दर्जाची आहे, म्हणून कुठंही माथं उंच करून उभं रहायला तिला संकोच वाटावा ? माझी बहीण, हा काय जगांत सामान्य परिचय आहे, ताई ? ”

सावित्रीच्या हृदयांत उपेन्द्राच्या या भाषणानें जी खळबळ उडाली, ती तिला सहन झाली नाहीं. क्षणार्धांत तिचं मस्तक उपेन्द्राच्या पायांवर एकदम नम्र झालें.

त्या निःशक्त आणि निस्तेज झालेल्या पायांची धूळ घेऊन ती वारंवार माथ्याला लावीत सावित्री जेव्हां उठून उभी राहिली, तेव्हां तिच्या चेहऱ्यावर पदराचा बुरखा नसून तिच्या डोळ्यांतून अश्रूंचा प्रवाह चालला होता !

आंसवांनीं नाहून निघालेल्या त्या मुखमंडलावर प्रतिबिंबित झालेला स्त्री-चरित्राचा उज्ज्वल महिमा डोळ्याचें पातेंही न हलवितां उपेन्द्र एकदृष्टीनें पहात राहिला.

डोळे पुसून सावित्री जेव्हां खोलींतून बाहेर गेली, तेव्हां उपेन्द्र तिला बसल्या जागेवरूनच म्हणाला, “ जा, ताई, जा ! ज्याची बहीण म्हणून तिला तूं आपली ओळख करून देशील, त्याचा उल्लेख करतांना तिला तूं बेलाशक सांग, आजपर्यंत आम्हीं दोघां बहीण-भावंडांनीं जगांत कधीं हीन दीन काम केलं नाहीं ! ”

सावित्री निघून गेल्यावर, झोंपलेल्या सतीशकडे उपेन्द्र एकदृष्टीनें पहात राहिला.

कांहीं वेळानें त्यानें हळूच हांक मारली, “ सतू–अरे सतीश—”

सतीश जागा होऊन धडपडत उठून बिछान्यावर बसला, आणि डोळे चोळून त्याच्याकडे पहातच राहिला.

उपेन्द्र म्हणाला, “ तुझा उपेनदादा ! मला ओळखलं नाहींस तूं ? ”

उपेनदादा !

अत्यंत आश्चर्यानें आणि विव्हलतेनें सतीश त्याच्याकडे डोळ्याचें पातेंही हलूं न देतां पहात राहिला.

" काय रे ? अजूनही नाहीं का ओळख पटली, सतू ? "

जणूं काय झोंपेच्या भरांत असल्याप्रमाणें सतीश बोलूं लागला ! त्याच्या मस्तकांत विलक्षण गोंधळ माजला असावा, असें त्याच्या एकंदर आविर्भावावरून दिसत होतें.

तो जड स्वरानें म्हणाला, "ओळखलं—तूं—तूं आला आहेस, उपेनदादा ?"

" होय, भाई ! मी आलों आहें. "

" तर मग तुझे पाय जरा वर कर, उपेनदादा ! किती-किती दिवसांनीं तुझ्या पायांची धूळ माझ्या मस्तकीं लागलेली नाहीं. "

उपेन्द्रानें दोन्ही हात पुढें केले, आणि आपल्या चिरकालच्या जिवलग मित्राला ओढून हृदयाशीं घट्ट धरलें.

कांहीं वेळ दोघेही फक्त परस्परांच्या हृदयाशीं हृदय लावून अचेतन मूर्तीप्रमाणें बसून राहिले होते.

नंतर उपेन्द्र हलुहलू म्हणाला," आतां उशीर नको लावूंस, सतीश ! अगदीं लवकर, लवकर बरा हो, भाई ! तुझ्या निमित्तानं माझीं किती तरी कामं पडून राहिलीं आहेत. "

" कोणतीं कामं, उपेनदादा ? "

इतक्यांत मागून पायांची चाहूल लागल्यामुळें सतीशानें तिकडे वळून पाहिलें. सावित्रीचा हात धरून सरोजिनी हलुहलू येत होती.

सतीशनें एकवार उपेन्द्राकडे पाहिलें, आणि एकवार डोळे चांगले चोळून त्या दोन्ही तरुणींच्या मुखमंडलांकडे दृष्टि लावून तो स्तब्ध बसून राहिला. आपल्या डोळयांवर त्याचा विश्वास बसत नसावा, अशी उपेन्द्र आणि सावित्री या दोघांचीही खात्री झाली.

जवळ जवळ नुसतें अस्थिचर्म राहिलेल्या सतीशच्या पांढऱ्या फेंक चेहऱ्याकडे एकवार पाहून सरोजिनी झटकन् पुढें सरली, आणि त्याच्या पायांशीं बिछान्यावरच उपडी पडून वेगानें येणारें रडूं दाबण्याचा प्रयत्न करूं लागली.

कोणाच्याही तोंडून एक शब्दही फुटत नव्हता; परंतु या आक्रन्दनांतच किती प्रचंड वेदना आणि क्षमायाचना प्रच्छन्नपणें राहिल्या होत्या, तें प्रत्येकाला पूर्णपणें कळून चुकलें होतें !

सतीश लांकडाच्या निर्जीव बाहुलीप्रमाणें मुकाट्यानें बसून राहिला होता. त्याच्या हृदयाच्या एका भागांत ज्याप्रमाणें अव्यक्त आनंदाचा उद्रेक तरंगा-तरंगानें उसळत राहिला, त्याप्रमाणेंच दुसऱ्या भागांत दारुण समस्येंचे आघात एकसारखे होत राहून त्याचें सर्व अन्तर्यामच भयभीत आणि अत्यंत क्षुब्ध झालें होतें !

पुष्कळ वेळपर्यंत कोणाच्याही तोंडांतून शब्द निघत नव्हता. संध्याकाळच्या अंधारानें बहुतेक अंधुक झालेल्या त्या शांत निःस्तब्ध खोलींत, येणारें अनिवार रडूं आवरून धरण्याचे सरोजिनीचे प्रयत्न चालले असतांही मधुनमधून तें उसळून प्रकट होत होतें. त्याचाच क्षीण आवाज काय तो होत होता !

या निःस्तब्धतेचा उपेन्द्राच्या कंठस्वरानें भंग केला. सरोजिनीच्या मस्तकावर आपला उजवा हात ठेवून तो हलुहलू म्हणाला, " अपराध कुणाचाही झाला असो; माझ्या या बहिणीला तूं क्षमा कर, सतीश ! हिच्या हृदयाच्या अन्त-र्भागीं पुष्कळ दिवस जें दुःख खूप सांचलं आहे, त्यानंच हिला तुझी सेवा करण्यासाठींच माझ्याबरोबर तुझ्याकडे पाठविलं आहे. पण सावित्री, असा चेहरा अतिशय खिन्न करून तूं इथं उभं राहून भागायचं नाहीं, ताई ! तुझ्या या मरणोन्मुख दादाचे अनेक उत्पात, अनेक भार आजपासून तुला वहावे लागणार आहेत, बेटा ! ये—माझ्या जवळ इथं येऊन बस—"

सावित्रीच्या नांवाचा उल्लेख होतांच, लाजलज्जा, यातना सर्व विसरून सरो-जिनी वर नजर करून उभी राहिली. उपेन्द्राची ती कोणी तरी जवळची नाते-वाईक असावी. असाच या क्षणापर्यंत तिचा समज होता.

सावित्री मुकाट्यानें उपेन्द्राजवळ आली, आणि त्याच्या पायांशीं खालींच तक्तपोशीवर बसली.

तिच्या मस्तकावर हात ठेवून उपेन्द्र म्हणाला, " तुझी क्षमा मागून मी तुझी अमर्यादा करीन, असं तूं बिलकुल समजूं नको, ताई ! पण सतीश, तूं मात्र मला माफी केली पाहिजेस. तुझा जितका अपमान, जितकं अनिष्ट मीं केलं आहे, तितकं सारं तूं आज विसरून जा, भाई ! "

सतीशच्या तोंडून शब्द फुटेना ! तो स्तिमित होऊन, डोळ्यांचें पातेंही न हलवितां त्याच्याकडे पहातच राहिला.

उपेन्द्र म्लानपणें किंचित् हंसला, आणि म्हणाला, " तुमच्या मनांत कोणते विचार चालले आहेत, त्याची मला कल्पना आहे, सतीश ! परंतु तुमच्या

या उपेनदादाचं तोंड किती वेळ एकदम बंद होऊन गेलं होतं, हें मात्र तुम्हांला माहीत नाहीं, भाई ! म्हणून जितक्या गोष्टी त्याच्या अन्तःकरणांत जमा होऊन राहिल्या आहेत, तितक्या साऱ्या आज एकाद्या दारुड्याप्रमाणं सारख्या बाहेर पडत आहेत ! त्यांपैकीं कुणाला अटक करून ठेवूं, सांगा ?"

उपेन्द्र ज्या तऱ्हेनं बोलत होता, त्या तऱ्हेमुळें सतीशच्या हृदयांतील अन्तर्भागीं कसल्या तरी एका अज्ञात भयानं प्रचंड क्षोभ माजला होता. कांहीं एक विशिष्ट गोष्ट कळावी अशी त्याची तीव्र इच्छाही होती. परंतु त्या प्रश्नाची गोष्टही त्याच्या मनांत उद्भवली नाहीं, कीं त्याच्या तोंडांतून शब्दही बाहेर आला नाहीं ! तो जसा एक नजरेनें पहात बसला होता, तसाच नंतरही बसून राहिला.

दुसऱ्याच क्षणीं सरोजिनीच्या मुखाकडे पहात उपेन्द्र सतीशला म्हणाला, "तूं बरा हो—तुम्हीं सुखी व्हाल, असा मी तुम्हाला आशीर्वाद देतों. माझ्या या बहिणीला घेऊन मी निघून जाणार आहें."

असें म्हणून सावित्रीच्या मस्तकावर करांगुलीचे मृदु प्रहार करीत उपेन्द्र पुढें म्हणाला, "तुझ्याशिवाय माझी जबाबदारी घ्यायला मला कुणी—कुणी नाहीं बरं, ताई ! अन् ज्या दुखण्यानं मीं आजारी आहें, त्यामुळं कुणालाही जवळ बोलवायला मला धाडसही होत नाहीं—अन् होणं योग्यही नाहीं. जीं माणसं केवळ दुसऱ्यांसाठींच जगांत जगत असतात, अशा तुझ्यासारख्या माझ्या या बहिणीवर मात्र माझी जबाबदारी सोंपवायला मला कसला किंतु वाटत नाहीं. येशील ना ताई, माझ्याबरोबर ? सतीशला सोडून जातांना तुला कष्ट होतील. होईनात झाले तर ! यापेक्षांही केवढे तरी प्रचंड दुःखकष्ट परमेश्वर मनुष्याला सहन करायला लावून त्याला खऱ्या 'माणुस' या पदवीला पोंचवतो !"

इतक्या वेळचा तो विसरलेला प्रश्न सतीशच्या मनांत आतां जणूं विजेच्या रेखांनीं खेळूं लागला.

तो एकदम म्हणाला, "उपेनदादा, आमची पशुवहिनी कशी आहे बुवा ? ती आजारी होती, असं कळूनच इकडे आलों मी--"

उपेन्द्रानें चार दोन क्षण दांतांनीं आपला अधर दाबून धरला. नंतर संवयीप्रमाणें त्यानें एकवार वर पाहिलें, आणि नंतर तो उद्गारला, "पशु गेली—वारली."

सरोजिनी एकदम किंचाळली, "सुरबाला—वहिनी—गेली ?

उपेन्द्र मान हलवून म्हणाला, "होय—गेली."

सतीश बिछान्यावरच्या मोठ्या उशीवर अंग टाकून, मूर्च्छितप्राय स्थितींत शून्य दृष्टीनें समोर पहात बसून राहिला.

'सुरबाला नाहीं–ती वारली,' हें वृत्त उपेन्द्राच्या तोंडून अतिशय सहजपणें बाहेर पडलें; परंतु हें 'नाहीं' म्हणजे काय नसणें, हें जाणें म्हणजे कुणाचें जाणें, याची जाणीव सतीशपेक्षां दुसऱ्या कोणालाही अधिक यथार्थतेनें असणार होती? सरोजिनीपेक्षां तें कुणाला अधिक दिसणार होतें? सावित्रीपेक्षां तें कुणाला अधिक ऐकूं येणार होतें?

तरीसुद्धां सुरबाला नाहीं–ती गेली!

सतीशच्या तोंडाकडे पाहून किंचित् हंसून उपेन्द्र म्हणाला, "परमेश्वरानं तिला नेलं, त्याबद्दल आतां तक्रार काय करायची आहे? पण या वेळीं जर तो दिवा कारटा जवळ असता! हूं:! आई-बाप नाहींत–अशा स्थितींत लहान मूल होता, तेव्हांपासून मीं त्याला वाढवून, चांगला जवान केला, पण त्यानंही कुठं दडी दिली! कुणाला ठाऊक, मरायच्या पूर्वीं एकवार तरी तो मला आतां भेटेल कीं नाहीं!"

सतीश तसाच मूर्च्छितप्राय स्थितींत पडून राहिला होता.

त्यानें विचारलें, "दिवाचं काय झालं, उपेनदादा?"

उपेन्द्र म्हणाला, "कुणाला ठाऊक काय झालं त्याचं तं! कलकत्त्याला हाराणदादाच्या घरीं राहून त्यानं अभ्यास करावा, अशी व्यवस्था मीं केली होती. ती लज्जास्पद गोष्ट कुणालाही सांगण्यासारखी नाहीं–अन् सांगायची इच्छाही कधीं होत नाहीं. आमच्या घरीं देखील अजूनपर्यंत असाच सर्वांचा समज आहे, कीं दिवा कलकत्त्यालाच राहून अभ्यास करतो आहे. सुरबालेची त्याच्यावर अतिशय ममता होती. तिची बिचारीची मरण्यापूर्वीं त्याला एकवार पहावं अशी फार इच्छा होती. पण तिची ही अखेरची इच्छा देखील मला पूर्ण करतां आली नाहीं. हाराणबाबूंच्या बायकोबरोबर तो जो कुठं निघून गेला, त्याचा पत्ताच नाहीं!"

तिघांही श्रोत्यांनीं एकदमच अस्पष्ट स्वरानें कांहीं तरी चीत्कार केला; परंतु त्यांत स्पष्ट असा शब्द कांहींच उमटला नाहीं!

त्यानंतर एकदम चहूंकडे शांत झालें. ती खोली जणूं एकाद्या शून्य स्मशानभूमीप्रमाणें अत्यंत स्तब्ध, परंतु जड आणि भयाण वाटूं लागली.

उपेन्द्राच्या चेहऱ्याकडे कोणाला नुसती नजरही टाकवेना! परंतु, आपलें इतक्या दिवसांचें दुःख, कष्ट, मान, अभिमान हीं सर्व, त्या आकाशभेदी वेदनां-

पुढें अजिबात क्षुद्र होऊन गेलीं आहेत, असें त्यांपैकीं प्रत्येकाला वाटत होतें.

सतीशकडून सावित्रीला सगळी हकीगत कळली होती. सर्व कांहीं तिला कळतही होतें. निर्माण झालेली प्रचंड शून्यता हा पुरुष कशानें भरून काढीत असेल, याविषयीं ती विचार करूं लागली. आपल्या दररोजच्या जीवनांत ही दारुण व्यथा अगदीं सहज रीतीनें पेलून हा माणुस सर्व व्यवहार यथातथा पार पाडीत आहे! ज्याच्या हृदयाच्या अन्तर्भागीं एवढा प्रचंड हाहाकार चालला आहे, तो बाह्यतः इतका शांत कसा? त्याची यत्किंचित् कसली तक्रार नाहीं, हें कसें? याच्याजवळ अशी जादू तरी कोणती आहे? स्वतःचें सुख-दुःख याला इतक्या सहज सुसह्य होतें, हा चमत्कार करतो तरी कोण?

उपेन्द्राच्या पायांवर हळुहळू हात फिरवीत सावित्री म्हणाली, "दादा असल्या या सगळ्या दुखण्यांत पहाडी हवा तुम्हाला फार चांगली, नाहीं?"

उपेन्द्र तिच्या माथ्यावर हात ठेवून तिच्याकडे चार दोन क्षण निःस्तब्धपणे पहात राहिला.

सावित्रीनें पुनः प्रश्नार्थीनें त्याच्याकडे पाहिलें.

उपेन्द्र किंचित् हंसला, आणि म्हणाला, "होय, ताई! डॉक्टरलोक असं म्हणतात खरं. पण देव ज्याला हांक मारतो, त्याला या हवापाण्याचा कांही उपयोग होत नाहीं."

सावित्री म्हणाली, "असूं दे तें, दादा! पण आपण एखाद्या पहाडी ठिकाणीं जाऊन राहूं या—"

उपेन्द्र हंसून म्हणाला, "बरं-तसं करूं."

महामायेची पूजा जवळ जवळ येत चालली, आणि सतीश पूर्णपणें बरा होण्यापूर्वीच वंगजनतेचे सर्वश्रेष्ठ, आनंदानें उजळून निघालेले दिवस सुखस्वप्नाप्रमाणें येऊन निघूनही गेले. आणखींही कांहीं दिवस येथेंच रहावें, असा अगोदरचा बेत होता; परंतु उपेन्द्राची प्रकृति ध्यानीं घेऊन, त्रयोदशीच्या दिवशीं तेथून निघावें, असें सावित्रीनें निश्चित केलें.

उपेन्द्रानें सौम्यपणें थोडा विरोध केला.

परंतु जिद्दीनें तो बाजूला सारून ती म्हणाली, "छे-तें नाहीं जमण्यासारखं, दादा! सतीशबाबूंना आतां कसला आजारबिजार नाहीं. त्यांची प्रकृति पूर्वी-सारखी ठणठणीत व्हायची वाट पहात आम्ही राहिलों, तर तुम्ही आमच्या

हातीं लागणं कठीण होईल. परवां आपणाला निघालंच पाहिजे. तुम्ही आतां कसली अडचण उपस्थित करूं नका, दादा ! "

उपेन्द्र हंसून म्हणाला, " ठीक–त्याचं पहातां येईल. परंतु तुझ्या मताप्रमाणं झालं, म्हणजे मी तुमच्या हातीं खात्रीनं लागेन ना ? "

परंतु . अधिक वादाच्या भरीला न पडतां सावित्री आपल्या कामाला निघून गेली.

उपेन्द्राचे दिवस येथें शान्त, स्थिरपणें चालले होते. त्यामुळें, येथून जावयाची त्याला बिलकुल घाई नव्हती, आणि प्रस्थानाचा दिवस खरोखरच इतका नजीक येऊन ठेपला आहे, यावरही सहजासहजीं त्याचा विश्वास बसत नव्हता.

परंतु सतीशचा चेहरा मात्र सुकत चालला होता. कारण उपेन्द्राचा जिद्दी स्वभाव त्याच्या पूर्ण माहितीचा होता. तो कधींही कसलीच बाधा मानीत नाहीं आणि जो कोणी त्याच्या संपर्कात येईल, त्याला शेवटपर्यंत त्याच्यापुढें नम्रच व्हावें लागतें, याचाही सतीशला उत्तम अनुभव होता. यामुळें, कांहीं झालें तरी त्रयोदशीचा दिवस कधींही टळणार नाहीं, याबद्दल त्याला लवमात्र संशय नव्हता. परंतु तो कांहीं बोलला मात्र नाहीं.

दुसऱ्या दिवशींही सतीश यासंबंधानें अगदीं गप्पच होता.

त्याच्या समक्षच बिहारीनें डोळ्यांत पाणी आणून सावित्रीला विचारलें, " आतां किती दिवसांनीं दर्शन, आई ? "

तरीही सतीश कांहीं न बोलतां खालीं पहात गप्पच राहिला.

सतीशच्या चेहऱ्याकडे मुद्दाम नजर टाकून, सावित्री गंभीरपणें म्हणाली, " ज्या दिवशीं तुझ्या बाबूजींचं लग्न होईल, त्या दिवशीं होईल आपली भेट पुन्हां, बिहारी ! पण तुझ्या धनीसाहेबांनीं दया करून मला आणलं, तरच हं !"

दहा एक दिवसांपूर्वी सरोजिनीला घेऊन जाण्याकरतां ज्योतिष स्वतःच सतीशकडे आला होता. तेव्हां उपेन्द्राच्या मध्यस्थीनें लग्नासंबंधानें सर्व बोलणीं अगदीं पक्कीं झालीं होतीं.

सतीशनें बिलकुल कसली हरकत घेतली नाहीं. त्याच्या वडिलांचें वार्षिक अशौच पुरें झालें म्हणजे विवाह व्हावा, असें उभयपक्षीं निश्चित झालें होतें.

सावित्रीनें आतां याच गोष्टीचा इंगितानें उल्लेख केला होता, आणि सतीशनें कांहीं न बोलतां तो मुकाट्यानें ऐकून घेतला होता.

निघण्याच्या दिवशीं सकाळीं उपेन्द्रानें कांहींसें चिंतातुरतेनें विचारलें,

" आपली तब्बेत अजून तशी ठीक झाली नाहीं, असं वाटतं आहे का रे तुला, सतीश ? कालपासून तूं अगदीं सुकलेला दिसतो आहेस मला ! "

सतीश उदासपणें म्हणाला, " नाहीं बुवा ! ठीक आहे कीं माझी तब्बेत, उपेनदादा ! "

उपेन निघून गेल्यावर सावित्री खोलींत आली.

तिचे डोळे चांगलेच लालबुंद झाले होते. डोळयांच्या पापण्या भिजून जड झाल्या होत्या, आणि तें तिच्याकडे नजर टाकतांच कोणालाही कळून येण्यासारखें होतें.

सतीशनें घेतलेल्या आपल्या गळयाच्या शपथेचें त्याला वारंवार स्मरण करून देऊन सावित्रीनें आतुर स्वरानें विचारलें, "शपथ नीट पाळाल ना ? "

सतीश म्हणाला, " पाळीन. "

" दारू, गांजा हातीं दिला, तरी त्याला स्पर्श करणार नाहीं ? "

" नाहीं. "

" मला विचारल्याशिवाय तंत्रा-मंत्राच्या बाजूकडे ढुंकूनही पहाणार नाहीं ?"

" नाहीं. "

" जोंपर्यंत तब्बेत पहिल्यासारखी ठणठणीत ठीक होणार नाहीं, तोंपर्यंत दोन दिवसांच्या अंतरानें पत्र पाठवाल ना मला ? "

" पाठवीन. "

" पत्रांत कोणतीही गोष्ट लपवून ठेवणार नाहीं ना ? "

" नाहीं. "

" तर मग मी येतें आतां. "

असें म्हणून घाईघाईनें खालीं वांकून तिनें नमस्कार केला, आणि ती तेथून निघून गेली.

सतीश आतांपर्यंत बिछान्यावर बसून राहिला होता, तो आतां एकदम त्यावर सपशेल आडवा झाला. दोघांना अखेरचा निरोप देण्याकरतां खालीं येण्याचा त्यानें प्रयत्नही केला नाहीं.

बाहेर दोन मेणे तयार होते.

एका मेण्याजवळ उभा राहून उपेन्द्र डॉक्टरसाहेबांबरोबर हळुहळू बोलत होता.

इतक्यांत जाड चादरीनें सर्व अंग झांकून घेऊन सावित्री धीरे धीरे बाहेर आली, आणि दुसऱ्या मेण्यांत ती जाऊन बसणार, इतक्यांत बिहारी धांवत

धांवत येऊन तिला हळूच म्हणाला, " जरा एकवार आंत चल बरं, आई! कांहीं अतिशय जरूरीच्या कामासाठीं बाबूजी बोलावताहेत तुला."

कांहीं न बोलतां सावित्री तशीच आंत गेली.

डॉक्टरांशीं बोलतां बोलतां उपेन्द्रानें तें पाहिलें.

सावित्रीला ती भीति पहिल्यापासूनच वाटत होती. सतीशाच्या खोलींत आल्याबरोबर तिनें पाहिलें, सतीश पलीकडच्या बाजूला तोंड करून झोंपला आहे.

बिछान्याजवळ येऊन हंसल्यासारखें करून सावित्री म्हणाली, " काय आहे हा प्रकार? आमची गाडी चुकवायचा विचार आहे वाटतं?"

सतीशनें ताबडतोब तोंड फिरवलें, आणि एकदम हात पुढें करून सावित्रीच्या अंगावरची चादर ओढून घट्ट धरली.

तो आग्रहाच्या स्वरानें तिला म्हणाला, " बस, बस. मी तुला जाऊं देणार नाहीं. हा गांव माझा आहे. हें घर माझं आहे. माझ्या इच्छेविरुद्ध जबरदस्तीनं तुला इथून घेऊन जाऊं शकेल, असं सामर्थ्य दहा उपेनदादांमध्येंही नाहीं!"

हा प्रकार पाहून सावित्री आश्चर्यानें अगदी स्तंभितच होऊन गेली! तिनें सतीशकडे रोखून पाहिलें. सतीशाच्या डोळ्यांत कांहीं विलक्षण हिंस्र, तीव्र दृष्टि तिला आढळून आली. त्या नजरेला स्वाभाविक म्हणणें अशक्य होतें!

येथें आतां जोर चालणार नाहीं, हें सावित्रीच्या ताबडतोब लक्षांत आलें.

बिछान्याच्या एका टोंकाला बसून भर्त्सनेच्या, पण स्निग्ध स्वरानें ती म्हणाली, " छी: छी:! असं काय बरं भलतंच बोलतां? उपेनदादा तर मला कांहीं जबरदस्तीनं घेऊन जात नाहीं आहेत. त्यांची बायको नाहीं, भाऊ नाहीं, तुम्ही नाहीं—अशा भयंकर, प्राणांतिक आजारांत त्यांची सेवाशुश्रूषा करील, असं कुणीही नाहीं, म्हणून तर तुमच्याकडून मागून घेऊन मला तें बरोबर नेताहेत ना? याला का जोर-जबरदस्ती म्हणायचं?"

सतीश जोरजोरानें माथें हलवून म्हणाला, " अगदीं खोटी गोष्ट आहे ही!—खोटं सांत्वन करते आहेस तूं माझं! उपेनदादा केवळ आपल्या मित्राच्या-ज्योतिषबाबूंच्या तोंडाकडे पाहून तुला इथून काढून न्यायला पहातो आहे! आज दोन दिवस अष्टौप्रहर मनाशीं मी विचार करतों आहें. माझी अशी खात्री झाली आहे, कीं जो गप्प राहून सहन करतो, त्याच्यावर सर्वचजण अत्याचार करतात. कुणाचंही कारण काय वाटेल तें असूं दे—मी तुला कांहीं इथून जाऊं देणार

नाहीं. जाऊं दे–यासंबंधानं वितंडवाद घालीत माथं गरम करायची माझी इच्छा नाहीं. आपलं जाणं कांहीं होत नाहीं, असा निरोप तूं बिहारीकडून खालीं पाठवून दे. बिहा––"

घाईघाईनें हातानें त्याचें तोंड चापून धरून सावित्री म्हणाली, "तुम्हाला काय वेडबीड तर लागलं नाहीं ? बरं ठीक–कदाचित् मी म्हणतें, त्यांचा मतलब चांगला नसेल. पण मला इथं ठेवून घेऊन तुम्ही काय करणार आहां, तें मला कळत नाहीं."

सतीश चार दोन क्षण गप्प राहिला.

नंतर तो एकदम म्हणाला. "लग्न करीन असं मीं म्हटलं तर ?—"

सावित्रीही ताबडतोब म्हणाली, "अन् त्याला माझी संमति नाहीं, असं मीं दिखील म्हटलं तर ?"

सतीश ताडकन् म्हणाला, "तुझ्या संमति असंमतिवर कांहीं दिखील अवलंबून नाहीं !"

सावित्री मनांत भ्याली. परंतु किंचित् हंसून ती म्हणाली, "म्हणजे माझ्याशीं जबरदस्तीनं लगीन करणार आहां वाटतं ?"

असें म्हणून त्याच्या कपाळावरील रुख्या केंसांच्या बटा अत्यंत ममतेच्या हातानें उचलून धीरे धीरे मागें सारीत, कृत्रिम हास्याचें गंभीरतेंत रूपान्तर करून, सावित्री म्हणाली, "छीः ! असं कांहीं भलतं सलतं भ्रमांत दिखील मनांत आणूं नका. मी विधवा आहें—मीं कुलत्याग केला आहे. कलंकित म्हणून समाज माझी सतत निंदा करीत आला आहे. माझ्यासारख्या स्त्रीशीं लग्न केल्यानं केवढं प्रचंड दुःख भोगावं लागेल, याची तुम्हाला कल्पना नाहीं, परंतु जो जन्मापासून अत्यंत शुद्ध, शोकाच्या अग्नींत जळून जाऊन जो हिऱ्याप्रमाणं निर्मल बनला आहे, त्याला त्याची पूर्ण कल्पना असल्यामुळंच या अभागिनीला आसरा देऊन तो आपल्याबरोबर घेऊन जातो आहे. जिद्दीच्या भरांत त्याची मंगल इच्छा तुम्हाला दिसत नाहीं; परंतु म्हणून त्याच्यावर खोटा दोषारोप करून भलतंच पाप करूं नका—कायमचा अन्याय अंगाला चिकटवून घेऊं नका."

बोलतां बोलतां तिचा गळा अगदीं दाटून येऊन डोळ्यांतून दरदरां अश्रुप्रवाह सुरू झाला.

परंतु तिच्या डोळ्यांतील या अश्रुजलानें सतीश आज शांत झाला नाहीं. उलट तो अधिकच क्षुब्ध झाला.

उत्तेजित स्वरानें तो म्हणाला, " सगळं-सगळं अगदीं खोटं ! अशा रीतीनंच स्वतःला माझ्यापासून दूर ठेवून तूं माझा सत्यानाश चालवला आहेस ! उपेनदादा म्हणतो, जगांत कुणाकुणापेक्षां तूं हीन नाहींस—हीच गोष्ट खरी आहे. "

सावित्री म्हणाली, " नाहीं—तसं नाहीं. दादा आतां समाजाच्या पलीकडे आहेत, इहलोकच्याही पलीकडे गेलेले आहेत. तेव्हां त्यांच्या मुखीं जें सत्य, तें दुसऱ्याच्या मुखीं, दुसऱ्याच्या प्रयोजनामुळं सत्यच असेल असं नाहीं. तुम्ही म्हणाल, सत्य असो, मिथ्या असो, मला समाजाची जरूर नाहीं— मला पाहिजेस एक तूं ! परंतु मला तर तसं कांहीं बोलतां येत नाहीं, ना ? समाजाला माझी जरूरी नाहीं, मला तो मानीत नाहीं, हें मला ठाऊक आहे. परंतु मला तर समाजाची जरुरी आहे, अन् मी त्याला मानतेंहि. मला ठाऊक आहे, कीं श्रद्धेच्या आधाराशिवाय प्रेम उभं राहूं शकत नाहीं. समाज ज्या स्त्रीला आपल्या संमानाचं आसन देत नाहीं, तिला आपल्या अंगांतील शक्तीनं त्या आसनावर प्रतिष्ठित करणं कुणाही पतीला शक्य नाहीं ! ही असाध्य गोष्ट साध्य करायचा प्रयत्न करूं नका, बाबूजी ! "

सतीशनें दोन्ही हातांनीं सावित्रीचे दोन्ही हात घट्ट घट्ट पकडून धरले, आणि अतिशय आवेगानें तो म्हणाला, " सावित्री त्या साऱ्या गोष्टी ऐकून घेण्याइतका आज माझ्या अंगीं धीर नाहीं. समजून घ्यायची शक्ति नाहीं. आज मला स्पर्श करून तूं मला एवढीच एक सत्य गोष्ट सरळ सांग, कीं माझ्यावर तुझं प्रेम आहे कीं नाहीं ? "

या वेळीं त्याचीं सर्व इंद्रियें, त्याचें सर्व शरीरच आतुर उत्कंठेनें अगदीं परिपूर्ण होऊन गेलें होतें. एकदृष्टीनें तो सावित्रीच्या मुखाकडे पहात राहिला.

त्या अत्यंत व्यथित, उत्कंठित नेत्रयुग्माकडे दृष्टि जातांच सावित्रीला अगदीं भडभडून आलें, आणि तिच्या डोळयांतून सारखीं आंसवें गळूं लागलीं.

ती क्षणभरानें म्हणाली, " प्रेम आहे कीं नाहीं ! हंः ! नसतं तर कोणत्या बळामुळं तुमच्यावर माझा इतका जोर ? कशामुळं मला इतकं सुख, इतकं प्रचंड दुःख ? बाबूजी, बाबूजी ! म्हणूनच ना तुम्हाला इतकं मीं दुःख दिलं, पण कांहीं केल्या माझा हा देह तुम्हाला मी देऊं शकलें नाहीं ! "

असें म्हणून सावित्रीनें पदरानें आपले डोळे पुसले, आणि ती खालीं पहात गप्प उभी राहिली.

नंतर चार दोन क्षणांनीं ती पुनः बोलूं लागली, " आज मी तुमच्याजवळून कोणतीही गोष्ट लपवून ठेवणार नाहीं. अजूनही माझा हा देह नष्ट झालेला नाहीं खरा; परंतु तुमच्या पायांवर हा अर्पण करावा, अशीही याची योग्यता नाहीं. या देहाच्याच साधनानं, मी स्वेच्छेनं पुष्कळांचीं मनं भुलवलीं आहेत, हें मी कांहीं झालं तरी विसरूं शकणार नाहीं. या देहानं इतर कुणाचीही पूजा होऊं शकली, तरी तुमची पूजा होणार नाहीं. आज मी तुम्हाला तें सारं समजावून तरी कशी सांगूं ? जर माझं तुमच्यावर खरं प्रेम नसतं, तर अशा रीतीनं तुम्हाला आज मला सोडून जावं लागलं नसतं. "

असें म्हणून सावित्री वारंवार आपले डोळे पुसूं लागली.

सतीश कांहीं वेळ अगदीं स्तब्ध पडून राहिला होता. तो एकदम उद्गारला, " म्हणून आतां तुझा लाभ मला होऊं नये ? पण तुझं मन, सावित्री ? त्या साधनानं तर तूं कधीं कुणाला फसवायला गेली नव्हतीस ना ? मग ?—तें तर खास माझं आहे ना ? "

सावित्री तत्क्षणीं म्हणाली, " नाहीं–खास नाहीं. त्या साधनानं तर कुणाला भुलवावं, अशी मला कधींही इच्छा झाली नाहीं. तें अगदीं तुमचं–तुमचं आहे. त्या ठिकाणीं एक तुम्ही अन् तुम्हीच राजे ! "

असें म्हणून छातीवर हात ठेवून ती पुढें म्हणाली, " एका अन्तर्यामी परमेश्वरालाच माहीत, कुठंही मी कोणत्याही तऱ्हेनं राहिलें, तरी तुमची चिरकालची दासीच मी असेन ! "

सतीशनें पटकन् तिचा हात आपल्या उजव्या हातानें ओढून तसाच धरला, आणि तो म्हणाला, " परमेश्वराचं नांव घेऊन आज जे तूं मला सांगितलंस, तें मला अगदीं पुरे आहे. यापेक्षां मला अधिक कांहीं नको. "

सतीश ज्या तऱ्हेनें बोलत होता, ती ध्यानांत येतांच सावित्रीला पुनः शंका वाटूं लागली.

तोंच दरवाज्याबाहेरून बिहारी तिला हांक मारून म्हणाला, " आई, बाबूजी म्हणताहेत, कीं आतां मुळींच अवकाश नाहीं—"

" येतें हं—"

असें म्हणून सावित्री उठूं लागतांच तिला जबरदस्तीनें बसवून सतीश

म्हणाला, “ कधींही तुझ्याकडे मीं कांहीं मागितलं नाहीं—जातांना आज मला एक भिक्षा देऊन जा तूं, सावित्री !”

“ तुम्हाला देण्यासारखं माझ्याजवळ काय आहे? पण काय हवं, बोला?”

सतीश म्हणाला,“ मला एवढीच एक भिक्षा घाल. कधीं कुणीं जर आपणां-संबंधानं तुला कांहीं विचारलं, तर माझा आपणावरचा अधिकार तूं कबूल करशील? बोल?—”

सावित्रीला अगदीं हीच शंका होती.

परंतु त्याचा हा अद्‌भुत आग्रह पाहून तिला हंसू आल्यावांचून राहिलें नाहीं.

तिनें विचारलें, “ कां, मला सांगाल? साक्षीपुराव्याच्या जोरावर शेवटीं जबरदस्तीनं मला आपल्या घरांत कोंबणार आहां कीं काय?”

सतीश म्हणाला, “ तुझ्या स्वतःच्या अन्तःकरणांतला अन्तर्यामींच आपला साक्षीदार आहे. दुसऱ्या कोणत्याही साक्षीपुराव्याची आपणाला जरूरी नाहीं. अन् बाहेरच्या साक्षीपुराव्याच्या जोरावर तुला मी घरांत कोंबीन अशी तुला भीति वाटते. पण स्वतःच्या जोरावर आजही जर मीं तुला घरांत दामटून ठेवलं, तर माझं कोण काय करणार आहे?”

सावित्री यावर कांहीं बोलली नाहीं.

सतीश म्हणाला, “ सावित्री, कुठं वाटेल त्या ठिकाणीं, आपल्या खुषीप्रमाणं तुझं रहाणं मला बिलकुल पसंत नाहीं.”

क्षणोक्षणीं सावित्रीचा चेहरा अधिकाधिक फटफटित होत चालला होता. परंतु अशा स्थितींत सतीश अधिकच क्षुब्ध होईल, या भयशंकेनें ती गप्प राहिली.

सतीश म्हणाला, “ उपेनदादा आहे पथ्थराचा देव! तो जर रक्तमांसाचा देव असता, तर त्याच्या बरोबर मीं तुला कधींही पाठविलं नसतं! ठीक आहे—आज जातेस तर जा तूं, सावित्री! परंतु फार दिवस तिथं तुला ठेवणं मला कांहीं सोयीचं होणार नाहीं, अशी माझी कल्पना आहे.”

“ जशी तुमची इच्छा!”

असें म्हणून त्याला नमस्कार करून सावित्री तेथून बाहेर पडली.

## १७

सायंकाळीं साडेपांच वाजतां, लांकूड-कारखान्याला सुटी झाल्यानंतर दिवाकर आराकानच्या एका रस्त्यानें ‘ घरा’कडे निघाला होता.

धुळीनें, करवतीनें कापलेल्या लांकडाच्या भुशानें त्याचें सर्व शरीर अगदीं भरून गेलें होतें. गळ्याभोंवतीं उत्तरीय नव्हतें, अंगांतील सदरा अगदीं जीर्ण, मळकटून गेला असून, ठिकठिकाणीं शिवलेला होता. नेसलेलें वस्त्रही तसेंच होतें. उजव्या पायाच्या जुत्याची खोट झिजून जाऊन अगदीं सपाट झाली होती, आणि डाव्या पायाच्या आंगठ्याचा अग्रभाग जुत्याच्या समोरून चांगला दिसत होता.

दिवाकराला एकाएकीं पाहिलें असतां त्याला जणूं ओळखतांही येण्यासारखें नव्हतें !

साऱ्या दिवसांत त्याच्या पोटांत आज अन्नाचा कणही गेला नव्हता. अशा स्थितींत रखडत रखडत तो कामिनी घरवालीच्या वाड्यांत कसाबसा येऊन पोंचला. महिना चार रुपये भाड्याच्या तळमजल्यावरच्या एका खोलींत त्यांनीं बिऱ्हाड थाटलें होतें. लहानशा व्हरांड्यांत एका बाजूला त्यांचा स्वयंपाक होत असून दुसऱ्या बाजूला जळण, गोंवऱ्या, पाण्याची बालदी वगैरे संसारोपयोगी वस्तु दाटीवाटीनें कशा तरी ठेवण्यांत आल्या होत्या.

दिवाकराच्या पायांच्या चाहुलीनें शेजारच्या एका खोलींतून घरवाली बाहेर आली, आणि झंकारून म्हणाली, " झालं का स्वारीचं येणं ? बेश-बेश ! हा एकंदर प्रकार आहे तरी काय तुमचा, बाबूजी ! रांधप-वाढप नाहीं—न्हाण खाणं नाहीं—फक्त रात्रंदिवस आठीं प्रहर एक झगडा. कचामच अन् दांतचावणीची करकर ! हा म्हणजे आमच्या घरच्या लक्ष्मीला हांकून द्यायचा कारभार चालवला आहे तुम्हीं लोकांनीं ! "

म्लान मुखानें दिवाकर खालीं मान घालून उभा राहिला.

दुपारीं सुटी झाल्यावर तो जेवावयाला बिऱ्हाडीं आला, आणि किरणमयीशीं मोठा तंटा करून आंघोळ आणि जेवण न करतांच, तसाच आपल्या कामावर निघून गेला. कारखाना सुटल्यावर तो आतां परत घरीं आला होता.

परंतु त्याची ती शोचनीय अवस्था पाहूनही घरवालीचा राग कांहीं, शांत झाला नाहीं.

ती पुनः खेंकसून ओरडली, " तुझी कांहीं लग्नाची बायको नव्हे ही, बाबू, तर तिच्यावर इतकी जुलूमजबरदस्ती चालेल तुझी ! घरांतून बाहेर काढून आणलीस तिला. तसाच तिनंहि धर्म राखला आहे आपला ! आतां तुला कशी-बशी नोकरी लागली आहे—आतां मुकाट्यानं बाजूला सर बरं तूं ! आतां उगीच कां बाबा तिला छळतो आहेस असा ? पोरगी कशी नक्षत्रासारखी अन् मजबूत

हाडापेराची! पण अन्न-वस्त्राशिवाय अगदीं सुकं लाकुड होऊन गेलं आहे बिचारीचं!"

तरीही दिवाकर गप्पच होता.

चार दोन क्षण थांबून घरवाली पुनः म्हणाली, "नाहीं तर बिचारीला कांहीं कमी का होतं? पलीकडल्या वळणाच्या माथ्यावरला अडतवाला मारवाडीबाबू माझ्याकडे दररोज माणसं पाठवीत असतो. म्हणतो, सोन्यानं पोरीला नुसतं मढवून काढीन! अन् तुला तरी पोरीची काय कमतरता पडणार आहे रे? भाताची शितं टाकलीं, कीं कावळ्यांना काय तोटा? जा, मुकाट्यानं आतां बाजूला सर. माझी गोष्ट ऐक तूं. आज किती दिवस सांगतें आहें मी तुला. तुमचं आतां बनायचं नाहीं बिलकुल, कांहीं झालं तरी!"

दिवाकर आतां मात्र संतापला.

तिला थांबवून तो ताडकन् म्हणाला, "थांब-थांब, आमच्या बाबतींत लुड-बुड नको करूं उगीच तूं! पण तिचं दिखील मत असंच आहे काय? तर मग तूं तिचा मंत्री आहेस म्हणायचा!"

बरोबर याच क्षणीं किरणमयी आपल्या बिऱ्हाडांतून बाहेर आली.

परिस्थिति बिघडली, कीं माणसाची शारीरिक, मानसिक, वगैरे सर्व प्रकारची स्थिति किती लवकर आणि किती पूर्णपणें बदलते, हें पाहून माणसाची मति गुंग होऊन जाते!

आज तिच्याकडे पाहून एकदम कोण म्हणेल, कीं हीच ती सौंदर्याची पुतळी—किरणमयी?

सहा महिन्यांपूर्वी, एके दिवशीं समाज आणि धर्म यांचा उपहास करून, माणुसकीला पायांखालीं तुडवून, एका अज्ञान, परिणामाची कल्पनाही नसलेल्या तरुणाला आपल्या रूपाच्या आणि प्रेमाच्या मोहानें फसवून, सर्व प्रकारच्या अर्थापासून दूर करून किरणमयी त्याला इकडे घेऊन आली होती. परंतु त्याच्या प्रतारणेचा फांस आतां तिच्याच गळ्याला घट्ट बसला होता!

पापाबरोबर निष्फल खेळ खेळत असतां, त्याच दिवाकराच्या हृदयांतून आज वासनांचा जो राक्षस बाहेर पडला होता, आत्मरक्षणासाठीं त्याच्याशीं रात्रंदिवस युद्ध करतां करतां किरणमयी आज क्षतविक्षत झाली होती.

तिच्या मस्तकावरील केंस रुखे आणि अव्यवस्थित होते. तिचीं वस्त्रें जीर्ण आणि मलिन होतीं. चेहऱ्यावर एका प्रकारची शुष्क क्षुधा निराशेच्या शेवटच्या

सीमेपर्यंत पोंचलेली दिसत होती. पूर्वी तिच्या अंगांगांतून जें अपूर्व लावण्य निथळत असे, त्याचा मागमूसही आतां राहिला नव्हता, आणि ती भिकार सौंदर्य-शून्यता पहाणाऱ्याच्या डोळ्यांना पीडा मात्र देत होती.

दारिद्र्याची–अक्काबाईची ती प्रत्यक्ष मूर्ति हलुहलू येऊन व्हरांड्याच्या एका खांबाला टेंकून दोघांकडे पहात गप्प राहिली.

तिला पहातांच भुकेनें कावलेल्या दिवाकरानें एकदम प्रचंड आरडाओरडीला सुरवात केली.

त्याच्या बेशरमपणाला आतां सीमाच उरली नव्हती ! ज्याच्या तोंडांतून पूर्वी शब्दही येण्याची मारामार, तोच दिवाकर आज त्या इमारतींतील इतक्या लोकांसमोर अशी भाषा बेफामपणें बेलाशक उच्चारूं शकतो, या गोष्टीवर कोणा-चाही सहजासहजीं विश्वास बसणें कठिण होतें ! परंतु ती गोष्ट अगदीं खरी होती.

तो गर्जना करून म्हणाला, " काय ग वहिनी ! खरं का हें ! मारवाडी, मुसलमान, मग, मद्रासी यांचीच तुला आतां गरज ! नाहीं का ? हं–अस्सं ! त्यासाठीं रात्रंदिवस माझ्याशीं असा झगडा ! यामुळंच मी अगदीं दृष्टीला नकोसा झालों आहें तो ! "

हा विलक्षण गहजब कां, हें पहिल्यानें किरणमयीच्या कांहींच ध्यानांत येईना ! ती स्तंभित होऊन त्याच्याकडे पहातच राहिली.

परंतु दिवाकराला जबाब दिला घरवालीनें ! एक पाऊल पुढें येऊन, हात-वारे करीत, डोळे गरगर फिरवीत, तोंड वेडेंवांकडें करून ती ओरडली, " कां नाहीं हिला ते आवडणार, ऐकूं तरी ? आम्हीं कांहीं गृहस्थघरच्या बुड्ढ्या आजीबाई नाहीं, कीं एकाच पुरुषाला चावा घेत आम्हांला सारा जन्म पडून काढायला हवा ! बोलून चालून आम्हीं आहों सुखाचीं उडतीं कबुतरं !—सरळ सरळ वेश्या ! जिथं ज्याच्याजवळ आम्हांला सुख मिळेल, त्याच्याकडेच आम्ही जाणार ! यांत मेली लाजशरम कसली अन् लपवालपवी तरी कशासाठीं ? "

ओघातिशयानें दिवाकराच्या तळपायांची आग मस्तकाला गेली. तो एकदम धमकावणीच्या स्वरानें ओरडला, " थांब तूं रांडे ! जिला मी विचारतों आहें, तीच बोलूं दे. "

आतां मात्र घरवाली सुक्या दारूप्रमाणें एकदम भडकली !

फणकारून ती कडाडली, " माझ्याच घरांत राहून मला रांडे फोंडे शिव्य देतोस ? उतर—उतर माझ्या घरांतून एकदम ! "

दिवाकराचेंही माथें एकदम उसळलें !

सहा महिन्यांपूर्वी एकाद्या वाईट स्वप्नांतही त्याला कधीं कल्पना आली नसती, कीं एका अन्त्यज गणिकेच्या तोंडून भयंकर अपमान झाल्यावरही, कमर कसून आपण तिच्याशीं मी-तूं करीत इरीरीनें असा वाद करीत बसूं ! परंतु तो कांहीं आतां उपेन्द्र आणि सुरबाला यांच्या मायाममतेच्या शासनाखालीं लालनपालन होऊन वाढलेला दिवाकर नव्हता !

तेव्हां तोहि डोळे तांबारून आणि चेहरा लाल करून गरजला, " काय ? मलाच जा म्हणतेस घरांतून ? भाडं खात नाहींस तूं ? "

घरवालीही त्याच सुरांत धमकावून ओरडली, " अरे हाय रे भाडं देनेवाला ! थू : तुझ्या तोंडावर ! तुला फांसावर टांगायपुरती दोरी दिखील मिळत नाहीं का रे ? चल उतर माझ्या घराची पायरी आतांच्या आतां—नाहीं तर झाडू मारून हांकलून लावीन इथून ! "

" अच्छा, काढतों बाहेर घर तुझं ! "

अशी गर्जना करून, दातांवर दांत घांशीत जणूं एकाद्या उन्मादग्रस्त माणसाप्रमाणें धांवत जाऊन, दिवाकरानें स्तंभित होऊन उभी राहिलेल्या किरणमयीला जोरानें धक्का मारला.

सर्व दिवसभरच्या उपासानें आणि तहानेनें अगदीं गळून गेलेल्या किरणमयीला तो धक्का सहन झाला नाहीं. दिवाकरच्या धक्क्याबरोबर पहिल्यानें एका रंगाच्या रिकाम्या बालडीवर ती धाडकन् आपटली आणि तिथून उलटून गडगडत, गोवऱ्या भरलेल्या एका टोपलीवर पालथें तोंड होऊन पडली.

उन्मादानें वेडा झालेला दिवाकर गरजला, " चल उठ—चालती हो इथून कोण तुझा मारवाडी आहे—चल जा—उतर—"

असें म्हणून तो झटकन् खोलींत चालता झाला.

घरवालीनें किंचाळून ओरडून घर नुसतें डोक्यावर घेतलें.

कारखान्यांतून नुकतीच घरीं परत आलेली पुरुषमंडळी आपापल्या हाता तोंडावरील भुस्सा, धूळ वगैरे धुऊन स्वच्छ होत होती. घरवालीच्या आरडा ओरडीनें चकित होऊन हातांतले साबण तसेच टाकून ते धांवतपळतच तेथें आले

घरवाली नाकातल्या उंच स्वरानें फिर्याद दाखल करूं लागली, " पोरीला मारलंन् हो मेल्यानं ठार ! जीव घेतलान् अगदीं ! चांडाळ कसाई मेला !

मेल्या हरामखोराला चांगला मारून बदडून घरांतून द्या हांकलून बाहेर ! पुन्हां माझ्या घराची पायरी चढू देऊं नका. म्हारड्याला—"

घरवालीच्या सांगण्याप्रमाणें ती मंडळी एकजुटीनें दिवाकराच्या खोलींत शिरणार, तोंच माथ्यावरचा पदर दूर करून किरणमयी चटकन् उठून बसली, आणि दृढ स्वरानें म्हणाली, " तंटेझगडे कुणाच्या घरीं होत नाहींत ? माझ्या अंगावर त्यांनीं हात टाकला, तर तुमचं काय जातं ? चला जा आपापल्या घरीं ! "

असें म्हणून ती चटकन् उठली, आणि आपल्या खोलींत जाऊन तिनें दाराला कडी लावून टाकली.

आपला पराक्रम गाजवावयाची संधि अशा रीतीनें गेल्यामुळें हताश झालेली पुरुषमंडळी परत फिरली.

घरवाली मात्र बाहेरच उभी राहून गालावर हात देऊन उद्गारली, " चमत्कारच केलान् पोरीनं !—"

दरवाजा बंद करून किरणमयीनें आगपेटी काढून पहिल्यानें दिवा लावला. लांकडी फळ्यांची ती खोली अरुंद असली, तरी लांबलचक होती. एका बाजूला दोऱ्यांच्या खाटेवर दिवाकराचें अंथरुण असून दुसऱ्या टोंकाला लांकडी तक्तपोशीवरच किरणमयीचें अंथरुण गुंडाळून ठेवलेलें होतें. पायथ्याच्या बाजूला हांडा कळशी वगैरे पाण्याचीं भांडीं एकावर एक ठेवलीं असून त्याच कोंपऱ्यांत लांकडाच्या शिक्यावर भाताची हंडी, कढई, तवा वगैरे भांडीं लावून ठेवलीं होतीं.

हा त्या उभयतांच्या संसाराचा सगळा साजसरंजाम !

दिवा लावून किरणमयी दरवाज्याजवळच जमिनीवर स्थिरपणें बसून राहिली.

कोणाच्याही तोंडून शब्द निघत नव्हता. मान खालीं घालून दिवाकर खाटेवर मुकाट्यानें बसून राहिला होता.

अशा रीतीनें बराच वेळपर्यंत दोघेंही निःस्तब्धपणें बसून राहिल्यावर किरणमयी हळूहळू उठली, आणि दिवाकरासमोर येऊन सहज स्वरानें म्हणाली, " हंडींत भात शिजवून ठेवलेला आहे. वाढतें मी तो. उठा—चला या. जेवून घ्यां. "

दिवाकर रुद्ध कंठानें म्हणाला, " नाहीं. "

तो आतांपर्यंत मुकाट बसून रडत असावा, असें त्याच्या कंठस्वरावरून भासत होतें.

किरणमयी म्हणाली, " नाहीं–कां ? साऱ्या दिवसांत तोंडांत कांहीं घातलं नाहींत. आज खाल्लं नाहींत, तरी उद्यां हें खावं लागणारच. खाण्यापिण्यावर रागवून कुणाचंच चालत नाहीं. हातपाय तोंड धुऊन या—खातां येईल तेवढं खा. मी भात वाढतें. "

दिवाकर नुसत्या हुंकारानें देखील साद देऊं शकला नाहीं. लाजेनें, पश्चात्तापानें तो जळत होता. खरोखरच, किरणमयीवर त्याचें अलोट प्रेम होतें.

येथें आल्यापासून पुष्कळ दिवसपर्यंत बाहेरच्या माणसांना जरी कांहीं कळलें नाहीं, तरी आंत अतिशय गुप्तपणें आसक्ति आणि विरक्ति यांचा जो कठोर संग्राम उभयतांमध्यें दररोज चालला होता, त्याचा सर्वांत प्रचंड आघात दिवाकर मुकाट्यानें सहन करीत होता !

आज कित्येक दिवस, हा संग्राम उघड आणि अगदीं अनिवार होत चालला असतां, अशी क्षुब्धता पुष्कळ वेळ निर्माण झाली होती–नव्हती असें नाहीं. परंतु आजच्या पूर्वी कधींही दिवाकर स्वतःला विसरून असा निर्लज्जपणें पशुवत् वागला नव्हता. तसें म्हटलें तर, कोणत्याही कारणानें, कसल्याही अत्याचाराच्या रूपानें, आपण किरणमयीच्या अंगावर हात उगारूं शकूं–आणि खरोखरच आज आपण आतांच हात चालवलाही—हें अजूनही त्याच्या मनांत ठाव घेऊं शकत नव्हतें.

म्हणूनच खोलींत येतांच झोंपेंत स्वप्न पहाणाऱ्या एकाद्या माणसाप्रमाणें तो अंथरुणावर मुकाट्यानें नुसता बसून राहिला. परंतु थोड्याच वेळानें, आपला झालेला सर्व अपमान झाडून झटकून टाकून, त्या वाड्यांतल्या सर्व रहिवाश्यांच्या हल्ल्यापासून आणि छळापासून त्याचें रक्षण करण्याकरतां किरणमयीनें खोलींत येऊन दरवाज्याला जेव्हां कडी लावली, तेव्हांच जो एकदम पुनः भानावर आला.

किरणमयीचा आग्रह पुरा होतो न होतो :तोंच, जलतरंग ज्याप्रमाणें डोंगराच्या पायथ्याशीं आपटी खाऊन पडतो, त्याप्रमाणें दिवाकर त्या तरुणीच्या पायांवर एकदम येऊन उपडी पडला, आणि उसळून आलेल्या विलक्षण आवेगानें स्फुंद–स्फुंदून रडूं लागला.

पाय न सोडतां रडत रडत तो म्हणाला, " मी अगदीं पशु आहें. मला माफ करा, वहिनी ! "

किरणमयी कांहीं वेळ निर्विकारपणें स्तब्ध राहिली, आणि पूर्वीप्रमाणेंच शांत, सहज स्वरानें म्हणाली, " तुमचा एकट्याचा दोष नाहीं, भाऊजी! अशा प्रसंगीं सगळींच माणसं पशु बनतात. मी दिखील कमी पशु बनलें होतें, असं नाहीं, भाऊजी ! "

दिवाकर जोरानें मस्तक हलवून म्हणाला, " नाहीं नाहीं—दुसऱ्या कुणाशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. परंतु माझ्या आजच्या अपराधाचं प्रायश्चित्त कसं होणार, मला कळत नाहीं. मला तुम्ही तें समजावून द्या. प्राण देऊनही तें प्रायश्चित्त मी घेईन. "

किरणमयी म्हणाली, " अपराध कसला आला आहे त्यांत ? अशा प्रसंगीं माणुस माणसाचा खून दिखील करतो, हें तुम्हीं ऐकलं नाहीं का कधीं ? तुम्हीं तर मला नुसतं ढकलून दिलंत! अन् माझ्या हातून दिखील अपराध नाहीं का झाला ? सगळा तुमचाच का दोष ? पण जाऊं द्या ना आतां तें सारं. सगळ्या तक्रारी-फिर्यादींचा आज पार निकाल लागला! त्यांची पुढं आतां तुम्हाला कांहीं जरूर लागणार नाहीं—अन् मलाही नाहीं. आतां तुम्ही, हात पाय धुऊन या न् जेवायला बसा. मला आतां उभंही रहावत नाहीं बघा. "

दिवाकर हळूहळू उठून बसला. किरणमयीच्या कंठस्वरावरून तें त्याच्या पुरें लक्ष्यांत आलें होतें. अधिक बोलावें असेंही त्याला आतां वाटेना.

सगळ्या दिवसाच्या चरचरीत उपासानंतर दिवाकरानें आपलें जेवण लगबगीनें संपविलं, आणि तो आंचवावयाला बाहेर आला. त्याच्या मनाची ग्लानि आतां बरीच कमी झाली होती.

आंचवून संतुष्ट मनानें तो आंत आला, आणि आश्चर्यचकितच झाला!

किरणमयीनें त्याचें अंथरुण गुंडाळून ती वळकटी खाटेखालीं ठेवून दिली होती.

दिवाकरनें विचारलें, " कां ठेवलंत अंथरुण ? "

किरणमयी शांत, स्थिर स्वरानें म्हणाली, " अगोदर मी बोललें असतें, तर तुमचं जेवण कांहीं झालं नसतं.—म्हणून मी बोललें नाहीं. आजपासून आपणा दोघांची आतां गांठभेट कधीं व्हायची नाहीं. अजून रात्र कांहीं फारशी झाली नाहीं. आजची रात्र तुम्ही कालीच्या देवळांत जाऊन झोपा, जा. उद्यां फुरसतीप्रमाणें बिऱ्हाडासाठीं दुसरी एकादी जागा शोधून काढा. अन् या मुलखांत जर तुम्हाला रहायचं नसेल, तर परवां कलकत्त्याची बोट आहे.

मी तुम्हाला पैसे देतें–तिकडे जरूर निघून जा तुम्ही. मुख्य गोष्ट अशी, कीं मर्जीला येईल तसं करा. पण माझ्याशीं तुमचा कसलाही संबंध आतां रहायचा नाहीं, हें ध्यानांत ठेवा.”

अगदीं हतबुद्ध होऊन दिवाकर किरणमयीचें भाषण निःस्तब्धपणें ऐकत होता. किरणमयीचा कठोर, क्रूर, ममतेचा लेशही नसलेला एकएक शब्द, जड, कठिन पथ्थरांच्या तुकड्यांप्रमाणें, आपण उभयतांच्या मधोमध चिरकालची एक अभेद्य भिंत बांधून उभी करीत आहे, असें त्याला मनःपूर्वक वाटूं लागलं.

किरणमयी बोलावयाची थांबल्यावर दिवाकरनें स्वप्नांत गुंगलेल्या माणसाप्रमाणें विचारलें, “ अन् तुम्ही ? ”

किरणमयी म्हणाली, “ माझा बेत ऐकून तुम्हाला कांहींसुद्धां फायदा नाहीं. तरी पण या मुलुखांत जर तुम्ही राहिलां, तर उद्यां परवां तुम्ही ऐकालही ! ”

दिवाकर म्हणाला, “ तर मग घरवाली म्हणते तें खरं म्हणायचं. तो लेकाचा हिंदी मारवाडी–”

किरणमयी कठोर स्वरानें म्हणाली, “ होईलही तसं. पण कांहीं जरी झालं, तरी तुमच्या खांद्यावर भार टाकून मी अधोमार्गानं निघालें, म्हणून त्याच्या अगदीं शेवटच्या पायरीपर्यंत तुमचा आसरा घेऊनच गेलं पाहिजे, असा कांहीं अर्थ नाहीं ! मला आज मुळींच बरं वाटत नाहीं. मी आतां ताबडतोब झोंपणार आहें. आतां तुम्ही उगीच उशीर करूं नका. जा, चला–उद्यां सकाळीं तुमचे सारे जिन्नसपान्नस मी तुमच्याकडे पाठवून देईन. ”

दिवाकर म्हणाला, “ इतकी घाई ? आजरात्रीपुरतं दिखील तुम्ही मला इथं राहूं देणार नाहीं ? ”

किरणमयी म्हणाली, “ नाहीं. ”

दिवाकर क्षणभर तिच्याकडे पहात राहिला.

नंतर तो म्हणाला, “तर मग माझा सत्यनाश करण्याकरतांच का तुहीं या भयंकर संकटांत तूं मला ओढून आणलंत ? कधींच का माझ्यावर तुमचं प्रेम नव्हतं ? ”

किरणमयी म्हणाली, “ नव्हतं. पण तुमचा नव्हे, दुसऱ्या एका माणसाचा सत्यनाश मी करतें आहें, या भयानं मीं तुमची हानि केली. अन् खुद्द माझी तरी ?— पण जाऊं दे माझी गोष्ट ! पहिल्यापासून अखेरपर्यंत चुकच होत

गेली. अन् त्या चुकीकरतांच आज तुमचे पाय धरून तुमची मी क्षमा मागते आहें. ”

त्या निर्विकार पाषाणाच्या मूर्तीच्या मुखाकडे पाहून दिवाकरानें मोठा थोरला एक उसासा सोडला.

“ माझ्या सत्यनाशाची तुम्हाला कल्पना नाहीं, म्हणूनच तुम्ही इतक्या सहजासहजीं माझी क्षमा मागतां आहां ! परंतु या सत्यनाशापेक्षांही माझं प्रेम फार मोठं असल्यामुळंच मी या क्षणीं जिवंत आहें. नाहीं तर काळजाच्या चिंध्या होऊन मी मरून गेलों असतों. पण एक गोष्ट तुम्ही मला नीट समजावून द्या. ज्याच्या आश्रयाला तुम्ही जाणार आहां, त्याच्यावर दिखील कांहीं तुमचं प्रेम नाहीं. कदाचित् त्याची तुमची ओळख दिखील नसेल, तरीही मला सोडून तुम्ही तिकडे कां जातां आहां ? मीं तर कधीं कसलंही तुमचं अनिष्ट केलं नाहीं ! पण खरोखरच का तुम्ही जाणार ? ”

किरणमयी मान हलवून म्हणाली, “ खरोखरच जाणार—”

नंतर कांहीं वेळ ती खालीं पहात स्तब्ध राहिली.

हतबुद्ध होऊन दिवाकरही गप्पच होता.

नंतर वर नजर करून किरणमयी म्हणाली, “ नाहीं. आज मी तुमच्यापासून कांहींसुद्धां लपवून ठेवणार नाहीं. मी देव मानीत नाहीं, स्वर्ग-नरक वगैरे कांहीं कांहीं मानीत नाहीं—हीं सर्व माझ्या दृष्टीनं निव्वळ पोकळ—अगदीं असत्य आहेत ! मी मानतें फक्त इहकाल अन् हें माझं शरीर ! सगळ्या जगांत केवळ एका व्यक्तीसमोर मीं एके दिवशीं हार मानली होती—अन् ती म्हणजे सुरबाला ! पण जाऊं दे त्या गोष्टी ! अगदीं खरं खरं तुम्हाला मी सांगतें, भाऊजी ! मी मानतें फक्त एक इहकाल अन् हा सुंदर देह ! पण माझं मेलीचं दुष्ट चांडाळ नशीब असं, कीं याच्याच साधनानं अनंगासारख्या क्षुद्र फुलपांखरालाही एकदां मी भुलवायला पहात होतें ! ”

असें म्हणून लहानसा एक निःश्वास टाकून किरणमयी स्तब्ध बसली.

दोन एक मिनिटें ती याप्रमाणें बसून राहिली होती.

नंतर तंद्रेंतून जागी झाल्यासारखें करून ती म्हणाली, “ त्यानंतर ज्या दिवशीं खरोखरच मीं प्रेम करायला लागलें, भाऊजी, त्याच दिवशीं माझं हें समग्र शरीर इतके दिवस अशा रीतीनं याकरतां उत्कंठित, आतुर होऊन अगदीं वाट पहात कां राहिलं होतं, हें मला कळून आलं ! ”

दिवाकरानें अत्यंत आतुर स्वरानें प्रश्न केला, " कुणावर तुमचं प्रेम जडलं होतं, वहिनी ? "

किरणमयी किंचित् हंसली, आणि जणूं काय स्वतःशीच बोलूं लागली, " माझ्या या प्रेमाला प्रत्यक्ष स्वर्गांत दिखील जोड नाहीं. अशी माझी पूर्ण कल्पना होती. परंतु माझा तो अहंकार टिकला नाहीं. त्या दिवशीं महाभारताच्या गोष्टीच्या निमित्तानं ज्या तरुणीसमोरून मीं हार खाऊन आलें, तिच्याच समोर पुन्हांही मला हार खावी लागली. प्रेमाच्या द्वंद्वांत माथं खाली घालूनच मला परत यावं लागलं. माझा जबरदस्त मोह हां हां म्हणतां नष्ट झाला, अन् सौंदर्यानं त्याला मी भुलवूं शकेन, ही गोष्ट कालत्रयींही शक्य नाहीं, हें मला स्पष्ट दिसून आलं ! "

आपल्या मनांतील निबिड अंधकार जणूं काय स्वच्छ होत चालला आहे, असें एकवार दिवाकराला वाटलें.

किरणमयी बोलूं लागली, " एक विशेष गोष्ट त्या मुलीपासून घ्यावी असा मला विलक्षण लोभ सुटला होता. अन् ती म्हणजे माझ्या पतींवर प्रेम करणं ! कदाचित् ती गोष्ट मी उत्कृष्ट रीतीनं शिकलेंही असतें. पण माझं दैव इतकं नष्ट, कीं तो रस्ताही मला दोन दिवसांत बंद झाला. हं, ठीक गोष्ट ! तुमच्यावर माझं प्रेम कां जडलं नाहीं, असं मला तुम्हीं विचारलंत, भाऊजी ! पण कोण म्हणतं नव्हतं जडलं म्हणून ? जडलं होतं तर काय झालं ! पण वयानं मी तुमच्यापेक्षां मोठी. म्हणून ज्या दिवशीं तुमचे उपेनदादा माझ्या हातीं तुम्हाला सोंपवून गेले, त्या दिवसापासून पाठच्या भावाप्रमाणं मी तुमच्यावर प्रेम करूं लागलें. अन् म्हणूनच तर हे सहा महिने स्वतःच्याच फसवणुकीनं माझ्या मनाचा अगदीं चुरा होऊन गेला आहे ! तुमच्या डोळ्यांतील भुकेनं, तुमच्या तोंडच्या प्रेमनिवेदनानं माझ्या सर्वांगावर शरमेचे अन् तिटकाऱ्याचे शहारे कसे फुलून निघत होते, हें एक दिवसही तुमच्या ध्यानांत कसं आलं नाहीं, भाऊजी ? जा आतां तुम्ही—माझ्याजवळून दूर सरका. पाप-पुण्य, स्वर्ग-नरक मला कांहीं कांहीं नसलं तरी चालेल; पण या देहावरची तुमची असावलेली नजर आतां मला बिलकुल सहन होत नाहीं. "

असं म्हणून अंथरुणाची वळकटी उचलून आणून तिनं ती दिवाकरापुढं टाकली.

नंतर ती म्हणाली, " आतां तुमच्यासंबंधानं मला विश्वास राहिला नाहीं. माझा दुसरा एक लहान भाऊ अजूनही हयात आहे. त्या सतीशच्या तोंडाकडे पाहून मला चिरकाल तुमच्यापासून आत्मरक्षण केलं पाहिजे. जा, चला तुम्ही—"

दिवाकर नंतर एक अक्षरही बोलला नाहीं. त्यानें चटकन् वळकटी उचलली आणि तो तेथून बाहेरच्या अंधारांत निघून गेला.

## १८

सकाळच्या वेळीं, किरणमयी श्रान्त गळलेल्या देहानें काम करीत होती. इतक्यांत कामिनी घरवाली येऊन दरवाजाच्या उमरठ्याशीं उभी राहिली, अन् तिच्याकडे पहात गालांतल्या गालांत हंसत म्हणाली. " गेला का पोरटा? अलाबला टळली! काल मेल्यानं केवढा अनर्थ केलान् तो! मला अगदीं मारायलाच आला मेला! अरे, बाई ठेवायचं तुझं काम का मेल्या? बकरीं जर धान्य मळतीं, तर लोकांना बैल पोसावे लागलेच नसते!"

किरणमयीनें वर पाहून विचारलें, " कोण म्हणालं, गेलं म्हणून ते?"

घरवाली डोळे गरगर फिरवीत हंसत हंसत म्हणाली, " चल जा–उगाच ढंग करायला नको आहेत! कोण म्हणालं म्हणे! मी जर स्वतःच घरवाली आहें, तर मला आणखी दुसरं कोण सांगायला हवं आहे? स्वतः कान लावून ऐकलं आहे मीं. असं जर नसतं, तर इतके दिवस हें घर मला शाबूत ठेवतां आलं असतं का? पांच भुतांनीं खाऊन टाकून पार विल्हेवाट लावून टाकली असती कीं घराची! ठाऊक आहे?"

कांहीं न बोलतां किरणमयी आपलें काम करूं लागली.

तिच्याकडून कांहीं उत्तर येत नाहीं, असें पाहून कामिनी स्वतःच बोलूं लागली, " किती दिवस तरी सांगतें आहें तुला मी सूनबाई, कीं एकदांची ही बला दे हांकलून घरांतून! तर नाहीं—म्हणे राहूं दे—जाईल कुठं तो? अरे, तो मेला कुठं जाईल, याची पंचाईत आम्हांला कशाला? इतका विचार करून माणसाचं चालायचं नाहीं बाई! खा, पी, चैन कर—सोनं जडाव अंगावर चढव, अन् संगतीं पिरीतही कर. तर नाहीं! हें कोणत्या मुलुखाचं पिरीत करणं ग पोरी?"

किरणमयीनें एकवार वर दृष्टि करून तिच्याकडे पाहिलें, आणि पुनः तिनें मान खालीं घातली.

घरवालीला वाटलें, आपला दूरदृष्टीचा उपदेश शेवटीं फळाला आला! गर्वभरानें ती बोलूं लागली, " अन् ही काय पोरी, तुझी पिरीत करायची वेळ? ऐन जवानींतली पोरगी तूं—फक्त दोन्ही हातांनीं लुटावं, एवढीच कामगिरी तुझी! नंतर दोन पैसे हाताखालीं घालून, चांगली दुरुस्त होऊन बस, अन् मग त्या वयांत खुशाल पिरीत कर ना—कोण तुला मना करायला येतं आहे? हातीं पैसा असला, कीं आसावलेलीं कारटीं काय, हवीं तेवढीं! किती विसा हवींत तुला? दोन पायांवर तुला बघ मग उठतांही यायचं नाहीं! "

किरणमयी विमनस्क झाली होती. सगळं कांहीं तिच्या कानांत शिरलं कीं नाहीं कोण जाणे! परंतु ती एक अक्षरही बोलली नाहीं.

घरवालीचें स्वतःचें घरकाम अजून थोडेंबहुत राहिलें होतें. तेव्हां अधिक उशीर न करतां, दुपारच्या वेळीं पुनः यावयाची इच्छा प्रकट करून ती तेथून निघून गेली.

घरवालीच्या हवेलींतील सर्व लोक बहुधा कारखान्यांतच नोकरी करीत. सकाळीं ते कामावर जात, दुपारच्या वेळीं सुटी झाली म्हणजे घरीं येत, अन् स्नान, खाणें-पिणें आटोपून पुनः कामावर जात, तें संध्याकाळापूर्वी थोडा वेळ त्या दिवसाचें काम संपवून, घरीं परत येत.

आजही सगळी मंडळी कामावर निघून गेल्यावर दोन अडीच वाजल्यानंतर घरवाली येऊन पुनः किरणमयीच्या दरवाज्यांत उभी राहिली.

ममतेच्या स्वरानें तिनें विचारलें, " झालं का खाणंपिणं, सूनबाई? काय रांधलंस आज? "

किरणमयीनें आज चुलींत विस्तव देखील घातला नव्हता! परंतु मान हलवून घरवालीच्या प्रश्नाला तिनें उत्तर दिलें, " हां, झालं. ये—बस. "

घरवालीनें दरवाजापाशींच आसन ठोकलें.

खोलीशीं येतांच, किरणमयीचें मन आज ठीक नाहीं, हें तिच्या लक्षांत आलें होतें.

म्हणूनच सहानुभूतीच्या कोमल स्वरानें ती म्हणाली, " अग, होईल हो पोरी! दोन दिवस मन खराब झाल्याशिवाय का रहाणार आहे! एकादं गुरूं किंवा पक्षी जर आपण बाळगला, तर त्याच्यासाठीं मन कसंसंच होतं आपलं.

मग हा तर माणुस ! कशा रीतीनं कां होईना, पण सहा सात महिने घर-संसार तर त्याच्याबरोबर करावा लागला ना तुला ? अग, फार तर दोन दिवस ! तीन दिवसांनीं कुणीं नुसतं नांव दिखील वेत नाहींत, सूनबाई ! या डोळ्यांनीं किती किती उदाहरणं पाहिलीं आहेत अशीं ! ”

किरणमयी जोर करून कृत्रिमपणें हंसली, आणि म्हणाली, “ तें तरी खरंच आहे ! ”

घरवालीनें तोंड वेडींवांकडीं करीत, डोळे मुरडीत पडसाद दिला, “ खरं नाहीं ? तूंच सांग बरं, पोरी, खरं कीं खोटं तें ! पुन्हां नवं माणूस येऊं दे–नव्यानं पुन्हां हौसमौज कर-बस्स ! सगळं कसं अगदीं ताळ्यावर येतं कीं नाहीं पहा ! काय, मी म्हणतें हें खरं कीं नाहीं ? ”

किरणमयीनें मान हलवून साद दिली खरी; परंतु या गळेपडूपणानें लाद-लेल्या आपुलकीनें तिचें मन क्षणोक्षणीं अधिकाधिक बिघडत चाललें होतें.

मध्येंच एकदम, डोळे आणि चेहरा आकुंचित करून आणि कंठस्वर खाल-वून घरवाली म्हणाली, “ हं, छान आठवण झाली बरं का, सूनबाई ! त्या पागल झालेल्या मारवाड्याला सकाळींच निरोप पाठवला होता मीं. बेट्याला उशीर कांहीं सहन होईना अगदीं ! म्हणाला, जनलोक कामावर गेले, कीं दुपारींच अडीच तीन वाजतां येऊं आपण ! कुणाला ठाऊक मेला आतांच येतो कीं काय तो ! ”

किरणमयीनें त्रासून कपाळाला आंठ्या घालून विचारलें, “ इथं कशाला बाई ? ”

तिचा हा उद्गार मोठ्या कौतुकाचा मानून कृत्रिम कोपानें घरवाली म्हणाली, “ आः ! काय ढंग करते आहे मेली ! तो इथं येणार नाहीं, तर काय तूं त्याच्याकडे जाणार आहेस वाटतं ? तुझ्या एकएक गोष्टी ऐकल्या, कीं हंसतां हंसतां पोट दुखायला लागतं बाई ! ”

असं म्हणून शुष्क हास्याची अगदीं उबळ आल्याप्रमाणें दाखवून ती किरण-मयीच्या अंगावरच पडली.

किरणमयी कांहींच बोलली नाहीं–स्वतःला सांभाळून ती किंचित् बाजूला सरकली. घरवालीनें आत्मियतेच्या प्रदर्शनाच्या भरांत आज कमालच चालवली आहे, या कल्पनेनें तिला पराकाष्ठेचा तिटकारा वाटूं लागला. त्या हलकट बाईच्या तोंडचे अगदीं जिवलग सखीसारखे ते घाणेरडे बोल तिच्या कानांत तीरासारखे

घुसून तिच्या मनाची आगीआग होऊं लागली. तिच्या हृदयामध्यें अजूनही जी ' स्त्री ' मूर्च्छित झाल्यासारखी पडली होती, तिची मूर्च्छा या एका शब्दाच्या लाथेसरशीं एकदम भंग पावली, आणि क्षणार्धांत सभ्य महिलेचा लोप पावलेला मानसंभ्रम तिच्या हृदयांत पुनरपि दर्प भरानें उसळून उठला !

तरीही मोठ्या शिकस्तीनें आत्मसंयमन करून किरणमयी गप्पच राहिली.

परंतु यापैकीं कांहींही प्रकार घरवालीच्या ध्यानांत आला नाहीं. ती आपल्याच चालू ढंगांत पुढें म्हणाली, " तूं स्वतःच बघशील, सूनबाई ! फक्त सहा महिन्यांच्या अवकाशांत तुझ्या संसाराची कळा जर तुझ्या योग्यतेला हवी तशी जुळवून आणली नाहीं, तर माझं कामिनी घरवाली हें नांवच देईन बदलून ! फक्त तूं एक माझ्या सांगण्याप्रमाणं वाग कीं बस्स ! दुसरं कांहीं दिखील नको मला ! "

किरणमयीला वाटूं लागलें, ही राक्षशीण आपल्या कानांतील सगळे स्नायु आणि शिरा जणूं जळजळीत सांडशीनें पिळून ओढून बाहेर काढीत आहे !

परंतु तिचा नुसता निषेध करावयालाही तिच्या तोंडून शब्द फुटेना ! केवळ स्तब्ध बसून ती तिचे घाणेरडे बोल ऐकूं लागली.

घरवाली पुढें म्हणाली, " हिंदुस्थानी मारवाडी आहे तो. चार पैसे बाळगून आहे. तुझ्या नादाला लागला आहे, तोंवर दोन्ही हातांनीं त्याला पिळून अगदीं साफ करून टाक. पुढं मग जायचं असलं जहान्नममध्यें तर खुशाल जाऊं दे बेट्याला ! हवे तेवढे येतील भुंगे तुझ्या भोंवतीं पिंगा घालायला ! तूं ही अशी होऊन राहिली आहेस म्हणून–नाहीं तर तुझं रूप का सामान्य आहे, सूनबाई ? "

इतक्यांत बाहेरच्या व्हरांड्याच्या टोंकांकडून भसाड्या गळ्याची हांक ऐकूं आली, " घरवाली—"

" ही आलें हो—"

अशी हांकेला साद देत घरवाली बाहेर जावयाला निघते आहे, तोंच दोन्ही हात पुढं करून, तिचा पदर घट्ट धरून किरणमयी दृढ स्वरानें म्हणाली, " नाहीं–नाहीं. इथं अगदीं बिल्कुल नको हं–या खोलींत कुणी नको यायला—"

घरवाली हतबुद्ध झाल्याप्रमाणें तिच्याकडे पहातच राहिली.

" कां नको ? कोण आहे इथं ? "

किरणमयी पूर्ववत् दृढ स्वरानें उत्तरली, " कुणी असो नाहीं तर नसो–पण इथं नको–कांहीं झालं तरी नको—"

त्या येणाऱ्या माणसाच्या पायांची चाहूल अधिकाधिक जवळ येऊं लागली.

घरवाली जणूं चकितच होऊन उद्गारली, " तूं कांहीं कुणा गृहस्थघरची मुलगी नाहींस, सूनबाई ! पुरुषमाणूस तुझ्या घरीं येणार, बसणार ! त्यांत भय कसलं बाई ? तूं तर आहेस वेश्या ! "

किरणमयी एकदम किंचाळून ओरडली, " कोण मी ? कोण ? मी वेश्या ? "

तिला वाटूं लागलें, वज्राग्नीची चमक पायांच्या तळापासून निघून आपलें ब्रह्मरंध्र भेदून पार बाहेर पडून गेली !

किरणमयीचे लालबुंद झालेले डोळे पाहून आणि तीव्र कंठस्वर ऐकून घरवाली विस्मयानें स्तंभितच होऊन गेली ! त्रस्त, विरक्त ती स्वरानें म्हणाली, " वेसवा नव्हेस तर कोण तूं, ऐकूं दे तरी ! तुझीं हीं ढोंगसोंगं पाहिलीं, कीं अंगाला नुसती आग लागते माझ्या ! आतां आम्ही जशा, तश्शीच तूं अगदीं–समज-लीसना ? सज्जन गृहस्थ आला आहे, त्याची खोलींत नीट उठाबस कर. "

या ' सज्जन गृहस्था'कडून घरवालीनें पैशांचा चांगला चाबा मारला होता, आणि पुढेंही तिला त्याच्याकडून बराच लाभ होण्याची आशा होती.

सज्जन गृहस्थ दरवाज्याशीं येऊन उभा राहिला, आणि दांत बाहेर काढून हंसत हंसत म्हणाला, " क्या वाडीवाली, खबर सब ठीक तो ? "

घरवालीनें पदर ओढून घेऊन दिखाऊ विनयानें म्हटलें, " आपकी मेहरबानी, बाबूजी ! जा, खोलींत जाऊन बसा. मी पानपट्टी आणतें तयार करून—"

' बाबूजीं'नीं परत दांत काढले.

घरवालीही हंसून म्हणाली " आजपासून सारं घरदार अगदीं तुमचं, बाबूजी ! पण घर छान, मोठ्या थाटामाटानं सजवून द्यायला हवं हं—आधींच सांगून ठेवतें आहें तुम्हाला—"

" आच्छा अच्छा ! सब कुछ होवे ! "

असें म्हणून तिळमात्र संकोच न करतां तो माणुस खोलींत शिरून खुशाल खाटेवर जाऊन बसूं लागला.

किरणमयीच्या स्नायुशिरांची सहिष्णुता जणूं पोलादापेक्षांही दृढ ! त्यामुळेंच अजूनपर्यंत त्यांनीं कसाबसा दम धरला होता ! परंतु आतां तें अशक्य झालें. तिच्या रूपयौवनाच्या हा अपरिचीत हिंदुस्थानी ग्राहक तिच्या खोलींत शिरला

मात्र, तोंच तिचें सारें चैतन्य हरपून, वावटळीनें मोडलेल्या केळीप्रमाणें ती एकदम जमिनीवर धाडकन् कोसळली.

मारवाड्यानें चमकून वळून मागें पाहिलें. या आकस्मिक विद्युत्पातानें तो हबकूनच गेला !

घरवालीनें ओरडून किंचाळून सारा वाडाच डोकीवर घेतला. त्यामुळें वाड्यांतील सगळ्या बायांची कच्ची झोंप उडून तत्क्षणीं त्या धांवतच तेथें आल्या, आणि कोणी पाणी, कोणी पंखा घेऊन त्या अभागिनीची शुश्रूषा करण्यांत मग्न होऊन गेल्या.

आणि दरवाजाच्या उमरठ्याशीं बसून घरवाली तार स्वरानें सारखी घोषणा करूं लागली, "या कामांत माझे काळ्यांचे पांढरे झाले बाई! पण आजपावेतों असा ढंग अन् इतका फाजील नखरा मीं कुठं कुठं पाहिला नव्हता! अन् अजूनही रसिक नागर घरीं आला असतां दांतखिळी बसवून घ्यायची विद्या मीं शिकून घेतली नाहीं !"

इतक्यांत या दुर्घटनेमध्येंच दुसऱ्या एका मोठ्या घोटाळ्याची भर पडणार, असें दिसूं लागलें.

कोणी एक नवाच बाबू बाहेरच्या दरवाज्याशीं आला असून तो 'दिवाकर आणि वहिनी' यांचीं नांवें घेऊन मोठमोठ्यानें आरडाओरड करतो आहे, अशी बातमी तेथें येऊन थडकली.

ही बातमी घेऊन येणाऱ्या गड्याकडून त्या 'बाबू'ची माहिती घरवाली काढून घेत आहे, तोंच एक चांगला उंचनिंच तगडा जवान एक मोठी जंगी चामड्याची बॅग डाव्या हातीं सहज पेलल्यासारखी घेऊन दरवाज्याशीं येऊन हजर झाला.

येतांच गंभीर स्वरानें त्यानें हांक मारली, "वहिनी—"

त्याच्या उजव्या हाताच्या अंगुलींतील अत्यंत तेजस्वी हिऱ्याची आंगठी सूर्यकिरणांत एकदम झगमगली.

तत्क्षणीं घरवालीनें एकदम आदरानें उठून त्याला नम्र स्वरानें विचारलें, "कुणाला शोधतां आहां, बाबूजी ?"

"दिवाकर रहातो इथं ?"

घरवाली उत्तरली, "नाहीं."

" माझी वहिनी ? किरणमयीवहिनी आमची ? कोणत्या कोठडींत रहाते ती ? "

घरवालीबरोबरच आणखींही दोघीचौघी जिज्ञासु बाया माना बाहेर काढून पहात होत्या. त्यांपैकीं एकजण म्हणाली, " ही इथं तर झीट येऊन पडली आहे ती ! "

" झीट येऊन ? अं ? पाहूं पाहूं—"

असें ओरडत तो नवाच आलेला बाबू गर्दी बाजूला सारून तीनच उड्यांत तिच्याजवळ येऊन ठेपला.

मूर्च्छित झालेली किरणमयी अजूनही जमिनीवरच पडून राहिली होती. तिच्या सर्व अंगावरून पाण्याचे ओघळ निथळत होते. डोळे झांकलेले असून केंसांच्या बटा ओल्याचिंब होऊन विसकटून पसरल्या होत्या. तिच्या अंगावरील वस्त्रही सैल झालें होतें.

आलेला हा बाबू दुसरा तिसरा कोणी नसून सतीश होता.

त्याची नजर पहिल्यानें गेली ती त्या हिंदुस्थानी मारवाड्यावर !

इतक्या अवधींत तो किरणमयीच्या जवळ येऊन तिच्याकडे अनिमेष दृष्टीनें पहात होता.

सतीश चकितच झाला. अतिशय क्रुद्ध होऊन तो ओरडला, " ऐ, तुम कोन हाय ? "

त्याच्या वतीनें घरवालीनें जवाब दिला.

" आहा ! हे तर आमचे मारवाडी शेठसाहेब, बाबूजी ! हे इथं—"

परंतु तिचें परिचय करून द्यावयाचें काम पुरें होण्यापूर्वींच सतीश ' शेठ 'जींना दरवाजा दाखवून ओरडला, " जाव-बहार जाव—"

मारवाड्याजवळ पैसा होता. आणि विशेषतः तो होता नवा प्रणयी ! जमलेल्या या एवढ्या बायांच्या घोळक्यांत हीनपणाची कबुली देणें त्याला अशक्य होतें !

अर्थात् छातींत शक्य तितकें धैर्य एकवट करून तो म्हणाला, " आं ? काहे ? "

सतीश एकदम भडकला. जमिनीवर एकदम जोरानें पाय आपटून तो धमकावून ओरडला, " बहार जाव एकदम, उल्लू ! "

त्याच्या या धमकावणीनें तेथली सगळी मंडळीच काय, पण सर्व वाडाच एकदम हादरून गेला !

आणि मग तोंडांतून एक शब्दही न काढतां शेठजींनीं एकदम तेथून पलायन केलें !

सतीशनें पहिल्यानें किरणमयीच्या अंगावरचें शिथिल झालेलें वस्त्र पुनः नीटनेटके केलें आणि स्वतःच पंखा हातीं घेऊन तो तिला जोरजोरानें वारा घालूं लागला. त्या दोघांभोंवतीं घोळका करणाऱ्या बायाही आपापसांत बोलत विचित्र कलरव करूं लागल्या.

त्यांच्या त्या निरनिराळ्या भाषणांवरून थोड्याच अवकाशांत सतीशला किती तरी गोष्टी सहज कळून आल्या.

घरवाली तर विस्मयानें थक्कच झाली ! किरणमयीसंबंधानें तिचा विशेष आक्षेप होता आणि ती तो वारंवार प्रकटही करूं लागली, " माझ्या बापाच्या आजाच्या वेळेपासून मीं अशी विलक्षण बायको पाहिली नाहीं बाई ! वेसवेला वेसवा म्हटल्यामुळं तिनं डोळे कां फिरवावे अन् दांतखिळी बसवून झिट येऊन कां पडावें, हें मला कांहीं कळत नाहीं. "

सुमारें वीस एक मिनिटांनीं किरणमयी शुद्धीवर आली, आणि माथ्यावर पदर ओढून घेऊन उठून बसली.

चार दोन क्षण एकदृष्टीनें सतीशकडे पाहून ती क्षीण कंठानें एकदम उद्गारली, " भाऊजी—"

सतीशनें खालीं वांकून तिला नमस्कार केला, आणि तिच्या पायांची धूळ मस्तकाला लावली.

तो म्हणाला, " होय, वहिनी ! मीच तो. पण हा एकंदर प्रकार काय आहे, तें मला सांगा बरं. जशीं वस्त्रप्रावरणं, तसंच घरदार ! तशीच एकंदर संसाराची कळा ! ही सतीशची बहीण, असं म्हणेल तरी कोण ? जणूं काय कुठली तरी एक अनाथ वेडी आहे ! पोरकटपणा आतां खूब खूब झाला, वहिनी ! आतां उद्यांच्या बोटीनं तुम्ही घरीं चला. "

किरणमयी खालीं पहात स्तब्ध बसली होती.

सभोंवतालच्या बायांना उद्देशून सतीश म्हणाला, " तुमची गरज नाहीं— तुम्ही आतां चला आपल्या घरीं. "

पाषाणाच्या मूर्तीप्रमाणें किरणमयी तशीच निश्चल बसून राहिली होती. तिच्या अन्तर्यामीं काय चाललें होतें तें अन्तर्यामी परमेश्वरालाच ठाऊक! परंतु त्यापैकीं लेशमात्रही बाहेर व्यक्त झालें नाहीं!

जमलेल्या बाया निघून गेल्यावर सतीश म्हणाला, "तो मुवर कुठं आहे, वहिनी?"

किरणमयी वर न पहातांच उद्गारली, "इतके दिवस ते इथंच होते. काल रात्रीं दुसरीकडे गेले."

"कां?"

"मीं निघून जायला सांगितलं म्हणून."

"पण बोलावलं तर येईल कीं नाहीं?"

"बोलावून पहातें."

असें म्हणून किरणमयी हळुहळू बाहेर गेली, आणि वाड्यांतल्या गड्याला कालीच्या देवळांत पाठवून ती परत आली.

नंतर ती म्हणाली, "तुम्ही याल ही स्वप्नांत दिखील कल्पना नव्हती, भाऊजी!"

सतीश म्हणाला, "पण मी इथं आलों, ही गोष्टही माझ्या अगदीं स्वप्नांतल्या कल्पनेच्या बाहेर नाहीं का घडली, वहिनी?"

"तें खरं."

असें म्हणून किरणमयी पुनः खालीं मान घालून बसून राहिली.

किती तरी गोष्टी कळून घ्यावयाची तिला प्रखर जिज्ञासा व्हावी, हें अगदीं सहज होतें. आपल्या घरच्या मुक्तामोलकरणीपासून माहिती मिळवून सतीश येथें आला, हें समजणें कांहीं फारसें कठीण नव्हतें; परंतु इतक्या कालावधीनंतर, अकस्मात्, आपला शोध काढून आपणाला परत घेऊन जाण्याकरतां त्यानें इतक्या दूर यावें, यांतील यथार्थ हेतु काय असावा, याचें अनुमान करणें खरोखरच अतिशय कठिण होतें.

परंतु आपल्या आगमनाचा हेतु सतीशानें स्वतःच हळूहळू तिला सांगितला.

तो म्हणाला, "उद्यां बोट आहे. तुम्हाला घेऊन जायला आलों आहें मी, वहिनी!"

किरणमयी वर पाहून म्हणाली, "उपेनभाऊजींनींच पाठवलं ना तुम्हाला? ठीक आहे. घेऊन जा दिवाकरना तुम्ही. तमच्याबरोबर त्याला जातां यावं, एवढीच माझी प्रार्थना आहे."

सतीश म्हणाला, " केवळ दुसऱ्याच्या हुकमाची तामिली करायलाच कांहीं मी इतक्या दूर आलों नाहीं. माझ्या स्वतःच्या तर्फेनंही खूब टोंचणी आहे कीं ! तर मग इतक्या अवधीनंतर कां, असा तुम्हाला प्रश्न पडला असेल ! खबरच मिळाली नाहीं, हें तुमच्या प्रश्नाचं उत्तर ! मधल्या वेळांत बाबा गेले मीही जवळजवळ जायला निघालोंच होतों–कदाचित् तुमची भेटही झाली नसती ! "

किरणमयीनें वर नजर करून पाहिलें.

तिच्या त्या नेत्रयुगाच्या द्वारें विश्वांतल्या सर्व स्नेहार्द्र ममतेचा सतीशच्या सर्वांगावर वर्षाव होऊं लागला !

चार दोन क्षणांनीं करुण स्वरानें किरणमयीनें विचारलें, " मी कुणाकडे जाऊं, भाऊजी ? माझं कोण आहे ? "

" माझ्याकडे या तुम्ही, वहिनी ! मी आहें ना ? "

" परंतु मला आसरा देऊन तुमचं बरं होईल का ?"

सतीश म्हणाला, " तुम्हाला काय आठवत नाहीं, वहिनी, कीं ज्या दिवशीं पाठचा भाऊ म्हणून तुम्हीं मला संबोधलंत, त्या बऱ्याच कालापूर्वीच्या दिवशीं, या बऱ्याचा अन् वाईटाचा कायमचा निकाल लागला आहे ! तुमच्या हातून जर कांहीं अन्याय झाला असेल, तर त्याचा तुम्ही जबाब द्याल. परंतु माझी स्वच्छ कबुली अशी, कीं मी तुमचा धाकटा भाऊ आहें, तुमचा न्याय करण्याचा अधिकार मला नाहीं. "

सतीशचे हे उद्गार ऐकून, कोठें तरी धांवत जाऊन एकवार पोट भरून रडून घ्यावें, असें किरणमयीला वाटूं लागलें.

परंतु आत्मसंयमन करून ती म्हणाली, " पण भाऊजी, समाज आहे ना ?—"

सतीश मध्येंच तिला अडवून म्हणाला, " नाहीं–समाज नाहीं. ज्याच्या-जवळ पैसा आहे, ज्याच्या अंगांत जोर आहे, त्याच्या विरुद्ध समाज नाहीं ! या दोन्ही वस्तूंचा पुरवठा माझ्यापाशीं बऱ्याच भक्कम प्रमाणावर झाला आहे, वहिनी ! "

सतीशचें भाषण आणि त्याची बोलण्याची धाटणी यांमुळें किरणमयीच्या मुखावर हास्यच्छटा पसरली. कांहीं क्षण ती स्तब्ध राहिली.

ती म्हणाली, " भाऊजी, पैसा आणि अंग-जोर यांच्या बळावर तुम्ही समाजाला धुडकावून लावाल हें शक्य आहे. परंतु खुद्द तुमच्या स्वतःच्या अश्रद्धेच्या हातून या पापिष्ठेचा तुम्ही बचाव कसा कराल ? "

सतीश एकदम अधीरपणें म्हणाला, " मी कांहीं विद्या शिकलों नाहीं; मी एक गांवढळ मूर्ख माणूस आहें, वहिनी ! तुमच्या या तर्कयुक्तीला मी उत्तरही देऊं शकणार नाहीं, अन् केंसांची इतकी बारीक चिरणी करीत लोकांच्या बऱ्यावाईटाचा हिशेब करण्याची मला अक्कलही नाहीं. अन् हें काय सत्ययुग आहे, तर जगांतल्या प्रत्येक माणसानं उपेनदादाप्रमाणं युधिष्ठिर होऊन रहावं ? हें चकचकित कलियुग आहे. या युगांत अन्याय, कुकर्म लोक करणारच. त्याच्या जमाखर्चाचा हिशोब कोण चिवडायला बसला आहे ? माझा आपला न्याय उलटा आहे–तो चांगला म्हणा किंवा त्याला नांवही ठेवा, वहिनी ! पण मी एवढंच पहातों, कीं कोण कोणतं काम करतो आहे ! हाराणदादाच्या मृत्युकालीं तुम्हीं जी पतिसेवा केली, ती या डोळ्यांनीं मीं प्रत्यक्ष पाहिली आहे. त्या तुम्हीं ठरणार कुलटा–असती ! छट्, मेलों तरी या गोष्टीवर मी विश्वास ठेवणार नाहीं."

नंतर क्षणभर थांबून सतीश पुढें म्हणाला, " तें कांहीं कां असेना ! मी तुम्हाला घेऊन जाणारच ! नुकत्याच आलेल्या आजारामुळं मी थोडाबहुत निर्बल झालों खरा. पण तुम्हाला मदत करून माझ्या हातून तुम्हाला सोडवून न्यायचं आसपासच्या लोकांना साध्य होईल, असं कांहीं मला वाटत नाहीं. उद्यां खांद्यांवरून नेऊन मी तुम्हाला बोटींत चढवीनच ! मग तुम्ही कितीही कां हरकत करा ना ! "

किरणमयी खदखदून हंसली. अन्यायाचा, अपराधाचा सर्व कलंक दूर होऊन स्निग्ध, सरल हास्यच्छटेनें तिचें सर्व मुखमंडल उजळून निघालें. क्षणकाल तिला वाटूं लागलें, कीं आपल्या हातून कसलें गर्हणीय कार्य झालेंच नाहीं ! केवळ रागावून दोन दिवस आपण सासरहून माहेरीं निघून आलों होतों, आणि आपला प्रेमळ दीर आपली समजूत घालून परत घरीं घेऊन जाण्याकरतां आला असून तो तसा आग्रह आपणाला करीत आहे !

इतक्यांत दरवाज्याबाहेरून हांका मारीत दिवाकर खोलींत आला.

" मला बोलावलंत, वहिनी ? "

किरणमयीला असें विचारून तो सहज खाटेकडे नजर टाकतो, तों जणूं काय भूत दिसल्याप्रमाणें तो एकदम चमकलाच !

बाहेरच्या प्रकाशांतून एकदम खोलींतल्या अंधारांत आल्यामुळें पहिल्यानें त्यानें सतीशला पाहिलेंच नाहीं. आतां त्याची ओळख पटतांच त्याचा चेहरा अगदीं पांढरा फटफटीत पडला.

सतीश हंसून म्हणाला, " अरे, मी उपेनदादा नव्हे रे दिवा !—तुझा सतीशदादा ! पापांचा पाठीराखा ! मला पहातांच असं एकदम सुकं लांकूड बनायची जरूर नाहीं तुला ! ये. बस, बस. उपेनदादाचा परवाना घेऊन आलों आहें मी. उद्यां सकाळीं साडेसहांच्या अगोदरच आगबोट सुटेल, हें चांगलं लक्षांत असूं दे ! "

दिवाकरनें तेथल्या तेथें बसकण मारली, आणि दोन्ही गुढघ्यांत माथें घालून तो खालीं पहात राहिला.

" दिवा—"

दिवाकर तशाच स्थितींत म्हणाला, " मी येणार नाहीं, सतीशदादा—"

सतीश जोरानें म्हणाला, " तुझा बाप येईल ! उपेनदादाचा हुकूम–जिवंत किंवा मेलेल्या दिवाकराचं मुंडकं हवंच हवं ! "

दिवाकर म्हणाला, " तर मग त्याचं मेलेलं मुंडकंच घेऊन जा, सतीशदादा ! तें मी तुला उद्यां सकाळीं सहा वाजायच्या आंत अनायासं मिळण्याची व्यवस्था करतों. "

सतीश तोंडानें चमत्कारिक आवाज करून म्हणाला, " अरे बाप रे ! पोराचा राग तरी पहा ! पण येणार नाहीं कां म्हणून ? "

दिवाकर म्हणाला, " तुला काय वेडबीड तर नाहीं लागलं, सतीशदादा ? जगांत आतां असं कुणी राहिलं आहे का, कीं ज्याच्याजवळ मी माथं उंच करून राहूं शकेन ? "

सतीश म्हणाला, " ठीक आहे. माथं उंच करायला जर तुझी हरकत असेल, तर माथं खालीं घालून उभा रहा तूं. पण यायला तुला हें हवंच ! अरे, तूं असं काय मोठंसं केलं आहेस, कीं शरमेनं अगदीं मरून जातो आहेस असा ? मध्यंतरींच्या काळांत मी जे कांहीं प्रकार करून बसलों आहे, तें तिथं जाऊन ऐक तूं ! अगदीं मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा, मैथुन, या तंत्रोक्त पंचमकारांपर्यंत मजल मारली होती अस्मादिकांनीं ! भूतसिद्धि–वेतालसिद्धि हीं असलीं नांवं तूं ऐकलीं आहेस कधीं काळीं ? चल, ये. अरे बाबा, उपेनदादा आतां तो उपेनदादा नाहीं राहिलेला ! आम्हीं पांचजणांनीं मिळून एक प्रकारं त्याला

ठाकठीक केला आहे आतां! वहिनी, जीं कांहीं बांधाबांध वगैरे करून घ्यायची असेल ती घ्या. मी जातों असाच तिकिट काढायला—"

सतीशाचें शेवटचं वाक्य किरणमयीच्या कानांना खूबच खटकलें. तिनें विचारलें, "ठाकठीक केलं आहे म्हणजे काय, भाऊजी?"

सतीश कृत्रिमपणें हंसून म्हणाला, "गेल्यावर पहायला मिळेलच तुम्हाला, वहिनी!"

तो शुष्कपणें हंसला, तें किरणमयीच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं.

चार दोन क्षण स्तब्ध राहून ती म्हणाली, "पण मीं तर तुम्हाला सांगितलंच आहे, भाऊजी, कीं मला येतां यायचं नाहीं."

दिवाकरही दृढ स्वरानें म्हणाला, "कांहीं झालं तरी मी दिखील येणार नाहीं, सतीशदादा! माझ्यासाठीं आपले पैसे तूं फुकट घालवूं नकोस."

सतीश उठून निघाला होता. तो हताशभावानें जेथल्या तेथें बसला. उपेन्द्राच्या आजारासंबंधाची बातमी आतांपर्यंत त्यानें लपवून ठेवली होती. परंतु आतां ती गुप्त ठेवणें शक्य नाहीं, अशी त्याची खात्री झाली.

तो म्हणाला, "तुम्हांला घेऊन आल्याशिवाय मी रहाणार नाहीं, अशी गर्वभरानं तिथून प्रतिज्ञा करून मी आलों आहें. माझी लाज तुम्हाला राखायची नसली तर नका राखूं. पण उपेनदादानं तुमचा असा कोणता घोर अपराध केला आहे, कीं त्याला तुम्हीं अशा प्रचंड यातना द्याव्या? मी रिकाम्या हातानं जर इथून परत गेलों, तर त्याला किती अपार दुःख होईल, तें मी प्रत्यक्ष पाहूनच आलों आहें. दिवाकर इतका अधर्म तूं करूं नकोस. केवळ तुला पहाण्यासाठींच त्याचा प्राण अजून अटकून राहिला आहे! नाहीं तर यापूर्वी तो कधींच गेला असता!"

दोघांही श्रोत्यांनीं दुःखातिशयानें एकदमच अस्फुट चीत्कार केला.

सतीश सांगूं लागला, "या माघाच्या अखेरीला क्षयाच्या विकारानं पशुवहिनी जेव्हां स्वर्गाला निघून गेली, त्याच वेळीं समजून चुकलं, कीं उपेनदादाही निघाला! परंतु त्याला जायची इतकी घाई होती, याचा आम्हां कुणाला थांगपत्ताही लागला नव्हता. उपेनदादा नेहमींच कमी बोलतो. स्वर्गाचा रथ एकदम उमरठ्यावशीं येऊन हजर होईपर्यंत, आपली सगळी तयारी झाली आहे, हें त्यानं कुणाला कळूंही दिलं नाहीं! तुला कसलीदिखील भीति वाटायला नको रे दिवाकर! तूं निर्भयपणं चल. आमचा तो उपेनदादा आतां

राहिला नाहीं. आतां कुणीं सहस्त्र अपराध केले, तरी तो मनावर घेत नाहीं. फक्त गालांतल्या गालांत हंसतो ! शीः शीः ! या असल्या धुळींत अन् वाळूंत इथं अशा झोंपूं नका तुम्ही, वहिनी ! बरं ठीक. आम्ही दोघे बाहेर जातों. तुम्ही थोडी झोंप घ्या—उठूं नका हं पण. ”

असें म्हणून सतीश घाईघाईनें उठून किरणमयीच्या जवळ आला. तिच्या पायाला किंचित् धक्का देतांच त्याला कळून चुकलें, कीं ती चेतना हरपून मूर्च्छित पडली आहे—जाणतेपणीं भुईवर ती झोंपली नाहीं !

सतीश, आणि दिवाकर हे दोघेही परस्परांच्या तोंडांकडे पहात स्तब्ध उभे राहिले.

क्षणभरानें सतीश हळुहळू म्हणाला, “ मला अगदीं हेंच भय वाटलं होतं, दिवाकर ! ही बातमी हिला सहन व्हायची नाहीं, हें मला माहीत होतं. ”

दिवाकर चकित होऊन सतीशच्या तोंडाकडे पाहूं लागला.

हें पाहून सतीशलाच उलट विस्मय वाटूं लागला. तो म्हणाला, “ इतके दिवस तूं हिच्याजवळ आहेस, अन् तुला याचा पत्ता लागूं नये, दिवा ? मला मोठी भीतिच वाटते आहे, कीं वहिनींना मी बळी द्यायलाच तिकडे घेऊन जातों आहें ! तरी पण मला हिला घेऊन गेलंच पाहिजे. या जगांत दोन माणसांना तो शोक कांहीं झालं तरी सहन होणं शक्य नव्हतं—पैकीं एक तर स्वर्गाला निघून गेलीच, अन्—अन्—दुसरं—पण झटकन् थोडं पाणी घेऊन ये बरं, दिवाकर ! मी वारा घालीत बसतों तोंवर हिला. पण हें काय ? बोलत कां नाहींस तूं ? ”

अकस्मात् दिवाकराच्या शरीराला आपादमस्तक कंप सुटला, आणि तोही मूर्च्छित पडलेल्या किरणमयीच्या पायांवर धडकन् उपडी पडून रडत रडत बोलूं लागला, “ मला सगळं आतां कळलं, वहिनी ! तूं मला अत्यंत पूज्य गुरुजन आहेस. तर मग इतका वेळ हें सारं लपवून ठेवून मला नरकांत कां बुडवलंस ? या प्रचंड पापांतून माझा उद्धार तरी कसा होईल, वहिनी ? ”

## १९

उपेन्द्र म्हणाला होता, “ सावित्री ! माझीं हीं झिजलेलीं हाडं गंगेंत टाक, ताई ! किती तरी आगींत हीं जळलीं पोळलीं आहेत—थोडीं थंड तरी होतील—”

अलीकडे सावित्रीला तो कधीं ‘ तुम्हीं, ’ तर कधीं ‘ तूं ’ अशी तोंडाला येईल तशी हांक मारी.

उपेन्द्राची ही शेवटची इच्छा पूर्ण करण्याकरतां आणि अखेरच्या औषधोपचारासाठीं सावित्री कांहीं दिवसांपूर्वी कलकत्त्याला जोडासांकोंत एक घर भाड्यानं घेऊन त्याच्यासह येऊन राहिली होती.

आज सायंकाळानंतर एक मोठी जंगी सर येऊन गेली असतांही आकाशांत मेघांची दाटी कांहीं कमी झाली नव्हती; वातावरणही तसेंच कुंद होतं.

बऱ्याच वेळानें आपले श्रान्त डोळे उघडून उपेन्द्र आस्ते आस्ते सावित्रीला म्हणाला, “ समोरची खिडकी जरा उघड पाहूं, ताई ! तें मोठं नक्षत्र एकवार मी पाहून घेतों. ”

त्याच्या कपाळावरचे रुखे केंस हळूहळू वर सारीत सावित्री मृदु स्वरानें म्हणाली, “ अंगाला थंड वारा लागेल, दादा ! ”

“ लागेना कां ताई ? मला आतां त्याचं भय कसलं ? ”

उपेन्द्राचें भय आजच कां, पण ज्या दिवशीं सुरबाला गेली, त्या दिवसापासूनच, पुरें गेलें होतं !

परंतु तसें असलें, तरी सावित्रीची भीति तर नाहींशी झाली नव्हती ना ? जोंपर्यंत श्वास, तोंपर्यंत आस, असेंच तिलाही वाटत असावें. म्हणूनच, तिच्याबरोबरच उपेन्द्राच्या माथ्याशीं आपलीही जागा बळकटपणें दखल करून घेऊन मृत्यु ठाण मांडून बसला असतांही, क्षुल्लक थंड वाऱ्याची झुळूकही खोलींत येऊं द्यावयाचें धाडस तिला होत नव्हतें !

आपली नाखुषी प्रकट करणाऱ्या मृदु आवाजानें ती म्हणाली, “ पण नक्षत्रं कांहीं दिसत नाहीं आहेत, दादा ! आभाळांत मेघांची दाटी आहे—”

आपले म्लान डोळे उत्साहानें विस्तारून उपेन्द्र उद्गारला, “ मेघ ? अहा ! अवेळीं मेघ ! मग खिडकी उघड, उघड लवकर, ताई ! एकवार पाहून घेतों मी त्यांना. पुन्हां तर त्यांचं दर्शन व्हायचं नाहीं मला ? ”

बाहेर थंडगार वारा जोरानें वहात होता. सावित्रीनें त्याच्या कपाळाला आणि छातीला हात लावून पाहिला. ताप वाढत होता !

विनवणीच्या स्वरानें ती म्हणाली, “ आधीं तुम्ही बरे व्हा, दादा ! हवे तेवढे मेघ तुम्हाला पहायला मिळतील मग. बाहेर आज जोराचं वादळ चाललं आहे. आज खिडकी मी उघडायची नाहीं. ”

तिचा हात आपल्या हातीं ओढून घेऊन उपेन्द्र रागावून म्हणाला, “ बऱ्या-बोलानं तूं खिडकी उघड, सावित्री ! नाहीं तर पावसाळ्यांत जेव्हां मेघांनीं आभाळ झांकाळून निघेल, तेव्हां रडून रडून तुझा जीव जाईल, हें मी तुला आधींच बजावून ठेवतों. मला पुन्हां कांहीं वेळ मिळायचा नाहीं मेघ पहायला ! ”

सावित्रीनें वाद न करतां, हळूच आपले पाणावलेले डोळे पुसले आणि उठून खिडकी उघडली.

त्या उघड्या खिडकींतून उपेन्द्र डोळ्यांचें पातेंही न हलवितां आकाशाकडे एकदृष्टीनें पहात राहिला.

आकाशाच्या एका अदृश्य भागांतून क्षणोक्षणीं विजांचे चमकारे मारीत होते. आणि त्यांच्याच प्रकाशच्छटांनीं समोरचे घनदाट मेघ उजळून निघत होते.

हें दृश्य पहात असतां कांहीं केल्या उपेन्द्राच्या डोळ्यांना तृप्तताच वाटेना ! तो सारखा तिकडे पहातच राहिला.

खिडकीची एक गराद धरून सावित्रीही त्याच बाजूला नजर लावून निःस्तब्ध उभी होती.

उपेन्द्राची दृष्टि एकाएकीं तिच्याकडे जातांच, मनांतल्या मनांत किंचित् हंसून तो म्हणाला, “ बरं बरं–कर खिडकी बंद अन् माझ्याजवळ येऊन बस. पण इतकी माया कांहीं बरी नव्हे ग ताई ! एवढासा वारा माझ्या अंगाला तूं लागूं देत नाहींस; पण मी निघून गेल्यावर तूं काय करशील, सांग बरं ? ”

सावित्रीनें चटकन् खिडकी बंद केली, आणि ती त्याच्या जवळ येऊन बसली.

कांहींशा सद्गदित स्वरानें ती म्हणाली, “ मला काम देऊन आपण निघून जाऊं, असं तुम्ही म्हणतां ! सगळा जन्मभर मी तेंच करीत राहीन. तुम्ही माझ्या डोळ्यांसमोर सारखे दिसत रहाल, दादा ! ”

“ पण तें तुला करतां येईल का ? ”

क्षणभर थांबून सावित्री हळुहळू म्हणाली, “ कां बरं नाहीं मला करतां येणार, दादा ? तुम्ही सांगाल त्याला ते कधींच नाहीं म्हणायचे नाहींत. ”

उपेन्द्रानें तिच्याकडे पाहून हास्यमुखानें विचारलें, “ ते कोण ग ? सतीशच ना ? ”

सावित्री खालीं मान घालून गप्प बसली.

उपेन्द्रानें तिच्या सलज्ज, स्तब्ध मुखाकडे पाहून एक निःश्वास टाकला.

नंतर क्षणभर थांबून तो म्हणाला, " सावित्री, सतीश माझा कोण, हें इतरांना यथार्थपणं समजणं केवळ अशक्य आहे. बाहेरून जेवढं दिसतं, त्यावरून तो माझा निकटचा सोबती, माझा आजन्म सुहृद्, असं वाटतं हें तर खरंच. परंतु जो संबंध दिसून येत नाहीं, त्या बंधनांत सतीश माझा पाठचा भाऊ, माझा शिष्य, माझा चिरकालचा अनुगामी सेवक ! त्या रात्रीं तूं जर ताई, स्वतःचा संबंध उघड करून, आम्हांला परत फिरवून घेऊन आली असतीस, तर माझं अखेरचं आयुष्य कदाचित् इतक्या दुःखांत मला काढावं लागलं नसतं ! अन् कदाचित् मला इतक्या यातना द्यायला दिवाकरालाही संधि मिळाली नसती ! "

सावित्रीच्या डोळ्यांना टचकन् पाणी आलें.

ती म्हणाली, " तुम्हाला परत फिरवून घेऊन यावं, अशी माझी अतिशय इच्छा होती, दादा ! पण त्यांनीं मला कांहीं केल्या जाऊंच दिलं नाहीं. दरवाज्याच्या दोन्ही बाजूंना हात देऊन त्यांनीं माझा रस्ता अडवून धरला. ' त्यांच्या समोर तूं गेलीस, तर त्यांचा अपमान होईल,' असं तें मला म्हणाले."

" त्याची इच्छा ! "

असें म्हणून वर पाहून उपेन्द्रानें एक मोठा उसासा टाकला, आणि तो गप्प राहिला.

त्याच्या घरीं त्याचे वडील शिवप्रसादबाबू वातविकारानें अंथरुणाला खिळले होते. त्यांना आणि संसाराला टाकून महेश्वरी बरोबर येऊं शकली नाहीं. परंतु मधला भाऊ व्यवस्था पहावयाला म्हणून कलकत्याच्या घरीं राहिला होता. त्याची आणि दुसऱ्या कोणा एकाची पाउलांची चाहूल जिन्यावर ऐकूं आली.

चार दोन क्षणांतच वैद्यबुवांना बरोबर घेऊन तो खोलींत आला.

कविराजांनीं उपेन्द्राची नाडी पाहिली. ताप पाहिला आणि औषध बदलणें आवश्यक आहे, असा प्रस्ताव केला.

तत्क्षणीं हात जोडून उपेन्द्र म्हणाला, " एवढ्याबद्दल मला आतां माफ करायला हवं आपणाला, कविराजमहाशय ! आपणाला कळत नाहीं, असं कांहींच नाहीं. मग जायच्या वेळीं आपण मला आणखीं दुःख कां देतां ! "

वैद्यराज वृद्ध होते. उपेन्द्राचे ते बोल ऐकून त्यांच्या डोळ्यांना टचकन् पाणी आलें.

ते सांत्वनपर वाणीनें म्हणाले, "आम्हांला शेवटच्या क्षणापर्यंत निराश होऊन चालायचं नाहीं बाबा! शिवाय, भगवंतानं जरी शेवटची आशा दिखील नष्ट करून टाकली असली, तरी दिखील यातना होऊं नयेत म्हणून रोग्याला औषध हें दिलंच पाहिजे."

उपेन्द्रानें मग प्रतिवाद केला नाहीं. तो गप्प पडून राहिला.

मग औषधोपचारांत बदल करण्याची व्यवस्था सांगून ते प्रख्यात वैद्यराज निघून गेले. उपेन्द्राविषयीं त्यांना बिलकुल भरंवसा तर राहिला नव्हताच; परंतु रोग्याच्या मृत्यूचा क्षण अतिशय त्वरित गतीनें जवळ जवळ येत आहे, असेंच आज त्यांना वाटूं लागलें.

तीन दिवसांनीं, सोमवारीं सकाळीं एक तारेचा लखोटा हातीं घेऊन सावित्री आंत आली.

"उद्यां सकाळी ती मंडळी बोटीवर चढताहेत."

सतीशनें विचारलें, "कोण कोण येताहेत, त्यांचीं नांवं नाहीं का दिलीं सतीशनं? पाहूं बरं टेलिग्राम—"

उपेन्द्रानें पुढें केलेल्या हातांत सावित्रीनें तारेचा कागद दिला.

कागद त्यानें उलटून पालटून नीट पाहिला, आणि तो सावित्रीच्या हातीं परत देऊन त्यानें फक्त एक मोठा उसासा टाकला.

त्या उसाशाचा अर्थ सावित्रीच्या पूर्णपणें लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं.

जातांना सतीश त्याला आश्वासन देऊन गेला होता, कीं किरणमयीची भेट झाली, कीं काय वाटेल तें झालें तरी आपण तिला खात्रीनें परत घेऊन आल्याशिवाय रहात नाहीं! आपल्या आणि तिच्या भाऊबहिणीच्या संबंधाचाहि उल्लेख करावयाला त्यानें कमी केलें नव्हतें.

त्या अत्यंत आश्चर्यमय तरुणीला एकवार डोळ्यांनीं पहावयाची उत्कंठा सावित्रीला आज पुष्कळ दिवसांपासून होती. परंतु कदाचित् अव्यवहारी सतीश या घरींच तिला घेऊन येऊन आपली तिची भेट करून देईल, अशी बरीचशी शंकाही तिला होती.

ती म्हणाली, "सर्व बाजूंनीं नीट विचार करून काम करायची त्यांना संवयच नाहीं. मला असं मोठं भय वाटतं दादा, कीं कदाचित् किरणवहिनींना ते इथंच आणतील, अन् इथंच तिंची राहण्याचीही व्यवस्था करतील!"

उपेन्द्राच्या पांडुर अधरावर वेदनायुक्त क्षीण हास्यरेखा दिसूं लागली.

तो म्हणाला, " या घरीं ती कां येईल, ताई? या मुलुखांत ती जर परतही आली, तर त्यांत तिचा कांहीं दुसरा हेतु असेल. परंतु ती कांहीं दुसरी सावित्री नव्हे; ती कांहीं खुळीवेडी अजाण स्त्री नव्हे. तुझ्यासारखी ती इहकाल परकाल एक करून बसलेली नाहीं! मग अशा भयंकर दुखण्याच्या पिंजऱ्यांत ती हौसेनं आपणाला कोंडून घेईल, हें शक्य तरी कसं आहे, सांग बरं, ताई?"

बोलतांना त्याची दृष्टि सावित्रीच्या मुखावर खिळलेली होती. स्नेह, ममता, श्रद्धा, करुणा इत्यादि भावनांच्या वेदनांनीं त्याचा कंठ बोलतां बोलतां अतिशय कांपू लागला.

सावित्री खालीं मान घालून उपेन्द्राचें भाषण ऐकत होती. वेगानें येणारीं आंसवें तिनें मोठ्या कष्टांनीं आवरून धरलीं.

कांहीं क्षणांनीं स्वतःला सांवरून उपेन्द्र पुनः म्हणाला, " अन् मोठं आश्चर्य असं, सावित्री, कीं एक वेळ खरोखरच तिचं माझ्यावर अत्यंत प्रेम जडलं होतं!"

उपेन्द्रानें सांगितलेली ही माहिती ऐकून सावित्रीला खरोखरच आश्चर्य वाटलें. कारण, ही गोष्ट तिनें सतीशकडून कधींच ऐकली नव्हती.

क्षणभर थांबून उपेन्द्राकडे पाहून ती म्हणाली, " तिनं विलक्षण श्रद्धेनें पति-सेवा कशी केली, ती कहाणी त्यांच्याकडून मीं ऐकली होती. तर मग ती काय खरी नाहीं, दादा?"

उपेन्द्र म्हणाला, " नाहीं—ती गोष्टही अगदीं खरी, ताई! तो एक मोठा अतिशय अद्भुत प्रकार होता. तूं अन् सुरबाला यांची जर मला पूर्ण माहिती नसती, तर अशी सेवा कुणाही स्त्रीकडून कधीं होणं शक्य नाहीं, पतीवर कुणाचं इतकं विलक्षण प्रेमही असणं शक्य नाहीं, असंच मला वाटलं असतं!"

सावित्री म्हणाली, " परंतु या गोष्टी अशा आहेत दादा, कीं त्यांत फस-वणुक किंवा प्रतारणा संभवनीयच नाहीं!"

उपेन्द्रानें तत्क्षणीं तिच्या म्हणण्याला साद दिली.

तो म्हणाला, " नाहीं—प्रतारणा, फसवणूक तर त्यांत तिळमात्रही नव्हती. तिला कधींच कुणापाशीं त्याचं प्रदर्शन करायचं नव्हतं अन् तिनं तें तसं कुणाला दाखवलं नाहीं किंवा कळूंही दिलं नाहीं. तिनं जी पतिची विलक्षण सेवा केली, त्याला साक्ष एक परमेश्वर किंवा आम्ही दोघेच होतों—सतीश अन् मी."

दुसऱ्याच क्षणीं त्याला अनंगमोहनचें प्रकरण आठवलें.

क्षणंभर स्तब्ध राहून तो पुढें म्हणाला, “ आज तर माझा कुणा-कुणावरही राग नाहीं—कसली कुणाविषयीं विरक्ति नाहीं. आज अतिशय यातना होऊन कोणती गोष्ट माझ्या मनांत येते, ठाऊक आहे तुला, ताई ? मनाला खेद होतो तो एवढाच, कीं सगळा जन्म तिनं फक्त वस्तु हाताळीत हाताळीतच घालवला; परंतु कधीं कांहींही तिला खरोखर मिळालं नाहीं ! माझ्यावर दिखील तिचं प्रेम कधीं नव्हतं. इतकं प्रेम असल्यावर कधीं कुणीं व्यथा देणें शक्य आहे काय ? दिवाकर माझा कोण अन् त्याच्याबद्दल मला काय वाटत होतं, हें तर तिला चांगलं ठाऊक होतें. तिच्या हातींच तर मी त्याला देऊन आलों होतों ना ? माझी पूर्ण. भावना अशी होती, कीं माझ्या स्नेहाच्या वस्तूकडे ती स्नेहाच्या दृष्टीनंच पाहील. उंः ! केवढी भयंकर चूक झाली ती माझी ! ”

उपेन्द्र कांहीं क्षण थांबला, आणि म्हणाला, “ मला मोठी काळजी लागली आहे ती हीच, कीं कांहीं धोरण न ठेवतां सतीश सर्वांना घेऊन इथंच उतरतो कीं काय ! ”

सावित्री मान हलवून म्हणाली, “ नाहीं, तसं होणं कधींही शक्य नाहीं. आपल्या बहिणीची रहायची व्यवस्था त्यांनाच काय ती करूं द्या—परंतु इथं नाहीं. ”

उपेन्द्र यावर कांहीं बोलणार होता. परंतु तोंडांतले शब्द त्याच्या तोंडांतच राहिले !

अघोरमयीला त्याच्या या थराला गेलेल्या दुखण्याची बातमी कशी तरी लागून, उपेन्द्राच्या विराट् गुणराशीची यादी नाकांतल्या सुरानें तयार करीत ती रडत रडत तेथें येऊन ठेपली.

या आजाराच्या घातक स्वरूपाविषयींची तिला स्पष्ट कल्पना फारशी नव्हती. तरीही तिच्या आक्रंदनाचा आणि विलापाचा सारांश एवढाच होता, कीं हें जळकें नष्ट तोंड घेऊन भिक्षा मागायचा रस्ताही ज्याअर्थी आपणा हतभागिनीला बंद झाला आहे, आणि कांहीं एक गोष्ट झाली, तर ज्याअर्थी न खातां पितां सुकून मरण्याशिवाय आपणाला दुसरी गति नाहीं, त्याअर्थी उपेनची सगळी बला घेऊन आपणाला टवळीला मरण कां येत नाहीं ? इत्यादि इत्यादि.

तिचा तो आत्मनिष्ठ विलाप ऐकून त्या दुःखांतही उपेन्द्राला हंसूं आल्यावांचून राहिलें नाहीं.

तो अघोरमयीला क्षीण वाणीनें म्हणाला, "खायला मिळायचं नाहीं कां तुम्हाला, मावशी ?"

"उपेन—"

सवित्रीकडे बोट दाखवून उपेन्द्र म्हणाला, "मी जरी गेलों, तरी माझ्या या बहिणीला मागं ठेवून मी जातों आहें. तुम्हां कुणाला ही कष्ट होऊं देणार नाहीं बरं."

अघोरमयीनें यापूर्वी सावित्रीला कधीं पाहिलें नव्हतें. त्यामुळें, कठोर, अविश्रांत परिश्रम आणि पराकाष्ठेचे मानसिक कष्ट यांमुळं कळाहीन झालेल्या त्या अगदींच अनोळखी 'बहिणी'कडे पाहून तिच्या आश्चर्याला सीमा राहिली नाहीं. परंतु तिच्या कुतूहलाचं समाधान व्हावें म्हणून, कामाचें निमित्त करुन सावित्री त्या खोलींतून बाहेर निघून गेली.

गुरुवारच्या दिवशीं सकाळीं साडेदहा अकरा वाजण्याच्या सुमाराला सतीश बोटींच्या धक्यावर उतरून भाड्याची गाडी ठरवीत आहे, तोंच समोर बिहारी उभा आहे, असें त्याच्या दृष्टीला पडलें.

धन्याला पहातांच बिहारीही पुढें सरला, आणि त्यानें त्याला मोठ्या अदबीनें प्रणाम केला.

किरणमयी जवळच उभी होती. तिच्याकडे पाहून, कदाचित् तीच ती असावी, असा बिहारीलाही एकवेळ संदेह वाटला. त्यानें पूर्वी तिला कधीं पाहिली नव्हती. ती असामान्य सुंदर आहे, असें मात्र त्यानें ऐकलें होतें. परंतु त्या मलिन वस्त्रें परिधान केलेल्या, सामान्य दिसणाऱ्या स्त्रीमध्यें विशेष सौंदर्याचें चिन्ह कांहींच न दिसल्यामुळें, ती दुसरीच कोणी बाई असावी, असेंही नंतर त्याला वाटूं लागलें.

बिहारी आस्ते आस्ते सतीशला म्हणाला, "बाबूजी, आईनं तुम्हाला निरोप सांगितला आहे, कीं ही बाई जर तुमच्याबरोबर आली असेल, तर तिला दुसरीकडे कुठं तरी ठेवून मग तुम्हीं सर्व मंडळींनीं तिकडे यावं—बरोबर हिला घरीं आणूं नये."

जबरदस्त भूक आणि तहान यांच्या भयंकर तापानें सतीश अगोदरच अतिशय कावून गेला होता. त्यांतच किरणमयीच्या तोंडावरच बिहारीनें सांगितलेला तो अत्यंत अपमानकारक निरोप ऐकून तो संतापानें अगदीं लालबुंद होऊन गेला!

त्यानें ओरडून विचारलें, " कां रे? सांग तरी! हिला झाडाखालीं कुठं तरी ठेवून मगच आम्हीं तुमच्या घरीं यायचं होय ? जा, जाऊन सांग तिला, आम्ही कुणीच येत नाहीं तिकडे ! "

बिहारीचा चेहरा चुन्यासारखा पांढरा झाला !

किरणमयी तत्क्षणीं सतीशच्या जवळ आली आणि किंचित् म्लानपणें हंसून म्हणाली, " हें तर सारं बरोबर आहे–नाहीं का, भाऊजी ? यांत रागावण्या-सारखं कांहीं दिखील नाहीं. बरं, आतां बाबू आहेत कसे रे, बिहारी ? "

बिहारी तिला कांहीं उत्तर देणार, तोंच अधिकच रागावून सतीश ओरडला, " तुला निरोप सांगायला कुणीं रे पाठवलं, बिहारी ?–सावित्रीनं ? मोठाच तिला दिमाख चढलेला दिसतो ! "

सावित्रीसंबंधानें ही कठोर भाषा ऐकून बिहारीला फार वाईट वाटलें. किरणमयीच्या तोंडाकडे पाहून तो म्हणाला, " तुम्ही बरोबर बोललां, आई ! नीट समजून न घेतां बाबूजी उगीच रागावले आहेत. असल्या सर्व भयंकर दुखण्यांत कुणाला तरी तिकडे जावंसं वाटेल का ? उपेनबाबूंनीं काल रात्रींच सावित्री–मला बोलवून आणलं अन् ते स्वतःच तिला म्हणाले, ' भ्यायचं कांहीं कारण नाहीं तुला. किरणवहिनी माझ्या दुखण्याचं नुसतं नांव ऐकतांच, या घरींच काय, पण या मोहल्ल्यांत दिखील फिरकायची नाहीं. ' सावित्री— आईप्रमाणं सर्वांनाच कांहीं मरण्या–वांचण्याच्या—"

किरणमयीचें म्लान मुख दारुण व्यथेमुळं एकदम पांढरें फटफटीत पडलें.

तिनें विचारलें, " हें स्वतः बाबूच बोलले कायरे, बिहारी ? "

माथें हलवून उत्साहानें बिहारी तिला कांहीं उत्तर देणार होता, तोंच त्याला दरडावून सतीश ओरडला, " तूं थांबरे, गद्ध्या ! "

त्या धमकावणीमुळें बिचारा बिहारी संकोचानें एवढासा होऊन गेला !

किरणमयी म्हणाली, " त्या बिचाऱ्यावर रागावून काय उपयोग, भाऊजी ? "

नंतर बिहारीकडे वळून ती म्हणाली, " तुझ्या बाबूजींना जाऊन सांग. म्हणावं, भिऊं नका. त्यांचा हुकूम झाल्याशिवाय मी तिकडे येणार नाहीं. "

सतीशला ती म्हणाली, " आज मला एकाद्या कुठल्या तरी हॉटेलमध्यें ठेवून–एकादं छोटं घरबीर नाहीं का मिळायचं ? "

सतीश एकदम क्षुब्ध होऊन म्हणाला, " कलकत्ताशहरांत घरांना काय

तोटा, वहिनी ? एका तासाच्या आंत मी सगळं कांहीं ठाकठीक करतों पहा. चल ये रे, दिवाकर! जरा झटपट पाय उचल."

असें म्हणून गाडी बोलवून, तींत किरणमयीला चढवून तो स्वतः कोचबॉक्स-वर चढून बसला.

गाडी निघून गेल्यावर, शरमलेला आणि क्षोभामुळें उत्तेजित झालेला बिहारी हळुहळू घराकडे निघाला.

संधि आणि वेळ मिळतांच, सावित्री सकाळीं घाईघाईनें गंगेमध्यें बुडी मारून येई. सतीश परत आल्यापासून आज कित्येक दिवस ती अगदीं दररोज गंगेचें स्नान करून येत असे.

चार एक दिवसांनीं एके दिवशीं सकाळीं स्नान आणि आन्हिक उरकून सावित्री वर येत आहे, तोंच घाटावर कसली गडबड चालली आहे असें तिला आढळून आलें.

एक म्हातारा ब्राह्मण स्नान करून, देवनामांचें पवित्र उत्तरीय पांघरून मंत्र-जप करीत करीत घरीं जावयाला निघाला होता. इतक्यांत कोठूनसें येऊन एका वेडीनं त्याचा रस्ता अडवला!

कदाचित् आपणाला शिवून, गंगास्नानानें मिळविलेल्या सर्व पुण्याची ती माती करून टाकील, या भयशंकेनं वृद्ध अगदीं घाबरून गेला होता!

वेडी त्याला अतिशय आग्रहानें अद्भुत प्रश्न विचारीत होती, "ठाकूर, देवावर तुमचा विश्वास आहे ? त्याला हांक मारली म्हणजे तो येतो ना ? तुम्ही परमेश्वराला हांक कशी हो मारतां ? अन् मलाच कां हांक मारतां येत नाहीं त्याला ? माझा त्याच्यावर विश्वास कां बसत नाहीं ?"

शिवाशिवीच्या भयानें अतिशय संकुचित होऊन ब्राह्मण उत्तरादाखल तिला ओरडून म्हणाला, "बघ चांडाळणी, बोलवूं का पोलिसला एकदम ? सोड रस्ता माझा–बऱ्या बोलानं-सांगतों आहें तुला!"

दोघीचौघी प्रौढ बायाही आसपास उभ्या राहून चाललेला तमाशा पहात होत्या. त्यांपैकीं एकजण म्हणाली, "छे छे! वेडी बिडी कांहीं नाहीं. वेड कसलं आलं आहे ? सर्व रात्रभर मेली सारखी दारू ढोंशीत होती, दिसत नाहीं ?"

तिचे हे शब्द ऐकतांच वेडी अगदींच गळून गेली, आणि करुण वाणीनें म्हणाली, "मी गृहस्थघरची बायको आहें; मी दारूला कधीं शिवतही नाहीं. तें पलीकडे माझं बिऱ्हाड. हात जोडून मी तुम्हांला एवढंच विचारतें, कीं

परमेश्वर काय खरोखर आहे ? तुम्हांला त्याचं ध्यान करतां येतं का ? त्याची भक्ति करतां येते का ? मग मलाच कां करतां येऊं नये ? परवांच्या दिवसापासून मी तर त्याला कशी आळवतें आहें, हांका मारतें आहें—"

बोलतां बोलतां तिच्या डोळ्यांतून दरदरां अश्रुप्रवाह सुरू झाला.

सावित्रीला देखील ती स्त्री वेडीच असावी असें वाटलें. तरी देखील. त्या अपरिचित वेड्या स्त्रीची अश्रुजलानें आर्द्र झालेली अद्भुत, व्याकुल प्रार्थना ऐकून, तिच्या स्वतःच्या शतदुःखवेदनांनीं परिपूर्ण हृदयामध्यें विलक्षण हाहाकार उडाला !

क्षणार्धांत तिचेही डोळे अगदीं भरून आले. वेडीची नजर एकाएकीं त्या बाजूकडे वळतांच, तिनें चटकन् न्हाताऱ्याची वाट सोडली, आणि सावित्रीच्या समोर येऊन ती म्हणाली, " तुम्ही मला द्याल का हो हें सारं समजावून ? "

इतक्या अवधींत आजूबाजूला गर्दी जमा होऊं लागली होती. हें पाहून सावित्रीनें खप्खन् तिचा हात धरला.

वेडी एकदम चमकून उद्गारली. " मला शिवलांत तुम्ही ? "

सावित्री म्हणाली, " त्यांत कांहीं दोष नाहीं. तुम्हीं आमच्या घरीं चला. रस्त्यानं जातां जातां तुमच्या प्रश्नांचीं मी उत्तरं देतें. "

असें म्हणून त्या अभागिनीचा हात धरून ती बाहेरच्या रस्त्याला लागली.

दोनचार वाक्यें तिच्याशीं बोलतांना सावित्रीला कळून आलें, कीं या बाईला कांहीं वेड लागलेलें नाहीं. परंतु कोणत्याही गोष्टीवर मन स्थिर करण्यासारखी तिच्या मनाची अवस्थाही नाहीं.

बोलतां बोलतां ती मध्येंच म्हणाली, " मी तर देवाला रात्रंदिवस अष्टौप्रहर विनवतें आहें, कीं त्याच्या पायांशीं तर मीं अनंत अपराध केले आहेत, तेव्हां त्यांचं दुखणं मला येऊन त्यांना बरं कर. काय हो बाई असं होईल कीं नाहीं ? उपास करून देवाची रात्रंदिवस आळवणी केली, म्हणजे खरोखर त्याला दया येते काय ? ठाऊक आहे तुम्हाला ? "

असें म्हणून तिनें तीव्र दृष्टीनें सावित्रीकडे पाहिलें.

तिला काय उत्तर द्यावें, हें सावित्रीला सुचेना. परंतु तिला अधिक वेळ घोटाळ्यांत पडावें लागलें नाहीं !

दुसऱ्याच क्षणीं तिनें सावित्रीचा हात सोडून दिला, आणि ती म्हणाली,

" मी गंगेचं स्नान करून येतें हं. गंगास्नानानं अनेक पापं नाहींशीं होतात नव्हे ? "

असें म्हणून उत्तराची वाटही न पहातां, ज्या रस्त्यानें ती आली होती, त्याच रस्त्यानें ती त्वरेनें तेथून परत निघाली.

## २०

सावित्रीच्या डोळ्यांतून श्रावणांतील वर्षाधारांप्रमाणें अश्रूंच्या धारा गळत असून त्यांनीं तिची छाती ओलीचिंब झाली होती. आज तिच्याच मांडीवर उपेन्द्रानें आपली मृत्युशय्या घातली होती!

त्याच्या कृश झालेल्या थंडगार पायांत तोंड झांकून निःस्तब्धपणें रडत स्फुंदत दिवाकर आपल्या हृदयांतील असह्य दुःखाला वाट करून देत होता. त्याच्या अंतःकरणाला होणारा दारुण ताप, त्याची व्यथा, अन्तर्यामी परमेश्वराशिवाय दुसऱ्या कोणाला कळणार ?

पलीकडल्या खोलींत महेश्वरी जमिनीवरच पडली असून एकसारखी रडत होती. तिच्या आक्रोशानें दगडालाही पाझर फुटला असता !

सर्वांनाच ग्रासून टाकणाऱ्या या शोकामध्यें फक्त एक सतीशच स्थिरपणें जवळ बसून राहिला होता.

आज सकाळपासून उपेन्द्राच्या तोंडांतून मधून मधून ज्या रक्ताच्या गुळण्या उसळून येत, अतिशय प्रयत्न करूनही त्या कांहीं केल्या थांबत नव्हत्या ! त्याचा श्वासोच्छ्वास क्रमाक्रमानें जड आणि कठिण होऊं लागला होता. त्याचे असह्य क्लेश सहन करीत उपेन्द्र डोळे मिटून निश्चल पडला होता.

त्यानें मध्येंच एकदां डोळे उघडून सावित्रीच्या तोंडाकडे पाहिलें, आणि हळुहळू क्षीण स्वरानें विचारलें, " रात्र किती झाली ग, ताई ? ही काय सरायचीच नाहीं काय ? "

सावित्रीनें पदरानें त्याच्या ओंठांवरचें रक्त पुसून काढलें, आणि खालीं वांकून ती म्हणाली, " आतां फार नाहीं राहिली, दादा ! अतिशय त्रास होतो आहे का तुम्हाला ? "

उपेन्द्र म्हणाला, " नाहीं, ताई ! सगळ्यांना होतो तितकाच मलाही होतो आहे. अधिक कां होईल ? "

चार दोन क्षण शांततेंत गेले.

नंतर स्थिर राहूनच तो सतीशला मंद आवाजांत म्हणाला, " सतीश, वहिनीचा नाहीं का रे कांहीं शोध लागला ? "

आज चार दिवस झाले, किरणमयी जी कोठें नाहींशी झाली होती, तिचा पत्ताच लागत नव्हता ! कलकत्त्याला ज्या दिवशीं मंडळी पोंचली, त्या दिवशींच सतीशनें जवळच एक घर भाड्यानें ठरविलें, आणि एक मोलकरीण पाहून, बिऱ्हाडाची जरूर ती सर्व तयारी करून देऊन, तो उपेन्द्राकडे आला होता. परंतु त्याच्या आजारानें भलतेंच स्वरूप धारण केल्यामुळें, त्याला स्वतः जाऊन तिकडील समाचार घेऊन येणें दोनतीन दिवसांत शक्य झालें नव्हतें.

तीन दिवसांनीं तो तिकडे गेला. तेव्हां किरणमयीनें तेथें आणून ठेवलेल्या एकाही जिन्नसाला स्पर्श केला नव्हता असें त्याला आढळून आलें. भातासाठीं नवीन हंडी विकत आणून ज्या ठिकाणीं तो ठेवून गेला होता, तेथें तशाच स्थितींत ती पडली होती. चुलींत विस्तवाच्या काजळीचा एक ठिपकाही दिसत नव्हता.

मोलकरीण येऊन म्हणाली, " मीं काम तरी करायचं कुणाचं, बाबू ? त्या दिवशीं आल्यापासून बाई खिडकीची गराद धरून रस्त्याकडे पहात ज्या बसल्या, त्या उठल्याच नाहींत ! त्यांनीं अंग धुतलं नाहीं, कीं तोंडांत पाणीही घातलं नाहीं. घातलेला बिछाना तसाच पडून राहिला, बसल्या जागच्या उठून त्या एकवारही त्यावर झोंपल्या नाहींत. अन् नंतर काल सकाळपासून तर त्या कुठं दिसल्याही नाहींत मला. घरांतल्या सामानसुमानाची व्यवस्था काय करायची ती तुम्ही करा, बाबू ! पण रिकाम्या घरावर पहारा करीत नुसतं बसून ऱ्हायचं काम आपल्याच्यानं बाई व्हायचं नाहीं ! "

तिनें सांगितलेली ही बातमी ऐकून सतीश माथ्यावर हात देऊन जागच्या जागीं बसून राहिला. शेवटीं, मोलकरणीच्या हातीं पांच रुपयांची एक नोट देऊन तो उपेन्द्राच्या घरीं परत आला.

त्या दिवसापासून अनेक माणसांकडून सतीशनें किरणमयीचा खूब शोध चालविला होता. परंतु त्याला अजूनपर्यंत यश आलें नव्हतें.

ही सर्व हकीगत उपेन्द्राच्या कानीं गेली होती.

सावित्रीच्या मनांत एक गोष्ट वारंवार येई, आणि तिला अतिशय यातनाही होत. तिला वाटे, त्या दिवशीं सकाळीं गंगेच्या घाटावर ज्या बाईला आपण

पाहिलें, ती किरणमयी तर नसेल ? परंतु किरणमयी असामान्य सुंदर आहे, असें तिनें ऐकलें होतें. त्या वेडीला थोडेंबहुत रूप असलें, तरी तिला 'सुंदर' म्हणतां येणें शक्य नव्हतें. परंतु ती कां गेली, कुठें गेली, कशाकरतां गेली ?

उपेन्द्राच्या प्रश्नाला मान हलवून सतीश उत्तरला, "नाहीं."

यानंतर त्यानें एकही प्रश्न विचारला नाहीं, आणि चार दोन क्षणांतच त्याला जबर तंद्रेनें घेरलें.

अशा रीतीनें बाकीची रात्र उलटली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दहा वाजून गेल्यावर उपेन्द्रानें पुनः एकवार डोळे उघडून शक्य तितक्या घाईघाईनें आसपास पाहिलें, आणि अत्यंत क्षीण स्वरानें विचारलें, "कोण तें ?–सरोजिनी ?"

सरोजिनी जमिनीवरच गुडघे टेंकून खालीं बसली, आणि बिछान्यांत तोंड लपवून रडूं लागली.

उपेन्द्रानें आस्ते आस्ते उजवा हात वर करून तिच्या मस्तकावर ठेवला, आणि तो म्हणाला, "आलीस, ताई ? मनांतल्या मनांत मी तुलाच शोधीत होतों; पण कांहीं केल्या मला आठवेनाच ! आज जर तूं आली नसतीस, तर पुन्हां भेटही झाली नसती बहुतेक !"

असें म्हणून कांहीं वेळ तो कसला तरी विचार करीत पडला. आतां सर्व गोष्टी त्याला नीटशा आठवत नाहींत, असें स्पष्ट दिसून येत होतें.

इतक्यांत कांहीं तरी मनांत येऊन उपेन्द्रानें विचारलें, "सतीश कुठं आहे ?"

पलीकडील खिडकीचा गज धरून सतीश बाहेर पहात स्तब्ध उभा होता. तो चटकन् त्याच्या जवळ येऊन उभा रहातांच उपेन्द्र म्हणाला, "तुमचं लग्न डोळ्यांनीं पाहून जाण्याइतका वेळ मला मिळाला नाहींरे, सतीश ! पण माझ्या या गुणांच्या लक्ष्मी बहिणीला तूं क्षणभरही कधीं दुःख देऊं नको बरं ! तुझा हात एकवार दे बरं जरा—"

असें म्हणून आपला नुसता हाडें राहिलेला हात त्यानें वर केला.

सावित्रीच्या खालीं घातलेल्या चेहऱ्याकडे पाहून, सतीशाच्या काळजांत क्षणभर ध्वक् करून ज्वाला उठली; परंतु दुसऱ्याच क्षणीं त्यानें हात पुढें करून उपेन्द्राचा कांपणारा हात आपल्या उजव्या बळकट हातांत हळूच धरला.

मनांतल्या मनांत जगत्तारिणीची मूर्ति आणून उपेंद्र म्हणाला, "सतीश, सरोजिनीच्या आईला तर तूं चांगली ओळखतोस. तिला मीं अगदीं जोराच्या

विश्वासानं आश्वासन दिलं आहे रे, कीं माझ्या सतीशभाईला मी तुमच्या स्वाधीन करीन ! माझ्या मृत्यूनंतर, माझा शब्द तूं राखलास नाहीं, असं कुणालाही म्हणतां येऊं नये, अशी नीट खबरदारी घेशील ना रे, सतीश ? "

सतीशला डोळ्यांतील आंसवें आवरेनात !

रडत रडत तो म्हणाला, " नाहीं, उपेनदादा ! तुझ्या शब्दाची मीं अवहेलना केली, असं कुणीही म्हणायचं नाहीं. तरी दिखील कांहीं लपवून छपवून तर ठेवतां येत नाहीं ? माझं सारं म्हणणं खुलं खुलं बोलून टाकणं जरूर आहे. मी चांगला नाहीं, माझ्यांत कितीतरी दोष आहेत, माझ्या हातून अनेक अपराध, अनेक पापं झालीं आहेत. अशा स्थितींत सरोजिनी माझा स्वीकार कसा करील ? उलट, जिनं मला प्रेम करायला शिकवलं, तिला कुणाच्याही भयानं, कोणत्याही लोभानं, कसल्याही दुर्बलतेमुळं मीं अंतर देऊं नये, असा मला अधिकार देऊनच तूं जा. "

असें म्हणून वर तोंड करून त्यानें सावित्रीच्या मुखाकडे पहातांच दोघांच्याही चार नेत्रांचें एकदम मीलन झालें. परंतु लगेच दोघांचीही नजर एकदम खालीं वळली.

उपेन्द्र क्षीणपणें हंसला, आणि म्हणाला, " अजून दिखील ती गोष्ट मला कळून रहायची राहिली आहे, होय रे सतीश ? मला सगळं-सगळं कांहीं ठाऊक आहे बरं. सगळं जाणून सवरून, समजून उमजून तुम्हां दोघांना एक करायची माझी इच्छा आहे. "

सतीश एकदम म्हणाला, " परंतु माझ्या सहवासांत सरोजिनी सुखी होऊं शकेल का ? "

उत्तर देण्याच्या हेतूनें उपेंद्रानें सावित्रीच्या चेहऱ्याकडे पाहतांच ती एकदम उसळून आलेल्या आवेगानें म्हणाली, " ती जबाबदारी मी घेतें, दादा ! तुम्ही निश्चिंत रहा. "

यावर उपेन्द्र कांहीं बोलला नाहीं. डोळ्यांचें पातेंही न हलवितां तो तिच्या तोंडाकडे पहात राहिला.

थोड्या वेळानें तो म्हणाला, " आसक्तीचं बंधन आतां तुझ्यासाठीं नाहीं, सावित्री ! दुर्भाग्यानं जर तुला कुळाच्या बाहेर आणून टाकलं आहे, ताई ! तर आतां त्याच्या आंत तूं जाऊंच नकोस. चिरकाल बाहेर राहूनच तिला हृदयाशीं धरून रहा, असं माझं तुला आग्रहाचं सांगणं आहे. "

त्याचें हें भाषण ऐकून सावित्री पाषाणमूर्तीप्रमाणें खालीं नजर लावून बसून राहिली. आज सतीश दुसऱ्याच व्यक्तीचा झाला होता. त्याच्यावर आतां तिचा लेशमात्र अधिकार राहिला नव्हता. तिच्या भावना, तिच्या वासना, तिचें परम सुख आणि परम दुःख, तिच्या अत्यंत दुःसह वेदना, या सर्वांना आज तिच्या डोळ्यांदेखत समाधि मिळाली होती. परंतु एक अतिशय बारीक असा उसासाही तिनें बाहेर पडूं दिला नाहीं. हृदयांतील अन्तर्भाग व्यथेमुळें अगदीं पेळवटून निघाला. परंतु सर्वसहा पृथ्वी ज्याप्रमाणें आपल्या अन्तर्भागांतील उद्दाम, दुर्जय अग्नीचा उत्पात सहन करते, अगदीं त्याप्रमाणेंच चेहऱ्यावर व्यथेची सुरकुतीही पडूं न देतां सर्व कांहीं सहन करून सावित्री स्थिरपणें बसून राहिली.

तिच्या खालीं घातलेल्या चेहऱ्याकडे एकवेळ पाहून उपेन्द्र म्हणाला, "मला सर्व कांहीं कळतं आहे, ताई! पण हा भार वहायचं सामर्थ्य तुलाच आहे, हें जाणूनच ना तुझ्यावर तो संपवून मी जातों आहें?"

उत्तरादाखल फक्त सावित्रीनें त्याच्या कपाळावरील केंसांची बट किंचित् हलवल्यासारखें केलें.

इतक्यांत सतीश एकदम ओरडला, "अरे, ही तर वहिनी!"

सावित्रीनें चमकून तोंड वर करून पाहिलें, हीच ती गंगेच्या घाटावरील वेडी, पाय न वाजवतां हळूच—अगदीं सावधपणं घरांत शिरत आहे!

क्षणार्धात सर्वच मंडळी विस्मयानें स्तिमित झाली!

किरणमयीच्या लांबसडक रुख्या केंसांचे पुंजके तिच्या चेहऱ्यावर, कपाळावर, पाठीवर अस्ताव्यस्त रीतीनें पडून विखुरले होते. नेसलेलें वस्त्र फाटकें आणि मळलेलें होतें. डोळ्यांतील नजर शून्य, पण तीव्र होती. जणूं प्रत्यक्ष उन्मादच शोकमूर्ति धारण करून अकस्मात् खोलीच्या मध्य-भागीं येऊन उपस्थित झाला, असेंच सर्वांना वाटलें.

सतीशकडे पाहून ती फिस् फिस् करून म्हणाली, "मला कांहीं शोधूनही सांपडलं नाहीं, भाऊजी! किती किती लोकांना तरी विचारलं मीं. पण घर कुठं आहे, याचा कुणी मला मातीधोंडे देखील पत्ता सांगितला नाहीं! आज कालि-मंदिरांतून आलें मी, तेव्हां रस्त्यात दैवानं बिहारी मला दिसला. तेव्हां त्याच्या मागून मागून इथपर्यंत येतां आलं मला."

उपेन्द्राकडे वळून पाहून तिनं विचारलें, "कसं आहे आज तुमचं, भाऊजी ?"

हात हलवल्यासारखें करून उपेन्द्रानें 'बरं नाहीं,' असं दर्शविलें.

किरणमयी अत्यंत व्याकुलतेनें म्हणाली, "मेलेंच मी तर मग बाई! सुरबाला गेली, हें ऐकून रडतां रडतां मला भुई थोडी झाली! ती तर माझा गुरु! देव आहे. हें तिनंच मला सांगितलं होतं. आः! त्या वेळींच जर तिच्या सांगण्यावर माझा विश्वास बसला असता—!"

तोंच तिची दृष्टि दिवाकराच्या पांढऱ्या फटफटित चेहऱ्याकडे गेली.

तत्क्षणीं ती उद्गारली, "तुम्ही कां असे अगदीं संकोचानं, कुंठित होऊन राहिलां आहां, भाऊजी ? तुमची काय ही सारी मंडळी छीः थूः करताहेत ?"

असें म्हणून उपेन्द्राकडे तीव्रपणें पहात ती म्हणाली, "यांना तुम्ही दुःख देऊं नका, भाऊजी! माझ्या हातीं जसं तुम्हीं यांना सोपवून दिलं होतंत, तसंच अखेरपर्यंत ठेवलं मीं. एक दिवसही तुमची शपथ मीं मोडली नाहीं. यांना प्राणांपलीकडे जपत आलें आहें मी. पण आतां मला आणखीं वेळ नाहीं. आतां तुम्ही यांना आपले परत घ्या."

बोलतां बोलतां किरणमयी एकदम शांत झाली, आणि म्हणाली, "माझ्या गांठीला आई कालीचा प्रसाद बांधून आणला आहे मीं. थोडा खानां? झालांत तर तुम्ही बरेही व्हाल. असे किती तरी लोक बरे झाले आहेत, असं मीं ऐकलं आहे बाई!"

एका काळीं ज्या तरुणीच्या सौंदर्याला सीमा नव्हती, विद्या-बुद्धीलाही मर्यादा नव्हती, तीच ही किरणमयी आज काय बोलत आहे, हें तिचें तिलाच कळत नव्हतें!

सतीशला एकंदर तें दृश्य पहावेना!

"हुः" असा खेदोद्गार काढून तो तेथून एकदम निघून गेला.

इतक्या दिवसांनीं किरणमयीसाठीं उपेन्द्राच्याही डोळ्यांतून अश्रु झरूं लागले.

किरणमयीनें वांकून आपल्या पदरानें तीं आंसवें पुसलीं, आणि ती म्हणाली, "आहा! रडूं नका, भाऊजी! तुम्ही बरे व्हाल बरं!"

तितक्यांत सावित्रीकडे तिची नजर गेली.

चार दोन क्षण तिचें निरीक्षण करीत राहून नंतर ती म्हणाली, "त्या

दिवशीं गंगेच्या घाटावर तूंच मला भेटली होतीस, नाहीं ग? जरा सर ना ताई! —तुझ्याप्रमाणंच भाऊजींना मी दिखील मांडी देतें अंमळ. ”

तिचा हात धरून सरोजिनीनें विचारलें, “ मला तुम्ही ओळखतां, वहिनी ?”

किरणमयी अत्यंत शांत सहज स्वरांत उत्तरली, “ तूं तर सरोजिनी. ”

सरोजिनी म्हणाली, “ चला वहिनी, त्या खोलींत जाऊन आपण थोडं बोलत बसूं या. ”

असें म्हणून एका प्रकारची जबरदस्ती करूनच ती तिला ओढीत शेजारच्या खोलींत घेऊन गेली.

त्या दोघी खोलीच्या बाहेर जातात न जातात, तोंच उपेन्द्र एकदम बेशुद्ध झाला. पडलेले परिश्रम आणि झालेला क्षोभ त्याला जणूं अगदीं असह्य झाला!

सावित्री तशीच त्याला मांडी देऊन बसून राहिली होती. पाण्याचा थेंब तोंडांत घालण्यासाठींही ती मग उठली नाहीं.

सगळी दुपारची वेळ उपेन्द्र बेशुद्ध अवस्थेंत होता. परंतु संध्याकाळानंतर ताप जसा वाढला, तसें त्याचें चैतन्य परत आलें.

डोळे उघडतांच त्याला पहिल्यानें सावित्री दिसली.

क्षीण स्वरानें उपेन्द्र म्हणाला, “ अजून बसून राहिली आहेस, ताई ? तुला सोडून जातांना माझ्या डोळ्यांना पाणी येतं ग, सावित्री ! ”

सावित्री रडत रडत म्हणाली, “ मलाही आपल्याबरोबर घेऊन चला तुम्ही, दादा ! ”

तिला उत्तर न देतां उपेन्द्र सतीशला म्हणाला, “ वहिनी कुठं आहेत रे ?”

सतीश म्हणाला, “ खालच्या खोलींत झोंपली आहे. तिच्यावर मी अगदीं नजर ठेवून आहें. ”

“ जोंपर्यंत ती नीट शुद्धीवर येत नाहीं, तोंपर्यंत तिच्यावर अशी नजर ठेवूनच रहा, भाई ! पण तुला भ्यायचं कांहीं कारण नाहीं. सतीश ! तिच्या अन्तर्यामीं झालेला आघात किती दुःसह आहे, तें समजायची आपणाला शक्ति नाहीं. परंतु तो आघात कितीही भयंकर असो; इतक्या प्रचंड बुद्धिमत्तेला चिरकाल झांकून ठेवायचं सामर्थ्य त्याला खचित नाहीं ! ”

सतीश म्हणाला, “ तें मला ठाऊक आहे, उपेनदादा ! ”

नंतर क्षणभर स्तब्ध राहून तो म्हणाला; “ जर माझ्यावर भरंवसा टाकून तूं

जाणार असशील, तर तुझ्या दिवाकराचा भारही मीं घेतला असें समज, उपेनदादा ! ”

उत्तरादाखल उपेन्द्रानें किंचित् हंसण्याचा प्रयत्न केला, आणि त्यानें पाठ फिरविली.

अनेक गोष्टींनीं, अनेक क्षोभांनीं त्याच्या जीवनदीपाचें तेल अगदीं वरच्या कणापर्यंत जाळून टाकलें होतें !

थोड्याच वेळांत उपेन्द्राला पुनः एक रक्ताची गुळणी आली. श्वास आहे कीं नाहीं, याचा देखील संदेह वाटूं लागला !

सर्वांनीं मिळून धरून त्याला खाटेवरून खालीं निजविलें.

उपेन्द्राचा निष्पाप, विरहानें जर्जर झालेला प्राण त्याच्या सुरबालेकडे निघून गेला !

त्या वेळीं सर्वांच्या प्रचंड, गगनभेदी आक्रंदनानें सर्व घरच जणूं कांपूं लागलें !

परंतु खालच्या खोलींत किरणमयी खुशाल झोंपून राहिली होती !



